प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्या आठवणी

# 'ॲज यू लाइक हिम'

संपादन व संकलन : सौ. आशा किशोर धारप



# 'अ‍ॅज यू लाइक हिम'

**प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्या आठवणी**

संपादन व संकलन

**सौ. आशा किशोर धारप**




अनुक्रमणिका

संजय प्रकाशन : दोनशे एक्कावन्न

प्रकाशक :

अभय शंकर भावे.
संजय प्रकाशन.
९१७/२२, फर्ग्युसन कॉलेज रोड
पुणे ४११ ००४.

मुद्रक :

प्रमोद वि. बापट.
स्मिता प्रिंटर्स
१०१९, सदाशिव पेठ
नागनाथ पाराजवळ
पुणे ४११ ०३०.

प्रथमावृत्ती
१४ एप्रिल १९८३
गुढीपाडवा, शके १९०५

मुखपृष्ठ
चंद्रजीत यादव



किंमत तीस रुपये.

अनुक्रमणिका

गुरुवर्य प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्या पुण्यस्मृतीस
अत्यंत आदर व प्रेमपूर्वक अर्पण.

**सौ. आशा किशोर धारप**

अनुक्रमणिका

# अनुक्रम



अनुक्रमणिका

* *

# मनोगत

१९६० साली लग्नानंतर वर्षभराने इंटरपासून पुढील शिक्षणाकरता जेव्हा रुईया कॉलिजमध्य नाव घालायचे ठरवले तेव्हा सासूबाई, मामंजी, नणंद, दीर, यजमान या प्रत्येकाच्या तोंडी एकच उत्स्फूर्त उद्‌गार आला, " आपले वि. ह. आहेत ना तिथे." आमच्या घरातला हा एकमुखी उद्‌गार त्या वेळी माझ्या मनाला आधार देण्याऐवजी घाबरवून मात्र गेला. कारण आधीच प्रा. वि. ह. कुळकर्णी ही सासरच्या गोटातील व्यक्ती आणि त्यातून इंग्लीशसारख्या परभाषेचे प्राध्यापक. म्हणजे मनोमनी परकेपणाची भक्कम भिंत मधोमध उभी. (आजही ही भिंत तशीच भक्कम आहे. फक्त ती मधे उभी नसून पाठीमागे आधारासारखी उभी आहे.)

त्यानंतर प्रत्यक्षात रुईया कॉलेजमध्ये जाऊ लागल्यानंतरही बराच काळ सरांची ओळख करून घेतली नाही. सरांच्या शिकवण्यामुळे प्रभावित होऊन पुढे पुढे नियोजित प्राध्यापकांची लेक्चर्स ' बंक ' करून सरांची लेक्चर्स ऐकली. त्याकरता आमच्या प्राध्यापकांचे रागावणेही सहन केले. पण तरीही व्यक्तीशः सरांच्या कधी जवळ जाण्याचा प्रयत्न केला नाही.

बी. ए नंतर बऱ्याच वर्षांनी १९७४–७५ च्या आसपास मी सरांच्या घरी जाऊ लागले तेव्हा सरांच्या विनोदाला कारुण्याची गडद झालर लागलेली होती. सौ. इंदिराबाई गेल्या होत्या. पण सरांचा शिष्टाचार, सौजन्य, दुसऱ्याला आत्मीयतेने सर्वप्रकारची मदत करण्याची वृत्ती कायम होती आणि त्यामुळे वक्तृत्वस्पर्धा, एम्. ए.चा अभ्यास, काही किरकोळ लिखाण या व अशा गोष्टींच्या मार्गदर्शनाकरता मी सतत हक्काने सरांकडे जातच राहिले. असेच एकदा सहज बोलता बोलता सरांच्या आत्मचरित्राचा व आठवणींचा विषय निघाला. सर तेव्हा बर्नार्ड शॉ व माडखोलकरांच्या पुस्तकात व्यग्र होते. त्यामुळे आठवणींच्या पुस्तकाचे काम मी सुरू करायचे ठरवले. माझ्यासारख्या भाविक व्यक्तीला पहिल्या झटक्यात प्रकाशक मिळणे हा मोठाच शुभशकून वाटला आणि त्यानंतर अमित उत्साहाने अनेकांना विनंतीपत्रे लिहीत गेले. सरांच्यावरील उदंड प्रेमामुळे अनेक ज्येष्ठ साहित्यिकांनी, स्नेहृयांनी, विद्यार्थ्यांनी व सरांच्या नात्यातल्या मंडळींनी जी उत्स्फूर्त व तत्पर साथ

दिली ती खास अनुभवण्याची गोष्ट आहे.

स्वतःच्या तब्येतीच्या व वैयक्तिक अडचणी, साहित्यिकांच्या बाबतीत त्यांच्या वैयक्तिक लिखाणाची बंधने वगैरे सर्व गोष्टी सांभाळून ' आठवणी ' लिहिणाऱ्या सर्व मंडळींनी माझ्या विनंतीला जे प्राधान्य दिले ते एका प्रकारे गुरूचे ऋण फेडण्याकरता मला दिलेले ऋणच आहे. अर्थात् यातील कुणाचेच ऋण मी कधीच फेडू शकणार नाही याची मला पूर्ण जाणीव आहे. या ऋणाबद्दल मनोमनी मी त्यांची अत्यंत कृतज्ञ आहे व सदैव कृतज्ञ राहीन.

ऋणानुबंध खरोखर पूर्वजन्मीचे असावेत याची सत्यता पटण्याइतक्या पटकन् श्री. अभय भावे यांनी प्रकाशनाचे काम स्वीकारले. वास्तविक त्यांचा व प्रा. वि. ह. कुळकर्णी यांचा अजिबात परिचय नाही. भावे यांचा व माझाही खूप दाट परिचय नाही. असे असताही त्यांनी प्रकाशनाचे काम आनंदाने स्वीकारले. श्री. अभय भावे, श्री. संजय भावे व त्यांच्या मातोश्री श्रीमती ललिता भावे या तिघांचेही आभार जितके शब्दातीत आहेत तितकेच त्यांचे ऋणही अदेय आहे.

एका गोष्टीबाबत मला अनेकांची माफीही मागावयाची आहे आणि ती म्हणजे पृष्ठसंख्येच्या मर्यादेमुळे मला अनेकांच्या आठवणींत नाइलाजास्तव करायला लागलेली काटछाट. याची सुरुवात होते प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्या कन्या सौ. इरावती कुळकर्णी यांच्यापासून. सरांच्यावरील प्रेमाचा असा आठवणींच्या रूपाने दाटून वाहणारा ओघ मध्येच खंडित करताना मलाही अतिशय दुःख झाले. पण माझा नाइलाज होता. तरी संबंधितांनी माझी अडचण जाणून मला उदार मनाने क्षमा करावी.

आज हे मनोगत लिहिताना गेल्या दोन अडीच वर्षांचा काळ डोळ्यांसमोर उभा आहे. सरांच्या घरून ह्या पुस्तकाची कल्पना घेऊन घरी आले तो दिवस, दैनिकात माझी विनंती वाचल्याबरोबर अगदी तिसऱ्या दिवशी प्रा. अविनाश केळकर यांचे अमाप उत्साहाने आलेले पत्र व तेव्हापासून ते आजपर्यंत त्यांनी वेळोवेळी केलेल्या मौलिक सूचना व उत्तेजनात्मक मदत, पुस्तकाच्या कामाच्या निमित्ताने वेळी (आणि अवेळीही) सरांच्या घरी जात असता प्रत्येक वेळी हसतमुखाने व न्हाफराळाच्या भरलेल्या ट्रेने स्वागत करणारी सरांची सून सौ. वीणा हिचे कौतुक, पुस्तकाला निश्चित आकार येत आहे असे वाटल्यावर अगदी अलीकडे मी प्रा. वा. ल. कुलकर्णी यांना प्रस्तावनेकरता केलेली विनंती आणि प्रकृती अस्वास्थ्याचे बंधन न मानता त्यांनी अत्यंत अल्पावधीत लिहून दिलेली प्रस्तावना, पुस्तकाच्या प्रांतातला माझा नवखेपणा जाणून प्रा. डॉ. सौ. सरोजिनी वैद्य यांनी वेळोवेळी केलेले मार्गदर्शन हे सर्व अगदी सुस्पष्टपणे आठवते. त्याचप्रमाणे कधी माझ्या काही वैयक्तिक अडचणी तर कधी प्रेसचा संप यांमुळे झालेला थोडा विलंब, तसेच स्वतःचा बी.ए.

चा अभ्यास, वेदपाठशाळेतील अध्ययन हे सर्व सांभाळून मला या पुस्तकाची हस्त-लिखित प्रत तयार करण्याच्या बाबतीत बहुमोल मदत करणारा विद्यार्थी चि. गणेश पुरोहित याची होणारी धावपळ, हेही चांगले आठवते. सौ. सुमती देवस्थळे व सरांचे चुलतबंधू श्री. श्रीधर कुळकर्णी यांचे अचानक झालेले निधनही दुःखाने स्मरणात राहिले आहे.

आता सरांच्या आठवणींच्या पुस्तकाचे काम पुरे झाले आहे. पण सरांचे आत्मचरित्र मात्र लिहावयाचे राहिले आहे. सर आता अमेरिकेत कायमचे स्थायिक होत आहेत. तेव्हा तिथे त्यांनी हे काम हाती घ्यावे. म्हणजे शरीराने तिथे असूनही मनाने ते मराठी मनाशी सतत जोडलेले राहतील. जन्मोजन्मी सरांचे मराठी मातीशी असेच अभंग नाते असावे ही परमेश्वरचरणी प्रार्थना आणि ' आठवणीं 'चे हे पुस्तक साकार होण्यास ज्या सर्वांची मदत झाली त्यांचे अगदी अंतःकरणपूर्वक आभार.

सौ. आशा किशोर धारप

टीप :– ' मनोगत 'ला टीप जोडावी लागेल अशी कुशंका मनात कधीच आली नाही. पण माझ्या दुर्दैवाने गुरुसेवा अपुरी राहिली. सरांचे गुरुवार दि. ९ डिसेंबर १९८२ रोजी अमेरिकेत निधन झाले. दुःख अतीव आहे आणि म्हणून आज राहून राहून आठवण होत आहे सरांनी ' जॉर्ज बर्नार्ड शॉ ' या त्यांच्या पुस्तकाला लिहिलेल्या अर्पणपत्रिकेची. तिच्यात किंचित बदल करून म्हणावेसे वाटते, " सर असेपर्यंत पुस्तक पूर्ण झाले नाही ही त्यांच्या आयुष्याची शोकांतिका आणि ते मी वेळीच पूर्ण करू शकले नाही ही माझ्या आयुष्याची शोकांतिका."

सौ. आशा किशोर धारप

अनुक्रमणिका

# प्रस्तावना

## वा. ल. कुलकर्णी

माझ्या साहित्यक्षेत्रातील उमेदवारीच्या काळात ज्यांच्या प्रोत्साहनामुळे हुरूप येऊन मी समीक्षालेखन केले त्यात के. नारायण काळे आणि वि. ह. कुळकर्णी या दोन नावांना फार महत्त्व आहे. दोघेही 'प्रतिभा' या दर्जेदार पाक्षिकाचे संपादक, मराठीबरोबर इंग्रजी वाङ्मयाचेही अभ्यासक; या दोघांचे साहित्य-चर्चात्मक लेखन 'यशवंत', 'रत्नाकर' मधून मी वाचलेले व त्याने प्रभावित झालेलो.

'प्रतिभा' पाक्षिकातून प्रसिद्ध झालेल्या माझ्या 'पेंटर' या कथेचे आल्यागेल्या जवळ कौतुक केले ते के. नारायण काळ्यांनी; तर 'पारिजात'च्या तिसऱ्याच अंकात प्रसिद्ध झालेल्या 'हार्डी : काव्य आणि तत्त्वज्ञान' या माझ्या पहिल्याच साहित्य-चर्चात्मक लेखाबद्दल माझे अभिनंदन करण्यासाठी पारिजात मासिकाच्या कार्यालयात मुद्दाम आले ते वि. ह. कुळकर्णी. काळे राहत असत तेव्हा ठाण्याला, मी राहत असे शीवला. आमची भेट बहुदा लोकलमध्ये व्हायची. तेव्हा मी काय वाचतो आहे, काय वाचायला पाहिजे याची आस्थापूर्वक विचारपूस करायचे के. नारायण काळे. विठ्ठलराव राहत असत दादरला आज आठवले शहाडे यांचे दुकान आहे त्याच्याबाजूने आत गेल्यास दिसणाऱ्या वाडीतील एका चाळीवजा घरात. तेव्हा काही विशेष साहित्यचर्चात्मक लिहिले की ते विठ्ठलरावांना वाचून दाखविण्यासाठी त्यांच्या घरी मी जात असल्याचे चांगले आठवते. विठ्ठलरावही ते लेखन ऐकून वा वाचून योग्य त्या सूचना देत.

त्या वेळी शाळेचे काम संपल्यावर विद्यापीठाच्या ग्रंथालयात मी वाचन करण्यासाठी जात असे. कामे सांभाळून विद्यापीठाच्या ग्रंथालयात जाण्याने मला फार ताण पडत असे. तेव्हा कोणत्यातरी चांगल्या लायब्ररीचा वर्गणीदार होणे चांगले हे लक्षात घेऊन मी पेटीट लायब्ररीचा मेंबर व्हायचे ठरवले. तेव्हा मला ओळखणारे या लायब्ररीचे जुने सदस्य म्हणून विठ्ठलरावांनीच माझ्या अर्जावर सही केली. एवढेच नव्हे, तर मला हे सदस्यत्व मिळाल्यावर माझ्याबरोबर येऊन कोणत्या कपाटात कोणती पुस्तके आहेत याची माहिती त्यांनीच करून दिली.

याच काळात मर्ढेकरांचे " वाङ्मयीन महात्मते'वरील लेख सह्याद्री मासिकात

अनुक्रमणिका

येत होते. ते वाचून मी प्रभावित झालो होतो. त्यामुळे त्यांचे ' Arts and Man ' या पुस्तकातील लेख, ते पुस्तक मिळवून मी वाचले व त्यांची कलाविषयक भूमिका मराठी वाचकांना कळावी एवढ्यासाठी मी त्यांच्या भूमिकेचा परिचय करून देण्यासाठी दोन लेख लिहिले. वि. ह. कुळकर्णी हे मर्ढेकरांच्या जवळचे आणि विश्वासातले. त्यांच्या 'रात्रीचा दिवस' या कादंबरीला त्यांच्या विनंतीवरून प्रस्तावना लिहिणारे सुहृद. तेव्हा त्यांना प्रथम वाचून दाखवून आपण कोठेही मर्ढेकरांच्या म्हणण्याचा विपर्यास केलेला नाही याची खात्री करून घेण्यासाठी मी हे लेख 'समीक्षक' मधून प्रसिद्ध करण्यापूर्वी त्यांना वाचून दाखवले होते हेही आज आठवते.

१९३५ ते १९५० या काळात मी विठ्ठलरावांबरोबर किती चर्चा, परिसंवाद, वादविवादसभा यामध्ये भाग घेतला असेल हे सांगणे फार अवघड आहे. जवळजवळ प्रत्येक शनिवार-रविवारी गिरगावातील वागळे हॉल, सरस्वती मंदिराचे सभागृह, दादरमधील वनमाळी आणि घुरु हॉल, यात आम्ही कोणत्या ना कोणत्या वाङ्मयीन प्रश्नांवर चर्चा करीत असू. विठ्ठलरावांच्या बोलण्यात जो एक मिस्कीलपणा आजही जाणवतो तो चर्चेचे वातावरण प्रसन्न ठेवण्याला फार मदत करीत असे. विठ्ठलरावांशी गप्पा मारणे ही एक अत्यंत आनंददायक गोष्ट आहे हे मला नेहमीच जाणवले आहे.

हे पुस्तक विठ्ठलरावांसंबंधीच्या त्यांचे चाहते, मित्र, विद्यार्थी इत्यादींच्या आठवणीचे आहे. या सर्व आठवणी अत्यंत रोचक असणार हे उघडच आहे. परंतु मला विचाराल तर मी म्हणेन की विठ्ठलरावांनी स्वतःच आपल्या आठवणी लिहून काढल्या असत्या तर फार बरे झाले असते. कारण गेल्या पन्नास वर्षांतील अनेक लहान मोठ्या लेखकांशी, संपादकांशी, व साहित्यविषयक चळवळीशी विठ्ठलरावांचा दृढ परिचय होता. त्यांच्या या स्मृतिवजा लेखनातून या कालखंडातील साहित्य आणि साहित्यिक यावर चांगला प्रकाश पडला असता. अजूनही हे काम त्यांनी हाती घ्यावे अशी सूचना करून मी हे दोन शब्द संपवतो.

* *

अनुक्रमणिका

# प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्या चरित्राची रूपरेषा

प्रा. वि. ह. कुळकर्णी यांचा जन्म १४ एप्रिल १९०२ साली कशेळी या गावी झाला. कशेळी हे गाव रत्नागिरी जिल्ह्यातील राजापूर तालुक्यात आहे.

प्रत्येक गावाचे काही ना काहीतरी वैशिष्टय असते, तसे कशेळी या गावाचेही आहे. या गावाने अनेक सुप्रसिद्ध व्यक्तींना जन्म दिला आहे. कशेळीचे राजाराम-शास्त्री भागवत (१८५१–१९०८) हे त्या काळात गाजलेले सुधारक होते. ते जातिभेद मानीत नसत. प्रसिद्ध व लोकप्रिय लेखक विठ्ठल सीताराम गुर्जर हे कशेळीचेच आणि अनेक लेख व पानिपतावर प्रचंड प्रास्ताविक ग्रंथ लिहिणारे इतिहासतज्ज्ञ त्र्यं. शं. शेजवलकर हेही कशेळीचेच. अॅनी बेझंटबाईंचे चरित्र व इतर ग्रंथ लिहिणारे थिऑसॉफिस्ट व कशेळीचे आणखी एक ग्रंथकार म्हणजे ठाण्याचे राजाराम भागवत. सुप्रसिद्ध लेखिका दुर्गाबाई भागवत यांचा जन्म जरी पंढरपूर येथे झाला असला तरी त्यांच्या वडिलांचे गाव कशेळीच आहे. हे सर्व येथे सांगण्याचे कारण म्हणजे कशेळी हे लहान गाव असले तरी तेथे मोठमोठी माणसे निर्माण झाली आहेत.

कशेळी या गावाचे आणखी एक वैशिष्टय म्हणजे तेथील ब्राह्मणांची जी ४०–५० घरे आहेत ती सर्व कऱ्हाडे ब्राह्मणांची आहेत. प्रा. कुळकर्णी हेही कऱ्हाडे ब्राह्मण असून त्यांचे मूळ आडनाव ठाकूर हे आहे.

प्रा. वि. ह कुळकर्णी यांच्या वडिलांची नोकरी ही फिरतीची असल्यामुळे त्यांचे शिक्षण अनेक ठिकाणी झालेले आहे कशेळी, राजापूर, देवगड व चिपळूण या ठिकाणी त्यांचे पाचवीपर्यंतचे शिक्षण झाले. चिपळूण येथे त्यांच्या वडिलांचे बरीच वर्षे वास्तव्य झाल्यामुळे तिथे त्यांचा राहण्याचा योग जास्त आला. त्यांच्या शेजारी राहणारे त्यांचे बालमित्र, चिपळूणचे प्रसिद्ध वकील श्री. दत्तोपंत सोमण यांची आठवण प्रस्तुत पुस्तकात दिलेली आहे. चिपळूण येथे आज कॉलेज निघाले आहे. परंतु त्यावेळी तिथे फक्त पाचच इयत्ता होत्या. म्हणून पुढील शिक्षणाकरता ते मुंबईला फणसवाडीतील जगन्नाथाचे चाळीत आपल्या चुलत्यांकडे राहावयास आले. प्रा. कुळकर्णी यांना वाङ्मयाची विशेष गोडी लागली ती मुंबईतील आर्यन शाळेतील

अनुक्रमणिका

शैक्षणिक वर्षात. डॉ. डांगे, पत्रकार त्र्यंबक विष्णू पर्वते, ग. त्र्यं. माडखोलकर हे त्यांचे या शाळेतील सहाध्यायी होते.

मॅट्रिक पास झाल्यानंतर प्रा. कुळकर्णी व काही स्नेही मंडळी गोरेगाव येथे राहावयास गेली. प्रा. कुळकर्णी हे तेथून झेवियर्स कॉलेजात शिकावयास येत असत. तिथे खं. मा. दोंडकर, प्रा. अनंत काणेकर, के. नारायण काळे, वा. रा. ढवळे इत्यादी मित्रांच्या सहवासात त्यांचे साहित्यप्रेम वृद्धिगत झाले आणि त्यांच्या व्यासंगाला विशिष्ट दिशा मिळाली.

गोरेगाव येथे सात-आठ वर्षे राहिल्यानंतर काही कौटुंबिक अडचणीमुळे प्रा. कुळकर्णी दादर येथे राहावयास येऊन पुढे तेथेच स्थायिक झाले. एम. ए. होईपर्यंत प्रा. कुळकर्णी हे मुंबईतील 'S. L. I. S. S. Girl's High School'मध्ये अध्यापकाचे काम करीत असत. त्यानंतर काही वर्षे ते जोगेश्वरी येथील इस्माईल कॉलेजमध्ये मराठी व इंग्रजी हे विषय शिकवीत असत. परंतु त्यावेळी ते कॉलेज मुस्लीम संस्कृतीचे केन्द्र असल्यामुळे तेथे मुस्लीमेतर प्राध्यापकांवर बरीच नियंत्रणे होती. म्हणून त्यांनी ते कॉलेज सोडून माटुंगा येथील रामनारायण रुईया कॉलेजात प्राध्यापकपद स्वीकारले. १९४१ पासून १९६२ पर्यंत एकवीस वर्षे ते इंग्रजी विषयाचे प्राध्यापक होते व शेवटची काही वर्षे त्या शाखेचे प्रमुख होते. तेथून निवृत्त झाल्यावर माहीम येथील रूपारेल कॉलेजच्या निमंत्रणावरून तेथे ते इंग्रजी विषयाचे पाच वर्षे प्राध्यापक होते.

प्रा. कुळकर्णी यांनी विपुल लेखन केले आहे. 'प्रतिभा' व 'ज्योत्स्ना' या नियतकालिकांचे ते काही काळ संपादक होते. शिवाय ते प्रत्येक अंकात 'सुहास' या टोपण नावाखाली 'हास-परिहास' हे विनोदप्रचुर सदरही नियमितपणे चालवीत. त्यांनी प्रसिद्ध पाश्चिमात्य व्यक्तींवर लिहिलेले लेख 'शब्दचित्रे' या नावाने पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांनी 'किशोर' मासिकात महाराष्ट्रातील अर्वाचीन नामवंत व्यक्तींवर लिहिलेले लेख, 'आधुनिक महाराष्ट्र ज्यांनी घडविला' या शीर्षकाखाली पाच भागांत 'केमकर प्रकाशनां'नी प्रसिद्ध केले आहेत. मुंबई आकाशवाणीवर अनेक वर्षे ते निरनिराळ्या विषयांवर भाषणे लिहून देत व अनेक व्यक्तींच्या चर्चामंडळाचे ते संचलन करीत. याशिवाय त्यांनी लिहिलेले लघुनिबंध, विनोदी लेख, परीक्षणे व प्रस्तावना ही एकत्र ग्रंथरूपाने प्रसिद्ध केली तर तो ग्रंथ पाचसहाशे पृष्ठांचा होईल. मुंबई मराठी साहित्य संघाचे ते अगदी सुरुवातीपासून सभासद असून त्या संस्थेतर्फे त्यांनी गुंफलेली शि. म. परांजपे यांजवरील व्याख्यानमाला खास स्मरणीय व महत्त्वाची आहे. संक्षिप्तरूपाने त्याचे पुस्तकही प्रसिद्ध झालेले आहे. मराठी कादंबरीचा अगदी सुरवातीपासून १९७५ पर्यंतचा इतिहास व 'न. चिं. केळकर वाङ्मयीन दर्शन' हे त्यांचे लेख प्रसिद्ध ग्रंथांत समाविष्ट केले

गेले आहेत. ऑस्कर वाइल्डच्या 'विंडरमियर्स फॅन ' या नाटकाचा ' शोभेचा पंखा ' या नावाने त्यांनी अनुवादही केला होता आणि त्यात दुर्गाबाई खोटे व वनमाला यांनी प्रमुख स्त्री-भूमिका केल्या होत्या.

अगदी अलीकडे त्यांनी चारशे पृष्ठांचे ' अच्युत बळवंत कोल्हटकर : चरित्र व वाङमय,' आणि ' जॉर्ज बर्नार्ड शॉ ' व ' ग. त्र्यं. माडखोलकर ' यांचे चरित्र अशी पुस्तके लिहिली असून ती प्रसिद्ध झाली आहेत. यावरून त्यांच्या साहित्यसेवेतील विविधता स्पष्ट होईल.

* *

# विठ्ठल

## दत्तात्रय गो. सोमण

आमच्या घराच्या पुढील अंगणाला लागून पूर्वेस चार पावलांवर असलेल्या केतकरांच्या बंगल्यात कुळकर्णी यांचे बिऱ्हाड होते. विठ्ठलच्या घरी त्यांचे कुटुंबात आई, वडील व चार भाऊ होते. एक सदाशिव, दुसरा विठ्ठल, तिसरा रामू व चौथा बाळू. त्यांची बहीण वेणूताई ऊर्फ अक्का हीही बरेच वेळा असे. वेणूताईला एक मुलगी अंबू आहे. विठ्ठलचे वडील लोकल बोर्डाचे ओव्हरसिअर म्हणून चिपळूणला बदली होऊन आले होते. त्यांना आम्ही सर्व लहान मुले 'भाऊ' असे म्हणत असू. भाऊ हे अत्यंत उमद्या स्वभावाचे होते. व मनाने अत्यंत कोमल भावनांचे होते. भाऊ हे उत्तम टेनिसपटू होते. त्यांना फक्त ऐकू येत नसे. ते साफ बहिरे होते. हल्लीप्रमाणे कानाचे इलेक्ट्रिक यंत्र त्या वेळी नव्हते. त्यामुळे ऐकण्यासाठी कानाशी लावण्याचा एक लहानसा कर्णा (फनेलसारखा) सदोदित हातात असे. त्यांची आई अत्यंत सुस्वभावी, उत्तम सुगृहिणी व मनमिळावू होती. कुटुंबातील सर्वच माणसे सुस्वभावी व मनमिळावू होती. सर्वच माणसे शेजारधर्माला अत्यंत चांगली होती. त्यामुळे त्यांच्या कुटुंबातील माणसांचे आमच्या कुटुंबातील माणसांबरोबर चांगले पटत असे. त्या वेळी आमचे कुटुंबातील सर्व माणसांना मी व माझी आई, भाऊ, बहिणी यांना एका गोष्टीचे अत्यंत वाईट वाटत असे ती म्हणजे वेणूअक्का ही अत्यंत गोरीपान, तरुण व देखणी अशी असताना दुर्दैवाने तिच्यावर वैधव्याची कुऱ्हाड कोसळली होती. जास्त वाईट वाटते ते वैधव्यानंतर तिला सोवळे केलेले होते म्हणून. (म्हणजे केशवपन करून तांबडे लुगडे नेसणे) त्यामुळे आमची आई, बहीण यांना फारच हळहळ वाटत असे.

अक्का ह्या सालस, सुस्वभावी, बोलायला गोड, मनमिळावू अशा होत्या. त्या घरातील सर्व काम नेटकेपणे करून आईला फारच मदत करत. विठ्ठलची आई व इतर माणसे आमच्याकडे नेहमी येत. परंतु अक्का मात्र क्वचितच घराच्या बाहेर पडत. अक्का या आमच्याकडेही फारशा आलेल्या नाहीत. अशा या कुटुंबाची बरेचदा आठवण सर्वांना येते.

विठ्ठल आमच्या शेजारी राहायला आला त्या वेळी मी इंग्रजी शाळेत होतो.

विठ्ठल माझ्या पुढे एक वर्ष होता. माझा दुसरा एक बालमित्र श्री भार्गव परशुराम चितळे ऊर्फ अण्णा भटजी, विठ्ठल व मी यांचे खूप छान जमले. सर्वांना खेळाची व नाटकाची खूप आवड होती. आमची तिघांचीही वाणी अस्खलित, उच्चार चांगले व स्पष्ट आणि मराठी योग्य तऱ्हेने खणखणीत बोलण्याची पद्धत होती. त्या वेळी आम्ही विठ्ठलच्या बंगल्यावर ' तानाजी मालुसरे ' हे एक मुलांचे नाटक केले. विठ्ठलचे वडील (भाऊ) हे मुलांना प्रोत्साहन देऊन कौतुक करणारे होते, म्हणून आम्ही ते नाटक केले. भाऊंनी आम्हाला चांगलीच मदत केली. बंगल्याच्या माडीवर आम्ही स्टेज तयार केले. अंक किती होते ते स्मरत नाही. मात्र पडदा दोनदा-तीनदा वर ओढल्याचे प्रकर्षाने आठवते. मुख्य काम विठ्ठलने केले होते. रामू व विठ्ठलचा आतेभाऊ नानू हे शिपाई झाले होते. प्रेक्षक म्हणजे स्वत: भाऊ, विठ्ठलची आई, अक्का, शेजारची मुले. आमचे नाटक पाहून सर्वजण खूप झाले. विठ्ठल, मी व अण्णा यांना उत्तम बोलण्याच्या पद्धतीबद्दल शाबासकी मिळाली. मोठा झाल्यावर विठ्ठलने नाटकात काम केले की नाही ठाऊक नाही. परंतु अण्णाने व मी देवस्थानच्या नाटकात २५-३० वर्षे कामे केली. विठ्ठलची बोलण्याची पद्धत, उत्तम उच्चार, व योग्य अॅक्शन या गोष्टी मनात अजूनही राहून गेल्या आहेत.

मुलांचे लक्ष खेळाकडे नेहमीच असते. त्याला मी व विठ्ठल कसे अपवाद होऊ ! क्रिकेट हा आमचा आवडता खेळ होता. माझ्या मागील इयत्तेत राजाराम गणेश बापट हा शेजारचा मुलगा होता. तो आमच्याबरोबर खेळायला नेहमी असे. विठ्ठल राहत असे त्या बंगल्याचे अंगण फारच अरुंद होते. लांबीला खूप होते. त्यामुळे मी, विठ्ठल व राजा बापट असे तिघेजण तेथे बॉलिंगची प्रॅक्टीस करीत असू. आम्हाला चौथा खेळाडू लागत नसे बॉलिंग जर विठ्ठल करीत असेल तर मी विकेटकिपर व माझ्या मागे राजाराम असे. आळीपाळीने आम्ही तिघेही २-२तास बॉलिंग करीत असू. बॅटसमनच्या बाजूच्या तीनही स्टम्पससमोर तीन कागदाचे तुकडे ठेवायचे व चेंडूचा टप्पा त्या बाजूला टाकून विकेट घेता येते की काय हे पाहावयाचे. त्या वेळी आम्हाला ब्रेक बॉलची काहीही माहिती नव्हती. फक्त तीन ठेवलेल्या कागदावर चेंडूचा टप्पा टाकून दांडी उडवणे याकरता आमचा प्रयत्न असे व आमच्या तिघात Competition लागे को सहाही बॉलमध्ये सहा दांड्या कोण उडवतो ? विठ्ठल येथून गेल्यावर मी व राजा बापट असे दोघेच नेहमी प्रॅक्टीस करीत असू.

विठ्ठलला लहानपणापासूनच भाषणाचा फार नाद होता. त्याचे बोलणेही विनोदी असे.एक दिवस मी आमचे गॅलरीत उभा होतो. आमच्या पुढील अंगणाच्या बाजूस विठ्ठलच्या बंगल्याला एक मोठी खिडकी होती. त्या खिडकीला धरून विठ्ठल बराच वेळ आकाश व चंद्र पाहत उभा होता. तो शरदऋतू. पौर्णिमेचा

दिवस असावा. कारण लख्ख चांदणे पडून ढगांच्या कापसाचे तुकडे आकाशात इतस्ततः विखुरले होते. मी आमच्या गॅलरीतून विठ्ठलला जोरात हाक मारली, " अरे ! एवढे टक लावून आकाशात काय निरखून पाहतोस ? इतका वेळ चंद्र पाहतोस काय ?" त्या वेळी विठ्ठलने मला सांगितले, " दत्तू, नागपूरच्या एका मासिकात माडखोलकरांचा एक चांगला लेख आला आहे. तो तू वाचलास का ? म्हणजे तुला मी काय पाहतो व काय निरीक्षण करीत होतो, हे समजेल. एरवी समजणार नाही." मी विचारले, " हे माडखोलकर कोण मला माहीत नाही. मला फक्त हरीभाऊ आपटयांच्या कादंबऱ्या, अगर नवीन नाटके वाचण्याची आवड आहे." त्यावर विठ्ठल म्हणाला, " माडखोलकर हे मराठीतील एक नामवंत लेखक आहेत. तू त्यांचे लेख जरूर वाचीत जा." ही गोष्ट अजूनही माझ्या चांगली स्मरणात आहे. त्यानंतर मी माडखोलकरांचे मिळतील ते लेख वाचण्यास सुरुवात केली.

विठ्ठलच्या वर्गात महादेव देव व बंडू थत्ते (जे. के. थत्ते वकील) या नावाचे त्याचे वर्गमित्र होते. ते कधीकधी विठ्ठलच्या बंगल्यावर येत असत. ते तिघे एकदा बंगल्यावर बोलत बसले असताना विठ्ठलच्या तोंडून दहावेळा तरी, " देवा, तू असं करू नकोस, देवा, तू तसं करू नकोस " असे तो बोललेला मी आमच्या अंगणातून ऐकले. त्याबरोबर आमच्या अंगणातून मी विठ्ठलला विचारले, " गंधर्व फॅशन कुठून काढलीस ? काय चालवलंयस काय ? गंधर्वांची ऐट कधीपासून करू लागलास? " तेव्हा तिघेजणही मोठ्याने हसू लागले. व तिघांनीही 'अरे ! इकडे ये ' म्हणून मला हाक मारली. मी विठ्ठलचे माडीवर गेल्याबरोबर विठ्ठलने व बंडू थत्ते यांनी " हा आमचा मित्र ' महादेव देव ' माखजनचा. हा आमच्या वर्गात आहे व त्याला मी नेहमी देवा असे म्हणतो. देव म्हणत नाही. मी गंधर्वाची ऐट घेतली नाही." असे सांगून तिघेही मला हसू लागले.

बालपणीच्या अशा अनेक आठवणींनी आज आमचे वार्धक्य समृद्ध झाले आहे. देवाकडे माझ्या या बालमित्राला सुखशांतीपूर्ण दीर्घ आयुष्याची देणगी मिळावी हीच प्रार्थना आहे.

* *

# धाकटा भाऊ

## स. ह. कुळकर्णी

आमची घरची स्थिती फार गरिबीची. माझे शालेय शिक्षण झाल्यावर मी नोकरी धरली व विठ्ठलराव स्कॉलर असल्यामुळे त्यांनी पुढे शिकावे असे ठरले. त्याप्रमाणे ते झेवियर्स कॉलेजमध्ये दाखल झाले. झेवियर्स कॉलेजमध्ये महाराष्ट्रीय विद्यार्थी कमी. एलिफन्स्टनमध्ये स्कॉलर्स आणि विल्सनमध्ये मध्यमवर्गीय अशी सामान्यपणे विभागणी होत असे. झेवियरमध्ये विठ्ठलरावांना प्रवेश मिळाला. पण फीचे पैसे आणायचे कुठून ही समस्या उभी राहिली. माझा पगार अगदी बेताचा, मी विवाहित, तेव्हा संसाराचा गाडा कसा हाकायचा? तथापि विठ्ठलरावांनी नोकरी व शिकवण्या करून आपला कॉलेजचा खर्च स्वत:च केला.

त्या वेळी आम्ही गोरेगावला राहत होतो. विठ्ठलरावांनी स्टुडंटस लिटररी अँन्ड सायेंटिफिक सोसायटीच्या 'कमलाबाईंची शाळा' या नावाने प्रसिद्ध असलेल्या शाळेत नोकरी धरली. ते सकाळी दहा वाजता घरून निघत. ते रात्री नऊला परत येत. त्या वेळी गाड्यांना गर्दी नसे. बोरीवली लोकलला गोरेगाव स्टेशनवरही कॉर्नरसीट मिळे. विठ्ठलरावांचा सर्व अभ्यास, अगदी एम. ए.चा सुद्धा, गाडीच्या डब्यातील कॉर्नरमध्ये होत असे. नोकरी व शिकवण्या यांमुळे अभ्यासाला वेळच नसे. त्यामुळे एम. ए. मध्ये त्यांचा क्लास हुकला. १९३१ मध्ये आम्ही दादरला राहावयास आलो. त्या वेळी काही दिवस जोगेश्वरी येथील इस्माईल कॉलेजमध्ये विठ्ठलरावांनी नोकरी धरली व पुढे रुईया कॉलेजमध्ये ते इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून लागले. अत्यंत रूक्ष विषयही शिकविताना त्याला विनोदाची झालर कशी लावावयाची यात ते प्रवीण असल्यामुळे ते इतके विद्यार्थीप्रिय झाले की दुसऱ्या वर्गातील त्याच विषयाच्या प्राध्यापकांच्या वर्गातून विद्यार्थी विठ्ठलरावांच्या वर्गात येऊन बसायचे. हॉलमध्ये जागा नसली तरी उभ्याने किंवा खिडक्यांच्या कट्ट्यांवर बसून त्यांचे लेक्चर ऐकत.

नंतर डॉ. भालेराव यांनी त्यांना मराठी साहित्य संघात नेऊन पुढे अध्यक्षपदी त्यांची नियुक्ती केली. कोणत्याही वक्त्याचे भाषण कंटाळवाणे होऊ लागले की डॉ. भालेराव विठ्ठलरावांना बोलण्यास सांगत. ते नुसते उभे राहिले म्हणजे

अनुक्रमणिका

सभेत एकदम आनंद व उत्साह निर्माण होई. बडोद्याचे एक साहित्यप्रेमी गृहस्थ श्री. नेने यांनी विठ्ठलरावांची लोकप्रियता ऐकून त्यांना साहित्यसम्राट केळकर यांचेवर प्रबंध लिहिण्यास सांगितले. विठ्ठलरावांचा केळकरांवरील लेख इतका विश्लेषणात्मक आणि अभ्यासपूर्ण झाला की, तो खुद्द तात्यासाहेबांच्या वाचनात आल्यावर ते आश्चर्यचकित झाले आणि एक दिवस आम्ही दादरला राहत होतो तेथे विठ्ठलरावांचा शोध घेत आले. ते म्हणाले " माझ्यावर लेख लिहिणारा लेखक प्रथम मला भेटून माझे मार्गदर्शन घेतो. तसे न करता इतका अभ्यासपूर्ण लेख लिहिणारा हा कोण लेखक, याचे कुतुहल वाटल्यामुळे मी आपणास भेटावयास आलो."

एक विशेष आठवण अशी की आम्हाला एक धाकटे बंधू होते. त्यांना अखेरीस कर्करोग झाला. ही गोष्ट डॉक्टरांनी गुप्त ठेवली. मात्र विठ्ठलराव हे डॉक्टरांचे स्नेही असल्यामुळे त्यांनाच फक्त सांगितली. आम्ही तिघेही बंधू पूर्वी एकत्र राहत असू. पुढे कुटुंबविस्तार होत चालल्यावर जवळ-जवळ निराळया जागा घेतल्या. हे बंधू आजारी झाल्यावर विठ्ठलराव रोज निदान तास दीड तास त्यांच्याजवळ बसून त्यांना आनंद व उत्साह वाटेल अशा गोष्टी सांगत. त्या बंधूंना आपल्या आजाराची कल्पना येऊन त्यातून आपण उठत नाही असे वाटू लागले, तेव्हा विठ्ठलराव म्हणाले, " ज्या गोष्टी कोणाच्या हातात नाहीत त्याची विवंचना करून आपण नैराश्याच्या आहारी जाण्यात काय अर्थ आहे! आपण पुष्कळ वर्षे जगणार आणि आपल्या हातून कोणकोणत्या प्रकारची कौटुंबिक व समाजसेवेची कार्ये होऊ शकतील याची आखणी करणे हे अधिक श्रेयस्कर नव्हे काय? अपरिहार्य गोष्टींची विवंचना करून उलट आपले आयुष्य कमीच होते. तेव्हा हा विचार टाकून दे. तू लवकर बरा होशील अशी भावना ठेवून मन उल्हसित ठेवीत रहा. म्हणजेच तू या आजारातून उठशील."

कोणत्याही परिस्थितीत मनुष्याने निराश न होता धैर्याने त्याला तोंड देणे हेच श्रेयस्कर. हे तत्त्वज्ञान पचविणे कठीण खरे तथापि त्यावाचून अन्य काही मार्ग नसतोच. पण हे तत्त्वज्ञान विठ्ठलरावांनी आयुष्यात यशस्वीपणे पचविले आहे हे आवर्जून सांगावेसे वाटते. आणि हेच त्यांचे खरे कौतुक आहे.

* *

# जुना स्नेही

## रा. भि. जोशी

अलीकडेच थोड्या दिवसांपूर्वी आम्ही काही मित्र-मंडळी भोजनाच्या निमित्ताने एका ठिकाणी एकत्र आलो होतो. त्यात प्रभाकर पाध्ये, वा. रा. ढवळे, व विठ्ठलराव होते. वा. ल. कुलकर्णीही येणार होते. पण येऊ शकले नाहीत. पुष्कळ वर्षांनी, जवळजवळ वीस वर्षांनी आम्ही दोन-तीन तास एकत्र घालवले. खूप जुन्या आठवणी, अगदी ' प्रतिभा ', ' ज्योत्स्ना ' पासूनच्या निघाल्या आणि सगळेजण वय विसरून गेलो. मागे जाऊ लागलो म्हणजे कितीतरी मागे जावे लागते. १९३१-३२ पर्यंत.

त्या वर्षी मी पार्ले टिळक विद्यालयात शिक्षक होतो. विठ्ठलरावांचा एक धाकटा भाऊ विश्वनाथ हा त्या वेळी माझ्या त्या शाळेत विद्यार्थी होता. (दुर्दैवाने तो पुढे आजारात वारला) लेखक आणि टीकाकार म्हणून विठ्ठलरावांनी त्या-पूर्वीच नाव लौकिक मिळविला होता. ' रत्नाकर 'मधले त्यांचे लेख मी वाचले होते. इंग्रजी व मराठी वाङ्मयाचा त्यांचा व्यासंग, त्यांच्या लेखनातला विनोद ह्यामुळे त्यांच्यासंबंधी आधीच कुतुहल उत्पन्न झाले होते. त्या वेळी ते कमलाबाईंच्या शाळेत शिक्षक होते. माझ्या ओळखीच्या त्यांच्या काही विद्यार्थिनींनी त्यांच्या शिकवण्याच्या हातोटीबद्दल, विद्यार्थिनींसंबंधी त्यांना वाटणाऱ्या आस्थेबद्दल, त्यांच्या स्वभावाबद्दल पुष्कळ सांगितले होते. त्यामुळे लेखक म्हणून आणि व्यक्ती म्हणूनही त्यांना भेटण्याची उत्सुकता होती. म्हणून विश्वनाथमार्फत निरोप पाठवून मी त्यांना भेटायला गेलो.

त्या वेळी ते, त्यांचे मोठे बंधू सदाशिवराव, धाकटे बंधू रामभाऊ व विश्वनाथ असे सर्व गोरेगावला स्टेशनाच्या पश्चिमेकडे राहत होते. एका दुमजली चाळीच्या वरच्या मजल्यावर एका टोकाला त्यांचे बिऱ्हाड. आजूबाजूला खूप मोकळी जागा होती. मागे एक मोठे तळे होते. सगळे वातावरण मोकळे, शांत आणि प्रसन्न होते. आणि घरातलेही तसेच मोकळे आणि अनौपचारिक. त्यामुळे पहिल्या भेटीतच एक-प्रकारचा जिव्हाळा निर्माण झाला. पुढे-मागे अधिक भेटी होतील, ओळख वाढेल अशी उमेद बाळगून मी निरोप घेतला. ही ओळख कशी आणि किती वाढेल ह्याचा

अर्थातच त्या वेळी काहीच अंदाज नव्हता.

पुढे १९३३ पासून मी 'प्रतिभा'त लिहू लागलो. विठ्ठलराव त्या वेळी 'प्रतिभा'च्या संपादक मंडळात होते. संपादक या नात्याने त्यांनी माझे लेखन पाहिले की नाही मला ठाऊक नाही. एक ज्येष्ठ लेखक असाच माझा संबंध होता. १९३६ मध्ये आम्ही दादरला व्हिन्सेंट रोडवर पुणेवाडीच्या मागल्या बाजूला पुण्याच्या शेट इंजिनीयरांच्या 'कमलाराम' इमारतीत राहायला आलो. मध्ये दोन मोटार गॅरेजची जागा सोडून पुण्याच्याच तुळपुळयांची इमारत आहे. ह्या मधल्या जागेत आम्ही बॅडमिंटन खेळत असू. त्या वेळी कुळकर्णी बंधू दादरला न. चिं. केळकर रोडवर दादरकरांच्या घरात रहात असत. ते सकाळी आमच्या-कडे बॅडमिंटन खेळायला येत. त्या निमित्ताने जवळजवळ रोजच आमची भेट होत असे. कोटया-प्रतिकोटया, टोले-प्रतिटोले, नवे लिहिलेले वाचलेले असेल त्यावर चुटपुटती चर्चा, अशा गप्पा-विनोदात वेळ जात असे.

विठ्ठलराव चहाचे रसिक भोक्ते. त्यामुळे त्यांचा आमच्याकडे, आमचा त्यांच्याकडे चहा व्हायचाच. त्यांच्याकडे गेल्यावर 'चहा घेणार का?' असे विचारीत नाहीत. आपण जाऊन बसून आठ-दहा मिनिटे झाली की आतून आधी चहाचा सुगंध आणि मागोमाग चहा येतो. नको असेल तर गेल्याबरोबर 'चहा नको' असे सांगावे लागते विठ्ठलरावांच्या पत्नी इंदिराबाई होत्या तेव्हा ही पद्धत होती आणि तो कुलाचार आता त्यांच्या सूनबाईंनीही चालू ठेवला आहे.

'कमलाराम'मध्ये आमच्या समोरच्या फ्लॅटमध्ये श्री. बा. म्हणजे नाना रानडे राहत असत. कवी यशवंत, माधवराव पटवर्धन मधूनमधून त्यांच्याकडे मुक्कामाला असत. ते आले म्हणजे त्यांना घेऊन आम्ही विठ्ठलरावांकडे जायचो. नित्याच्या भेटीच्या भरीला नैमित्तिक भेटी.

मुंबई मराठी साहित्य संघाच्या स्थापनेनंतर संघाने प्राज्ञविशारद परीक्षांचे वर्ग, गणेशोत्सवात व्याख्याने, वादविवाद, अशी जी कामे सुरू केली त्यांत भाग घेताना आमचा आणखी संबंध आला. मुंबईचे सगळे साहित्यिक जीवनच त्यावेळी संघमय झाले होते. तुरळक अपवाद वगळता मुंबईतले जवळजवळ सर्व साहित्यिक संघात होते. कुठेही सभा, चर्चा असली तर वक्ते, व्याख्याते संघाचेच असत. त्यामुळे कोणीतरी सूचना केली होती की, "'येथे स्वयंपाकी मिळतील' अशी पाटी जशी काही ठिकाणी असते तशी आमच्यापैकी कोणाच्या तरी घरावर 'येथे वक्ते मिळतील' अशी पाटी लावावी."

१९४५–४६ च्या सुमाराला आम्ही काही मंडळींनी 'साधना' नावाचे चर्चा-मंडळ चालवले होते. साधारणपणे महिन्यातून एकदा नव्यानेच प्रसिद्ध झालेली कथा, कविता, कादंबरी किंवा एखादा साहित्यविषयक प्रश्न घेऊन त्यावर चर्चा चालत

असे. ह्या चर्चा दादरला मुलींचे छबिलदास हायस्कूल किंवा रुईया कॉलेज, गिरगावात मॅजेस्टिक सिनेमाशेजारी पिरोजबाई आनंदकरांच्या सरस्वती हायस्कूलमध्ये होत. साहित्य संघाचे कार्यालय त्यावेळी त्या हायस्कूलमध्ये होते. ह्या मंडळात विठ्ठलराव होतेच. चर्चा खूप रंगत असत. आता पन्नास-पंचावन्न वर्षांचे असलेले मुंबईतले बरेचसे साहित्यिक ह्या चर्चांना आस्थेने येत. आचार्य भागवत मुंबईत असले तर तेही ह्या चर्चांना येत. कधी कधी मर्ढेकरही असत. उर्दू कथालेखक कृष्णचंद्रही एकदा आले होते. ह्या चर्चेच्या वेळी चहा-पाण्यावर जो खर्च होई त्याचा हिशेब विठ्ठलरावांचे मोठे बंधू सदाशिवराव ठेवत असत. ते प्रत्येक चर्चेच्या वेळी हजर असत. कारण त्यांनाही साहित्यात रस आहे. विठ्ठलरावांचे धाकटे बंधू रामभाऊ ह्या चर्चांना येत (दुर्दैवाने ते आता हयात नाहीत.)

काही वर्षे पु. शि. रेगे वर्षअखेरीस मुंबईबाहेर कुठेतरी सहल योजत. ह्या सहलीतही विठ्ठलराव असतच. विठ्ठलराव आणि काणेकर ह्या दोघांकडेही लहानमोठ्या लोकांच्या गमतीदार आठवणी आणि आख्यायिका ह्यांचा न संपणारा साठा असे. पद्धती भिन्न पण दोघांचेही त्या सांगण्याचे कौशल्य अप्रतिम त्यामुळे रात्री संपायच्या पण आठवणी शिल्लकच राहायच्या. खाजगी बैठकीतल्या गप्पांप्रमाणे मोठ्या सभांतल्या आपल्या वक्तृत्वानेही विठ्ठलराव आपली छाप पाडीत. अजूनही पाडतात. वाक्ये पल्लेदार, बोलणे आवेशयुक्त किंवा आवाज पहाडी असे त्यांचे वक्तृत्व नाही. पण आवाज स्वच्छ, स्पष्ट वाणी, बोलणे सावकाश, प्रत्येक वाक्याच्या परिणामांचा अंदाज घेत त्यांचे भाषण चालते. युक्तिवाद पटणारा, विनोद खोचक आणि धारदार प्रतिपक्ष असेल तर त्याला नामोहरम करणारा, त्यामुळेच श्रोते त्यांच्यावर नेहमीच खूष असत.

१९४०–४१ च्या सुमारास विठ्ठलराव शाळेतील नोकरी सोडून कॉलेजात प्राध्यापक झाले. आधी जोगेश्वरीच्या इस्माईल युसूफ कॉलेजात आणि नंतर दादरला रामनारायण रुईया कॉलेजात. नाटकातल्याप्रमाणे 'एकीकडे' म्हणून सांगायचे तर शाळेतून कॉलेजात जाताना विठ्ठलरावांनी आपला पोशाख बदलला. सोगा सोडलेले धोतर, ओपन कॉलरचा पिवळसर रंगाचा शर्ट, कोट आणि घडीची टोपी हा पोशाख बदलून त्यांनी सूट, टाय, बूट, हॅट हा पोशाख स्वीकारला पण तरी आम्हाला धोतरातले विठ्ठलराव अधिक जवळचे वाटत. 'फर्स्ट इंप्रेशन' म्हणतात त्यामुळे असेल.

राहणे दादरला, कॉलेज दादरला, शिकवण्याचे तास शाळेतल्यापेक्षा कमी, सुट्ट्या मोठ्या आणि अधिक त्यामुळे वाटू लागले, आता विठ्ठलराव विविध प्रकारांचे आणि पुष्कळ लेखन करतील. 'रत्नाकर' 'प्रतिभा' 'ज्योत्स्ना' ह्यांमधले त्यांचे लेखन आठवणीत होतेच. निबंध, व्यक्तिचित्रे, स्फुटे, समीक्षा ह्यांत त्यांनी

महत्त्वाची भर घातली असती. पण झाले वेगळेच. त्यांचे लेखन जवळजवळ थांबलेच; इतकेच नाही, तर पुढे पुढे लेखनाबद्दल ते थोडे सिनिकल झाले की काय असे वाटू लागले आणि त्याचे वाईटही वाटले. वाढत्या कौटुंबिक जबाबदाऱ्या, वाढती महागाई, त्यांना तोंड देण्यासाठी अधिक पैसे मिळवण्याची आवश्यकता ह्यामुळे त्यांचे लिहिणे थांबले असे दिसते.

मात्र कॉलेजात प्राध्यापक म्हणून विद्यार्थ्यांत, विशेषत: विद्यार्थिनींत ते खूपच लोकप्रिय झाले. म्हणजे कमलाबाईंच्या शाळेतल्यासारखेच वीस–पंचवीस वर्षांपूर्वीच्या त्यांच्या विद्यार्थिनी त्यांचे नाव निघाले की आजदेखील ओसंडत्या जिव्हाळ्याने बोलतात. जणू आत्ता त्यांच्या वर्गातून बाहेर आल्या असाव्यात.

जवळजवळ बारा–पंधरा वर्षे आमचा जो गट असा होता, तो पुढे राहिला नाही. प्रत्येकाच्या कौटुंबिक जबाबदाऱ्या वाढल्या. जो तो आपल्या कामात अधिकाधिक गुंतला. साहित्य संघाच्या कामातूनही एक एकजण हळूहळू सुटत चालला. मुंबईची गर्दी वाढली जाणे–येणे त्रासाचे होऊ लागले. पूर्वीसारख्या वारंवार गाठीभेटी होईनाशा झाल्या. मात्र स्नेहाच्या भावना पूर्वीसारख्याच राहिल्या होत्या, हे केव्हातरी काही निमित्ताने भेट झाली तर जाणवते. नदीच्या पात्रात पाण्याचा प्रवाह दिसत नसला तरी वरची कोरडी वाळू हाताने थोडीशी उपसून बाजूला करून पाहिले तर स्फटिकासारखे निर्मल पाणी दिसते. तसाच हा अनुभव – तोच पुन्हा भोजनाच्या निमित्ताने भेटलो तेव्हा आला.

वाङ्मयासंबंधीची त्यांची आस्थाही कमी झालेली नाही. काही दिवसांपूर्वी मी त्यांना साहित्य संस्कृती मंडळाने प्रकाशित केलेला 'शेक्सपिअर परिचय ग्रंथ' वाचायला दिला. पुस्तक वाचून नेहमीच्या सवयीने त्यांनी आपल्या प्रतिक्रिया लिहून कळविल्या. शेक्सपिअरची नाटके, त्यांची वैशिष्ट्ये, शेक्सपिअरच्या काळची आणि त्यांच्या आधीची नाटके, त्या वेळचे आणि त्या आधीचे इंग्लंड ह्यांच्यासंबंधीची त्यांची माहिती आज कॉलेजात शेक्सपिअर शिकवत असल्याप्रमाणे ताजी आहे हे पाहून मला नवल वाटले आणि आनंदही वाटला. पहिल्यांदा परिचय करून घेण्यापूर्वी ज्यांच्याबद्दल कुतूहल होते तेच हे विठ्ठलराव.

आता विठ्ठलराव पुन्हा लिहू लागले आहेत. पण आता फुटकळ लिहिण्याऐवजी ते ग्रंथ लिहीत आहेत. त्यांनी लिहिलेले अच्युत बळवंत कोल्हटकरांचे मोठे चरित्र दोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाले. नुकतेच 'बर्नार्ड शॉ' चे चरित्र प्रसिद्ध झाले. त्यांनी ग. त्र्यं. माडखोलकरांचे चरित्र लिहायला घेतले आहे. माडखोलकरांचे ते बालपणापासूनचे मित्र. नंतर नातेवाईक. त्यांचे सगळे खाजगी आणि जाहीर जीवन विठ्ठलरावांनी जवळून पाहिलेले. हे चरित्र त्यांच्यासारखे दुसरे कोणी लिहू शकणार

अॅ...२

अनुक्रमणिका

नाही. काही वर्षांपूर्वी ते एका मोठया आजारातून बाहेर पडले. आणि चांगलेच सावरले. त्यांची लेखणी पुन्हा पालवली. त्यांचे आरोग्य त्यांना आणि त्यांच्या लेखणीला भरपूर साथ देवो ह्यापेक्षा त्यांच्या जुन्या स्नेह्याची दुसरी काय इच्छा असणार !

* *

# ज्येष्ठ मित्र

## माधव मनोहर

वि. ह. कुळकर्णी हे नाव मराठी नियतकालिकांच्या नकाशावर प्रथम मुद्रित झाले ते प्रामुख्याने 'प्रतिभा' पाक्षिकातील त्यांच्या 'हास–परिहास–उपहास' या 'सुहास' नामांकित सदरामुळे, अशी एक समजूत दिसते. पण 'प्रतिभा' पूर्व काळा-तही ते काही काही अभ्यस्त असे वाङ्मयीन निबंधलेखन करीत असत, नाही असे नाही. पण 'प्रतिभा' पाक्षिकातील उपर्युक्त सदर हे आजतागायत रसिकांच्या स्मरणात अबाधित टिकून राहिले आहे.

वि. ह. कुळकर्णी हे प्रकृतिपरत्वे गंभीर स्वभावाचे सद्गृहस्थ आहेत. पण त्यांच्या गंभीर स्वभावात विनोदाचेही एक सूक्ष्म अंग आहे. 'हास–परिहास–उपहास' या सदरात प्रचलित वाङ्मयीन प्रश्नांविषयी जी टोकटिप्पणी असे, ती त्यांच्या या दुपदरी स्वभावाची द्योतक असे. म्हणजे असे की त्या टीकाटिप्पणीतील मर्माशय विचारपरिप्लुप्त असे. पण त्याची शैली मात्र काहीशी हलकीफुलकी मिष्किल वृत्तीची द्योतक असे. आणि त्या शैलीत हासापेक्षा परिहास–उपहास अधि-कांश असे. पूर्वकाळात प्रसंगपरत्वे जे प्रासंगिक लेखन त्यांनी केले होते, ते एक तर माहितीपर असे किंवा विवादपर असे, तरी त्यांपैकी काही लेखन ग्रंथगत आहे पण माझ्या पिढीतील साहित्यिकांच्या स्मरणात त्यांचे जे लेखन रुतलेले आहे, ते मात्र 'सुहास' या टोपण नावाने त्यांनी केलेले.

आयुष्य उतरणीला लागलेले असताना त्यांचे लेखन पुनश्च एकवार पल्लवित व्हावे, हे काहीसे आश्चर्यकारक आहे. ज्याला इंग्रजीत 'इंडियन समर' असे म्हण-तात, त्या काळात वयोमानाची सत्तरी उलटल्यावर वि. ह. कुळकर्णी यांनी अच्युत बळवंत कोल्हटकर व जॉर्ज बर्नार्ड शॉ यांची चरित्रे लिहून हातावेगळी केली आणि तूर्त माडखोलकर चरित्रलेखनाचे त्यांचे काम पुरे होत आले आहे असे ऐकिवात आहे. ते यथाकाल प्रसिद्ध होईलच. वि. ह. कुळकर्णी हा असा एक लेखक आहे की ज्याच्याकडून त्याच्या वयोमानाच्या ऐन उमेदीत व कर्तृत्वभरात सकस अभ्यस्त लेखनाची अपेक्षा होती. पण कारण काय असेल ते असो, इष्ट ते इष्टकाळात घडले नाही ही गोष्ट खरी. अर्थात त्यांच्या लेखनाचा पंचनामा मांडण्याचे हे स्थळ नव्हे.

कारण प्रस्तुत लिहायचे जे योजिले आहे ते वि. ह. कुळकर्णी नावाच्या लेखकाविषयी नसून विठ्ठलराव कुळकर्णी नावाच्या एका ज्येष्ठ मित्राविषयी.

विठ्ठलरावांची आणि माझी पहिली ओळख केव्हा झाली, असा प्रश्न स्वतःलाच केला; तेव्हा स्वतःकडून जे उत्तर आले, ते असे की काही नीटसे स्मरत नाही. जे काही स्मरणात आहे ते असे की चाळीस एक वर्षांपूर्वी केव्हातरी कविवर्य यशवंतांच्या शोधात विठ्ठलरावांच्या घरी जाऊन धडकलो होतो विठ्ठलरावांचे हे घर तेव्हा नेमके कोठे होते ते पण आज नीटसे आठवत नाही. पण अंधुक स्मरण आहे ते असे की ते 'कोहिनूर' सिनेमाच्या परिसरात कोठेतरी असावे. कदाचित नसेलही. पण तेव्हा नाहीतरी विठ्ठलरावांच्या शोधात मी गेलोच नव्हतो. त्यांच्या घरी कविवर्य यशवंतांची गाठभेट झाली एवढेच. नंतरच्या काही वर्षांत आमचा संबंध जसा काही तुटला होता. नंतर चाळीस वर्षांपूर्वी केव्हातरी शिवाजीपार्क भागात सध्याच्या माझ्या निवासस्थानी मी राहायला आलो. आणि तेव्हा, कसा कोण जाणे, पण पत्ता लागला तो असा की विठ्ठलरावांचे घरही येथून जवळच एका हाकेच्या अंतरावर आहे. तेव्हा विठ्ठलराव आणि त्यांचे बंधू इंजिनिअर मोडकांच्या 'उद्यम' समोरच्या 'कमलासदन' नावाचा वास्तूत पहिल्या मजल्यावर राहत असत. 'कमला सदन प्रा. गजेंद्रगडकर यांचे.

विठ्ठलरावांच्या घरी लहानमोठ्या साहित्यिकांचा सतत राबता असे. आणि त्यांच्यापैकी कोणाला ना कोणाला भेटण्याच्या मिषाने मी विठ्ठलरावांच्या घरी जात असे. अशीच एक आठवण आहे. त्या काळातील माझे एक तरुण आणि उनाड मित्र श्रीकृष्ण पोवळे यांच्या पहिल्या कविता-संग्रहासाठी त्यांना प्रस्तावना हवी होती ती आचार्य भागवतांची. कविता संग्रहाचे संपादन मी केले होते. पण प्रस्तावनेसाठी म्हणून या कलंदर कवीला आचार्य भागवतांसारख्या बैराग्याचे नाव कसे काय सुचले कोण जाणे. हा खरे तर असमसमासंयोगच म्हणायला हवा. पण आचार्य भागवतही माझे मित्र होते. आणि तेव्हा त्यांचा मुक्काम होता तो विठ्ठलरावांच्या घरी. तेव्हा माझ्या शब्दाखातर आचार्य भागवतांनी प्रस्तावना लिहिण्याचे कबूल केले. व त्याप्रमाणे त्यांनी ती वेळेवर लिहून दिलीही. आता ही गमतीची गोष्ट आहे की विठ्ठलरावांच्या घरी मी जसा कवी यशवंतांना भेटलो, तसाच आचार्य भागवतांनाही भेटलो. माडखोलकर तर विठ्ठलरावांचे साडूच. पण असे असूनही आजि मुंबईत असले, तर त्यांचा मुक्काम कायम विठ्ठलरावांकडे असूनही त्यांना भेटण्यासाठी म्हणून कधी विठ्ठलरावांकडे गेल्याचे स्मरत नाही. उलट काही काम असेल तर माडखोलकर स्वतःच विठ्ठलरावांकडून उठून माझ्या घरी येत असत. पण हे प्रसंगही तसे एकूण दुर्मीळच

विठ्ठलराव आणि मी दोघांनी मिळून अनेक सार्वजनिक कार्यक्षेत्रात बहुत-

करून एकोप्याने, पण क्वचित केव्हा विरोधातही पुष्कळ कामे केलेली आहेत. उदाहरणार्थ : दादर भागात गाजलेल्या 'अमर हिंद मंडळाच्या' 'वसंत व्याख्यान मालेत' विठ्ठलरावांचा पुढाकार प्रथम होता. तदनंतर काही कारणाने ते वेगळे झाल्यावर या वसंत व्याख्यानमालेची सूत्रे सर्वस्वी माझ्या हाती आली. प्रकाश मोहाडीकर हा आम्हा उभयतांना सार्वजनिक कामात एकत्र आणणारा एक दुवा होता. तो आम्हाला मानत असे. आणि आमचा त्याच्यावर पुत्रनिर्विशेष लोभ होता. अनेक सार्वजनिक कामांत अग्रगण्य पुढाकार नेहमीच त्याचा असे. पण त्याच्या सार्वजनिक कामात त्याच्यामुळे आम्ही पण असू. या वसंत व्याख्यानमालेतच विठ्ठलरावांनी अखिल महाराष्ट्रात प्रथमच प्रश्नमालेचा एक रंगतदार कार्यक्रम सादर केला. त्याचप्रमाणे अभिरूप न्यायालयाचाही. पैकी प्रश्नमालेत उत्तरार्थ अखिल महाराष्ट्राची बुद्धिमता एकवटलेली असे, एवढे म्हटले म्हणजे पुरे. तदनंतर प्रश्नकर्ता म्हणून माझ्या पुढाकाराने मी स्वत: प्रश्नमालेचे असंख्य कार्यक्रम ठिकठिकाणी सादर केले. या कार्यक्रमात ज्ञानक्षेत्रातील अनेक रथी महारथींना मी एका व्यासपीठावर आणत असे. ते सतत बदलत असत. पण विठ्ठलराव मात्र मला हवेच असत. त्याचे कारण एकच. विठ्ठलराव काही 'वक्ता दशसहस्रेषु' नव्हते. पण त्यांच्यासारख्या हजरजबाबी आणि चतुरस्र उत्तरदाता वक्ता माझ्या पाहण्यात नाही. प्रश्न गंभीर असो वा हलकाफुलका, विठ्ठलरावांनी दिलेले त्या प्रश्नाचे उत्तर नेहमीच मोठे मार्मिक, क्वचित मर्मभेदक, पण नेहमीच मोठे मिष्किल असे. त्यांची विनोदवृत्ती मोठी तल्लख आणि त्यांच्या या तल्लख विनोदवृत्तीचे प्रत्यंतर त्यांच्या उत्तरातून हटकून मिळे. मला आठवते, एकदा मी त्यांना असा गमतीचा प्रश्न विचारला होता की, "रिकाम्या बसमध्ये उतारू चढले की डाव्या बाजूच्या खिडकीलगतची जागाच ते हटकून का पकडतात ?" या प्रश्नाचे विठ्ठलरावांनी दिलेले उत्तर असे होते. "बसचे थांबे डावीकडे असतात आणि तेथे रांगेत बायका उभ्या असतात म्हणून !"– तर असे हे विठ्ठलराव.

विठ्ठलराव पेशाने शिक्षक. तेही इंग्लिशचे. ही जात आज तशी एकूण दुर्मीळच. पहिली काही वर्षे शाळेत व नंतरची कित्येक दशके रुईया कॉलेजमध्ये. इंग्रजीचा प्राध्यापक म्हणून त्यांनी चांगला लौकिक मिळवला आहे. उणीपुरी गेली तीस वर्षे येथील 'पिगेज क्लासेस' मध्ये महिला विद्यापीठाचे जे वर्ग दुबार चालविले जातात, त्या वर्गात मी तर अगदी पहिल्यापासूनच इंग्रजी, मराठी विषयाचे अध्यापन करीत आहे. येथे विठ्ठलराव अगदी कालपरवापर्यंत माझे सहकारी म्हणून अध्यापनाचे काम करीत होते. त्यामुळे आम्ही प्रायश: दररोजच भेटत असू. विठ्ठलरावही विद्यार्थिनीप्रिय शिक्षक आहेत. एकाच शिक्षण संस्थेत सतत अध्यापन करीत असल्यामुळे आमची जवळीक अधिकच वाढली.

'कमला-सदन' मधील पूर्वीची जागा सोडून नजीकच्या 'शहाडे सदन' मधील सध्याच्या प्रशस्त फ्लॅटमध्ये ते राहायला आले या घटनेलाही कित्येक वर्षे लोटली. विठ्ठलरावांचे हे नवे निवासस्थानही माझ्या घरापासून पुन्हा हाकेच्या अंतरावर. पण विरुद्ध दिशेला. विठ्ठलरावांचे थोरले बंधू सदाशिवराव हेसुद्धा मोठे रसिक असे वाचक आहेत आणि या उभय बंधूंनी माझ्या प्रासंगिक लेखनावर फार फार प्रेम केले आहे. क्वचित केव्हा विठ्ठलराव आपला मतभेदही नोंदवत असत. पण तो किती मायेने आणि पुन्हा इतक्या नम्रतेने की त्यांना नव्हे, तर मलाच संकोच वाटावा. पण असे प्रसंग तसे एकूण दुर्मिळच. विठ्ठलरावांसारखा एक ज्येष्ठ आणि इंग्रजीचा जाणकार असा स्नेही माझ्या लेखनाचे अखंड कौतुक करीत आला आहे. ही जाण माझ्यातील लेखकाला कायम प्रोत्साहक वाटत आली आहे.

वयोमानानुसार विठ्ठलराव आता पुष्कळच थकले आहेत. आणि आताच्या या त्यांच्या अथक थकलेपणात त्यांना आजवर सतत साथ देत आलेल्या त्यांच्या पत्नीच्या मृत्यूने अधिकच भर घातली असणार. त्यातल्या त्यात सुदैव एवढेच की त्यांची सर्वच मुले उत्तम प्रकारे मार्गस्थ झालेली आहेत. पैकी दोन मुले अमेरिकेत वास्तव्य करून असतात आणि त्यांच्या भेटीसाठी म्हणून काही वर्षांपूर्वी ते अमेरिकेला भेट देऊनही आले होते. ही भेटही त्यांच्या प्रकृतीला फारशी मानवली नसावी, असे वाटते. कारण तिकडून ते परत आले आणि त्यांचा जीवनोत्साह एकाएकी मंदावल्यासारखा झाला. त्यांच्या तुलनेत त्यांचे थोरले बंधू सदाशिवराव अधिक सुदृढ आहेत आणि अजूनही मोठ्या प्रसन्नचित्ताने ते विठ्ठलरावांची वास्तपुस्त करीत असतात. विठ्ठलरावांना काहीसे स्वास्थ्य लाभले ते अगदी अलीकडच्या काही वर्षांत. पण याच काळात या स्वास्थ्याला प्रकृतीस्वास्थ्याने साथ देण्याचे नाकारले असे दिसते. पण अशाही विपरीत परिस्थितीत त्यांचे काही काही लेखन अव्याहत चालूच आहे. पण आता लेखनाची उर्मी बळावली तरी शरीर योग्य ती साथ देत नाही.

विठ्ठलरावांची चण आरंभापासूनच लहानखुरी आहे. पूर्वी तर त्यांच्याकडे पाहिल्यावर मला फडक्यांचीच आठवण होत असे. पण चण लहानखुरी असली तरी पूर्वकाळात त्यांच्या सर्व हालचाली चपल व जलद असत. घरात स्वच्छ ब्राह्मणी धोतर नेसून ते वावरत असले, तरी घराबाहेर पांढरीस्वच्छ पँट आणि ओपन कॉलरचा शर्ट असाच त्यांचा पोशाख असतो. पूर्वकाळात पिवळसर किंवा अशाच कोणत्यातरी मंद रंगाचा कोटही त्यांच्या अंगावर दिसत असे. तेव्हा ते टोपीही घालत असावेत. नंतरच्या काळात टोपीची जागा सनहॅटने घेतली. नंतर कालमानानुसार हॅटही गेली. पण कपड्यांचा असा खास षोक त्यांनी कधी केल्याचे आठवत नाही.

विठ्ठलरावांच्या वक्तृत्वाचा विठ्ठलरावी असा एक खास ढंग आहे आणि आजकाल तो इतका दुर्मीळ झाला आहे की, त्यासाठी मी त्यांना मानले आहे. कोल्हटकर सांप्रदायिकांना कोट्या करण्याची जशी हौस असते तशीच ती त्यांनाही आहे. पण त्यांच्या कोट्या ओढूनताणून आणलेल्या नसतात, तर त्या सहजस्फूर्त, स्वाभाविक अशा असतात. मानव व्यवहाराचे त्यांचे निरीक्षणही मोठे सूक्ष्म असे असते. आणि चतुरपणाचे नर्मविनोदी असे मोठे दिलखुलास आणि स्वभावसहज भाषण करीत असतानाही त्यांच्या गंभीर मुद्रेवरची सुरकुती कधी मोडत नाही हे विशेष. वक्तृत्वाचा एक विशेष असा आहे की त्याची नेटकी व्याख्या करता येत नाही. कोणत्याही व्यक्तीचा वक्तृत्व-विशेष शब्दात नेमका धरता येत नाही. न. चि. केळकर, ल. ब. आणि भालाकार भोपटकर, शिवरामपंत परांजपे, जयकर, वामन मल्हार जोशी, अच्युत बळवंत कोल्हटकर, जमनादास मेहता, स्वातंत्र्यवीर सावरकर, आचार्य भागवत, कॉ. डांगे, लालजी पेंडसे, नाना पाटील, फडके, अत्रे, खांडेकर, गोवर्धन पारीख असे काही फार चांगले वक्ते त्यांच्या ऐन बहरात मी ऐकलेले आहेत. यांपैकी प्रत्येकाची शैली व्यक्तीविशिष्ट आणि स्वतंत्र होती. पण तसे पाहिल, तर प्रत्येकाची वक्तृत्वशैली शब्दातीतच म्हणायला हवी. वि. ह. कुळकर्णी हे या नामावलीतील वक्ते नव्हेत आणि पट्टीचे वक्ते तर नव्हेतच नव्हेत. एखाद्या विषयावरचे त्यांचे संपूर्ण व्याख्यान मी कधी ऐकल्याचे स्मरत नाही आणि परिचितांजवळ चौकशी केली असता, ज्यांनी त्यांचे असे एखादे व्याख्यान ऐकले होते, त्याविषयी त्यांचा अभिप्राय फारसा अनुकूल दिसत नाही. त्याचे एक कारण असे असावे की गंभीर विषयावरच्या अभ्यस्त व्याख्यानात त्यांना हलक्याफुलक्या नर्म विनोदाची पेरणी कदाचित करता येत नसेल. पण प्रश्नमालेसाठी मात्र त्यांच्यासारखा निष्णात, चतुरस्र वक्ता शोधून सापडायचा नाही. हे माझे अगदी अभ्यस्त मत आहे. पाच-दहा मिनिटांच्या भाषणात वाक्योवाक्यी नर्मविनोदाची पेरणी करीत प्रश्नोत्तरे देताना ते अशी बहार उडवून देतात की विचारता सोय नाही. या प्रकारचे वक्तृत्वही तसे एकूण दुर्मिळच.

पण साहित्यिक वा वक्ता यापेक्षाही विठ्ठलराव अधिक मोठे आहेत ते एक आतिथ्यशील सदगृहस्थ व उमद्या मनोवृत्तीचे मित्र म्हणून या स्वभावविशेषांमुळे त्यांनी असंख्य दिलदार मित्र जोडले असणार. विठ्ठलरावांनी केळकर-कोल्हटकरांपासून, अत्रे-माडखोलकरांपर्यंत लेखकांच्या कैक पिढ्या पाहिल्या आहेत. आणि त्यांच्यापैकी कित्येक त्यांचे आप्त वा मित्र आहेत. गेल्या अर्धशतकाचा साहित्यिक इतिहास तर त्यांना मुखोद्गत आहे. ते आत्मचरित्र लिहोत वा न लिहोत, पण त्यांच्या गाठी असंख्य साहित्यिकांच्या आठवणी आजवर गोळा झालेल्या आहेत. ही साहित्यिक स्मरणे त्यांनी लेखरूपात जागवली तर मराठी

साहित्याचा एक चालता– बोलता– हसता असा अर्धशतकेतिहास सहज उपलब्ध होऊ शकेल. यात पुन्हा स्मरण जागविण्याव्यतिरिक्त अन्य कसले म्हणून श्रम नाहीत. तेव्हा प्राप्त परिस्थितीत हे मागणे लई नाही असे वाटते.

* *

अनुक्रमणिका

# कशेळीज विठ्ठलराव

## वा. रा. ढवळे

प्रा. वि. ह. कुळकर्णी ह्यांचं मूळ गाव कशेळी. रत्नागिरी जिल्ह्यात असलेल्या राजापूर तालुक्यातील हे एक खेडेगाव. अरबी समुद्र या गावापासून मैल दीड मैल दूर. गावात विहिरींचे पाणी आणि तेही विपुल. त्यामुळे हे गाव निसर्ग-सौंदर्याने समृद्ध. निसर्गाचे वरदानच जणू या गावाला मिळालेले असावे ! हापूस, पायरी, भोपळी, रायवळ वगैरे विविध जातींच्या आंब्यांची झाडे, फणस-कापे बरके, नारळी पोफळी, रातांबे, काजू, आवळे वगैरे सर्वप्रकारची फळझाडे व पारिजात, मोगरा, चमेली, बटमोगरा, नादेडी, कणेरी, झेंडू, सोनचाफा, पांढरा चाफा, सुरंगी वगैरे फुलझाडांनी संपन्न असे हे गाव.

लक्ष्मीनारायण व सूर्यनारायण (कनकादित्य) यांची प्रशस्त आवारे असलेली दोन देवळे. भारतात एकंदर सूर्याची देवळे आठ किंवा दहा असतील. त्यांपैकी एक कशेळी येथे आहे. प्रभासपट्टणहून महागिरीने (मोठा पडाव) आणीत असलेल्या व ती महागिरी वादळात सापडून फुटल्यामुळे कशेळीच्या किनाऱ्याला लागलेल्या त्या कुळकुळीत काळ्या मूर्तीची पूजा-अर्चा कनका या देवदासीने केली म्हणून सूर्याच्या त्या मूर्तीला व त्याच्या देवळाला कनकादित्य हे नाव पडले. दोन्ही देवळांच्या उत्सव समारंभात अनुक्रमे कोकणातील व घाटमाथ्यावरील कोल्हापूर, साताऱ्याकडील तमासगिरांचे तमाशे नाचविण्यात येतात. यावरून कशेळी गावातील मंडळींची कलासक्ती दिसून यावी. तसेच महापंडित प्रा. राजारामशास्त्री भागवत, इतिहास-संशोधक पंडित त्र्यंबक शंकर शेजवलकर, नाटककार व कथालेखक विठ्ठल सीताराम गुर्जर हे सर्व विद्वान कशेळीचे. अनेक ख्यातनाम शास्त्रीय संगीत गायकांनी ज्यांची मुक्त कंठाने स्तुती करावी असे तबलावादक सखारामपंत भागवत हे कशेळीचेच. असा वारसा लाभलेल्या गावात विठ्ठलरावांचा जन्म झाला. त्यांना तो वारसा मिळाला व त्यांनीही तो उत्तम जतन करून ठेवला हे विशेष.

कशेळी हे माझे आजोळ. माझे प्राथमिक शिक्षण तेथेच झाले. प्रत्येक सुट्टीत मी राजापूराहून कशेळीला जात असे. त्यामुळे विठ्ठलराव मला परिचित होते. मुलींच्या शाळेत ते शिक्षक असून शिवाय ते मधूनमधून लेखही लिहीत व त्यांचे

लेख मुंबईच्या नियतकालिकांत छापून येत असत. त्यामुळे त्यांचे मला विशेष आकर्षण वाटे.

मी १९२७ साली मॅट्रिक झाल्यावर मुंबईला आलो तो जगन्नाथाच्या चाळीत. विठ्ठलराव आपल्या चुलत्याकडे जगन्नाथच्या चाळीतच कित्येक वर्षे राहत होते. जवळच असलेल्या धोबी तलावाजवळ सेंट झेवियर्स कॉलेज होते. विठ्ठलराव त्याच कॉलेजमधून बी. ए. व काही वर्षांनंतर एम ए. झाले. बी. ए. झाल्यावर ठाकूरद्वार-येथील कमलाबाईंच्या मुलींच्या शाळेत त्यांना शिक्षकाची नोकरी मिळाली होती. मी मुंबईला आलो त्याच वेळी विठ्ठलराव जगन्नाथराव चाळ सोडून गोरेगाव येथे राहायला गेले. त्यावेळी गोरेगाव (पश्चिम)ला फारच थोडी वस्ती होती. स्टेशन-जवळच असलेल्या मारवाड्याच्या चाळीत ते राहत. जगन्नाथाच्या चाळीतील आणखी एक-दोन बिऱ्हाडे तेथे गेली. विठ्ठलराव व त्यांचे वडील बंधू त्या चाळीच्या पहिल्या मजल्यावर राहत. मी तेथे जाऊन त्यांना भेटून आल्याचे आठवते. त्यानंतर काही वर्षांनी ते दादरला आले.

वाचन व लेखन ही दोनच व्यसने विठ्ठलरावांना त्यावेळी होती. अन्य कसलेही व्यसन त्यांना नव्हते व आजही नाही. त्यावेळेस पुस्तके हातानूनच आणावी लागत. ब्रीफकेसेस त्यावेळी वापरात येत नव्हत्या. प्रा. मा. दा. आळतेकर हे कापडाच्या पिशवीतून पुस्तके नेत. भाजी आणण्यासाठी वापरायच्या पिशव्यातून पुस्तके नेणे विठ्ठलरावांना पसंत नसे. त्यामुळे सहा-सात पुस्तकांची चळत खांद्यावरून ते मुंबईला नेत व गिरगावात आणत. त्यावेळी ते धोतर नेसत. ते पेटीट लायब्ररीत नियमाने जात. कमलाबाईंच्या मुलींच्या शाळेत ते संस्कृत, मराठी व इंग्रजी हे विषय शिकवीत. त्या वेळी लोकलला विशेष गर्दी नसे. त्यामुळे गोरेगावला हातात पुस्तके घेऊन जाणे फारसे अवघड नसे. कमलाबाईंच्या शाळेतील मुली विठ्ठलरावांच्या शिकवण्यावर बेहद्द खूष असत. त्या त्यांना 'मास्तर' असे संबोधीत. मास्तरांबद्दल त्यांना आदर वाटे. शाळेच्या जवळच विविध वृत्त, अरुण, तुतारी, वगैरे नियतकालि-कांची कार्यालये होती. त्यांच्या संपादकांच्या आग्रहावरून विठ्ठलराव त्या नियत-कालिकांत लेख लिहीत. विठ्ठलरावांच्या लेखनावर श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या लेखन-पद्धतीचा बराच परिणाम झालेला होता. त्यामुळे विठ्ठलराव बव्हंशी विनोदी लेख लिहीत. त्यांच्या विनोदाला उपरोधाची झालर असे. त्यांची भाषणे रोचक होत. 'ब्रेन ट्रस्ट' चा कार्यक्रम त्यांच्या समयसूचक उत्तरांमुळे विशेष रंगे.

विठ्ठलराव हे झेवियर्सचे विद्यार्थी. त्यांच्याबरोबर कॉलेजात त्या वेळी खं. सा. दांडेकर, के. नारायण काळे, अनंत काणेकर, हरीश नारगोळकर ही पुढील आयुष्यात विविध क्षेत्रांत प्रसिद्धीस आलेली मंडळी होती. इ. स. १९२३ साली दांडेकरांनी सेंट झेवियर्स कॉलेजात त्या कॉलेजच्या गोऱ्या प्रिन्सिपॉलांच्या परवान-

गीने ' मराठी वाङ्मय मंडळाची ' स्थापना केली.

विठ्ठलरावांचे इंग्रजी व मराठी वाङ्मयाचे वाचन बऱ्यापैकी असल्याने चार शब्द धिटाईने बोलण्याचा सभाधीटपणा त्यांच्याकडे होता. त्यामुळे दौंडकर, मंडळाच्या कार्यक्रमासाठी प्रामुख्याने विठ्ठलरावांवर विसंबून राहत. मराठी वाङ्मय मंडळाचा पहिला कार्यक्रम वामन मल्हार जोशी यांच्या ' रागिणी ' ह्या कादंबरीवरील भाषणाने करण्याचे निश्चित झाले. वक्ते होते के. नारायण काळे. वाङ्मय मंडळाचे कायमचे अध्यक्ष प्रा. ना. के. भागवत हे होते. पण या कार्यक्रमाच्या वेळी गणिताचे प्राध्यापक के. जा. दातार यांची अध्यक्षपदी मुद्दाम नियुक्ती करण्यात आली होती. कारण एक तर वामन मल्हारांच्या मूळ गोरेगावचे ते राहणारे होते दुसरे असे की ' रागिणी 'चे हस्तलिखित त्यांनी वाचलेले होते. मराठी वाङ्मय मंडळाचा पहिला कार्यक्रम म्हणून व्याख्यानाला बरीच गर्दी झाली होती. बाहेरच्या कॉलेजातील विद्यार्थीसुद्धा बरेच आले होते. के. नारायण काळे यांनी ' रागिणी ' कादंबरीचे पुस्तक हातात धरून मोठ्या नाट्यमय ' रीतीने व्यासपीठावर प्रवेश केला. ' रागिणी ' कादंबरीचे कथानक ते सांगू लागले. श्रोत्यांना ते कंटाळवाणे वाटले. " आम्हाला कथानक नको, कादंबरीसंबंधी काय बोलायचे ते बोला." अशी मागणी विद्यार्थी करू लागले. काळे आपल्याच बोलण्याला चिकटून राहिले तेव्हा श्रोत्यांनी जोरजोरात बाके वाजवून आपली तीव्र नापसंती व्यक्त केली. अध्यक्षांनीही काळे यांना तोच सल्ला दिला. काळे चिडले. त्यांनी हातातील पुस्तक टेबलावर जोराने भिरकावून दिले व मोठ्या नाट्यमय रीतीने व्यासपीठा-वरून खाली उतरून ते निघून गेले.

मराठी वाङ्मय मंडळाच्या पहिल्याच कार्यक्रमाचा अशा अनपेक्षित रीतीने फज्जा उडालेला पाहून कार्यवाह दौंडकरांचा सारा उत्साहच मार मावळून गेला, पण त्याच वेळी दौंडकरांना धीर दिला तो विठ्ठलरावांनी ! पुढील व्याख्यानाचा विषय ' राम गणेश गडकरी यांचा विनोद ' हा जाहीर करण्याची सूचना दौंडकरांना विठ्ठलरावांनी केली. दौंडकर व्यासपीठावर भीतभीतच चढले व पुढील व्याख्यानाचा विषय व वक्त्याचे नाव जाहीर केले. काणेकर हे दौंडकरांचे स्नेही होते. पण त्या वेळी ते गप्पच होते.

राम गणेश गडकरी यांचे निधन होऊन तीन-चार वर्षे लोटली होती. पण त्यांच्या वाङ्मयाची लोकप्रियता कमी न होता उत्तरोत्तर वाढतच होती. त्यामुळे सेंट झेवियर कॉलेजमधील वाङ्मयप्रेमी विद्यार्थीच नव्हेत तर विल्सन व एलफिन्स्टन कॉलेजमधील विद्यार्थीही व्याख्यानाला गर्दी करतील अशी अपेक्षा होती. ती खरी ठरली. व्याख्यानाचा दिवस उगवला. व्याख्यानाची वेळ जशी जवळ येऊ लागली तशी श्रोत्यांची गर्दी वाढू लागली. सेंट झेवियर्स कॉलेजची पहिल्या मजल्यावरील

मोठी क्लासरूम गच्च भरून गेली होती. काही श्रोते बाहेर उभे होते अध्यक्षस्थानी प्रा. ना. के. भागवत होते. विठ्ठलराव अध्यक्षांसमवेत जेव्हा व्यासपीठावर चढले, तेव्हा बाके वाजवून त्यांचे स्वागत झाले. किरकोळ देहयष्टीची व धोतरातील ठेंगू मूर्ती पाहिल्यावर "गडकऱ्यांवर हा मुलगा काय बोलणार कपाळ!" अशी बहुतेक श्रोत्यांची सुरुवातीला प्रतिक्रिया झाली! पण जेव्हा त्या किरकोळ मूर्तीने तोंड उघडून गडकऱ्यांच्या विनोदाचे सोदाहरण विश्लेषण व दर्शन आपल्या खुसखुशीत व अस्खलित भाषेत व संथ लयीत सुरू केले तेव्हा श्रोते हळूहळू मंत्रमुग्ध होऊ लागले. कुठेही न अडखळता व श्रोत्यांना कंटाळा येईल असे न बोलता विठ्ठलरावांच्या वक्तृत्वाची गाडी जेव्हा सुरू झाली तेव्हाच अर्धी लढाई त्यांनी जिंकली होती. विठ्ठलराव एक तासभर बोलले. श्रोते रंगून गेले होते. त्यांनी बाके वाजवून आपल्या पसंतीचे शिक्कामोर्तब केले. दौंडकरांचा जीव अक्षरशः भांड्यात पडला! विठ्ठलराव व्यासपीठावरून खाली आल्यावर दौंडकरांनी त्यांना जवळजवळ मिठीच मारली! त्यांचे अभिनंदन केले. मराठी वाङ्मय मंडळाची गेलेली अब्रू पुन्हा परत आली होती. विठ्ठलरावांचे हे भाषण पुढील जीवनात त्यांनी दिलेल्या अनेक जाहीर भाषणांची जणू नांदीच ठरले होते!

मुंबई मराठी साहित्य संघाच्या ज्येष्ठ व श्रेष्ठ कार्यकर्त्यांत विठ्ठलरावांची गणना होई. साहित्य संघाच्या विद्यमाने मराठी वाङ्मयीन परीक्षांचे वर्ग साहित्य संघाच्या अगदी सुरुवातीपासून घेण्यात येत होते. त्या वर्गाचे व त्या वर्गांच्या परीक्षेचे नेतृत्व माझ्याकडे होते. इंटर व बी. ए. समकक्ष असे ते वर्ग होते. त्या वर्गांना विद्यार्थ्यांची उपस्थिती चांगली असे. त्या वर्गाच्या अभ्यासक्रमात जी पुस्तके लावलेली असत, ती शिकवण्यासाठी इंग्रजी व मराठी प्राध्यापकांचे सहकार्य घेण्यात येई. विठ्ठलराव त्या वर्गांना मोठ्या आस्थेने व कळकळीने शिकवीत. त्या वर्गात सर्व वयाचे प्रौढ विद्यार्थी-विद्यार्थिनी असत. म्युनिसिपालटीच्या शाळांतील शिक्षक व शिक्षिका यांचा प्रामुख्याने भरणा असे. शुभ्र पांढऱ्या लांब मिशा व दाढी असलेले एका मराठी शाळेचे मुख्याध्यापकही साहित्य विशारदच्या सुरुवातीच्या तुकडीत होते. ते नियमितपणे वर्गात येत. विठ्ठलराव तो वर्ग शिकवून बाहेर आले व एका खोलीत आम्ही सर्व शिक्षक बसलो होतो त्यात येऊन मिसळले. विठ्ठलराव आलेले पाहून आम्ही सर्वच त्यांच्याकडे पाहू लागलो. मी वर्गाचा संचालक असल्याने मला उद्देशून पण इतरांनासुद्धा ऐकू जाईल अशा पद्धतीने गंभीरपणाने ते बोलू लागले,

"प्रिन्सिपॉलसाहेब, आमच्या शिकवण्यावर देखरेख करण्यासाठी आपण अलीकडे काही पर्यवेक्षक नेमले आहेत काय?"

"नाही. तसे करण्याची गरज नाही. कारण तुम्ही ख्यातनाम शिक्षक आहात.

तुमच्या शिकवण्यावर देखरेख कोण करणार ? तुमचा काहीतरी गैरसमज झालेला दिसतोय." मी तितक्याच गंभीरपणे उत्तर दिले.

"मग वर्गात दाढी-मिशा वाढलेले गृहस्थ होते ते कोण ?"

"अहो, ते विद्यार्थी आहेत." मी त्यांना उत्तर दिले. पण प्रश्नातील खोच नंतर ध्यानात आली व आम्ही सर्व शिक्षक हसू लागलो.

'प्रतिभा' मासिकात विठ्ठलराव 'हास-परिहास' हे सदर लिहीत. तसेच 'चांदण्यातील गप्पा' हे 'ज्योत्स्ना' मासिकातील सदर ते 'सुहास' ह्या टोपण नावाने लिहीत. या दोन्ही सदरांतील बाह्यतः विनोदी वाटणारा पण आतून उपरोधिक टीकांनी ओतप्रोत भरलेल्या लेखनाचा नमुना ज्यांना परिचित आहे, त्यांना पर्यवेक्षकाची कथा काही नवीन वाटणार नाही.

'एका पिढीचे आत्मकथन' (वा. रा. ढवळे गौरवग्रंथ १९७५) या पुस्तकात वि. ह. कुळकर्णी यांनी पृ. ६१ वर आपल्या वाङ्मयाचा विकास कसा झाला, कोणत्या प्रेरणांमुळे आपण लेखनप्रवृत्त झालो वगैरेसंबंधी संपादकांच्या मागणीवरून एक निवेदनात्मक लेख लिहिला आहे. त्यात ते सुरुवातीलाच लिहितात, "ग्रंथकार म्हणून प्रसिद्ध होण्याचे असे एक तंत्र असते, त मला अजून साध्य झाले नाही." इ. स. १९७४ च्या आसपास त्यांनी ते निवेदन लिहिले आहे. त्यानंतर त्यांच्या वयाला ७५ वर्षे पुरी झाल्यावर साने गुरुजी विद्यालयाचे प्राचार्य श्री. प्रकाश मोहाडीकर यांच्या पुढारीपणाने विठ्ठलरावांचा अमृतमहोत्सव मोठ्या थाटाने दादरच्या बालमोहन विद्यालयाच्या सभागृहात साजरा झाला. त्यानंतरच्या काळातच केव्हातरी 'ग्रंथकार होण्याचे तंत्र' त्यांना सापडलेले दिसते. कारण अच्युत बळवंत कोल्हटकर यांचे चरित्र व 'बर्नार्ड शॉ' हे त्यांचे दोन मोठे ग्रंथ प्रसिद्ध झालेले आहेत. शिवाय 'ग. त्र्यं. माडखोलकर' यांचे चरित्रही त्यांनी लिहून पुरे केलेले असून ते प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

विठ्ठलराव व त्यांचे बंधू सदाशिवराव ऊर्फ नाना यांना दीर्घायुष्याचे वरदान लाभलेले आहे. आई व वडील यांचा वारसा जणू त्यांनाच मिळालेला दिसतो. कारण त्यांचे दोन लहान बंधू अकाली वारले. त्यांची पत्नी अपघाताने निधन पावली. ही घटना त्यांचा अमृतमहोत्सव घडण्यापूर्वी घडली. विठ्ठलराव एकाकी झाले. पण ज्या संयमाने विठ्ठलरावांनी पत्नीच्या निधनाची दुर्घटना सहन केली तो संयम मोठा कौतुकास्पद म्हणावा लागेल. विठ्ठलरावांनी आपले मन वाचन व लेखन यात गुंतविल्यामुळे आपल्या दुःखावर व एकाकीपणावर त्यांनी विजय मिळविला आहे, यात काही शंका नाही. मात्र त्यांनी आपल्या वयाची ८० वर्षे ओलांडलेली असल्यामुळे त्यांना आता सांभाळायला हवे ! सांभाळायला हवे !

* *

अनुक्रमणिका

# ‘ दादरचे रावसाहेब रानडे ’

## प्रभाकर पाध्ये

प्रा. वि ह. कुळकर्णी यांच्या मी इतका जवळ होतो आणि १९५५ साली मी मुंबई सोडून दिल्लीला गेल्यामुळे असा काही दूर झालो की विठ्ठलरावांच्या निवडक, ठोस आठवणी मनात येणे होतच नाही. आठवते ते स्नेहशील, प्रेमभरले वातावरण.

तसा मी भाग्यवानच म्हणायला हवा. माझा मराठीचा अभ्यास जवळजवळ शून्य असताना १९३४ साली ‘ आजकालचा महाराष्ट्र ’ यासारख्या पुस्तकाचे लेखन करण्याचे भाग्य मला लाभले आणि त्यात मला सहाय्य करण्यासाठी, मार्गदर्शन करण्यासाठी प्रा. न. र फाटक, प्रा. रा. भि. जोशी, श्री. गं. दे. खानोलकर आणि विशेषत: प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्या ओळखीचा लाभ झाला.

त्यात विठ्ठलरावांची ओळख ही वैशिष्ट्यपूर्ण ठरली. त्यावेळी विठ्ठल-रावांना ‘ दादरचे रावसाहेब रानडे ’ म्हणत आणि हे अभिधान अतिशय अन्वर्थक होते. रावसाहेब ज्याप्रमाणे होतकरू समाजसेवकांना हाताशी धरून, त्यांना स्फूर्ती देऊन, त्यांना विधायक मार्गदर्शन करून सार्वजनिक कार्याची उभारणी करीत आणि समाजसेवक निर्माण करीत, त्याप्रमाणे विठ्ठलराव होतकरू लेखकांना हाताशी धरून त्यांच्यातून लेखक निर्माण करण्याचे कार्य अगदी सहजतेने करीत. तो त्यांचा स्वभावच होता आणि अधिकारही होता. आधुनिक महाराष्ट्राचा इतिहास आणि वाङ्मय यांचा, विठ्ठलरावांचा अभ्यास सूक्ष्म, चिकित्सक आणि नव्याचा शोध घेणारा होता. अंगभूत विनोदबुद्धीमुळे या इतिहासातली अधुस्थाने त्यांना चटकन दिसत आणि त्यांच्याकडे ते खेळकर सहानुभूतीने पाहू शकत. अद्यापही त्यांची ती शक्ती कार्यान्वित आहे याचा पुरावा त्यांच्या अच्युत बळवंत कोल्हटकरांवरील पुस्तकाने येतो.

आणखी असे की विठ्ठलरावांचा त्यावेळचे प्रभावशाली आंग्ल लेखक शॉ, वेल्स, चेस्टर्टन यांचा सखोल आणि आत्मीय अभ्यास होता. ‘ आजकालचा महाराष्ट्र ’ या पुस्तकाने मला तसे महाराष्ट्र-अभ्यासक विठ्ठलरावांशी जोडले. पण खरा मजबूत धागा विठ्ठलरावांचा मूळचा स्नेहशील, सहानुभूतीमय स्वभाव होता,

यामुळेच त्यांनी मला हाताशी धरले आणि 'आजकालचा महाराष्ट्र'च्या लेखनास सुसज्ज केले. अगदी खरे बोलायचे म्हणजे विठ्ठलरावांनी मला 'हात धरून लिहायला शिकवले.' लेखक म्हणून आज जो काही मी आहे त्याची मुळे वि. हं.च्या स्नेहशील आणि सर्जनशील मार्गदर्शनात मिळतील.

पण एवढेच नाही. 'आजकालचा महाराष्ट्र' या पुस्तकाचे लेखन एका अरिष्टातून गेले. त्या अरिष्टातून मला निभावून नेण्याचे काम श्री. गं. दे. खानोलकर आणि वि. ह. कुळकर्णी यांनी केले. विठ्ठलरावांनी त्यावेळी मला जो आधार दिला त्याला बरोबर उपमा नाही. त्या अरिष्टाचा इतिहास सांगण्याचे स्थान हे नाही आणि त्याची गरजही नाही. पण त्याची झलक 'आजकालचा महाराष्ट्र'च्या प्रस्तावनेत मिळेल. ती प्रस्तावना – सारीच्या सारी – विठ्ठलरावांनी लिहिलेली आहे. मी तेव्हा अगदी नवीन होतो. अननुभवी होतो. विठ्ठलराव म्हणाले, "हे प्रकरण जरा कठीण आहे. ते माझ्याकडे सोपवा. या प्रस्तावनेत या पुस्तकाच्या जन्मवेदनांची थोडी छटा उमटायला हवी. अगदी योग्य प्रमाणात." असे म्हणून त्यांनीच ही प्रस्तावना लिहिली.

विठ्ठलरावांच्या स्नेहशील औदार्याचे आणखी एक उदाहरण सांगतो. चेस्टर्टनचे निधन झाले तेव्हा मी 'प्रतिभा' पाक्षिकात काम करत होतो. चेस्टर्टन त्या वेळच्या इंग्रजी वाङ्मयातली एक मातबर असामी. त्याच्यावर लिहिणे भाग होते. पण मी चेस्टर्टनचा अभ्यास जवळजवळ काहीच केलेला नव्हता. (फक्त 'शॉ'वरील त्याचे पुस्तक मी वाचलेले होते) विठ्ठलराव माझ्या मदतीस धावले. त्यांनी 'रत्नाकर' मासिकात पूर्वी प्रसिद्ध झालेले आपले लेख मला दिले व ते वाचून मी माझा लेख सजविला. माझ्या 'प्रकाशातील व्यक्ती' या पुस्तकात तो प्रसिद्ध झाला. या पुस्तकाला लिहिलेल्या प्रस्तावनेत या लेखाबद्दल विठ्ठलरावांनी लिहिले – "आश्चर्याची गोष्ट अशी की, मी लिहिलेले लेख वाचून त्यांनी चेस्टर्टन-वर माझ्या लेखापेक्षाही अधिक सुंदर लेख लिहिला. एवढेच नव्हे, तर चेस्टर्टन-वरील माझ्या लेखात जी उणीव राहिली आहे, ती त्यांनी आपल्या लेखात भरून काढली." असे हे झाडाचे औदार्य.

नंतरच्या काळात विठ्ठलराव प्राध्यापक झाले आणि मी दैनिकाचा संपादक झालो. आम्ही पूर्वीसारखे भेटू शकत नव्हतो. शनिवारी रात्री त्यांच्याकडे झोपायला जाऊन मनमुराद गप्पा मारण्याचा आमचा अधूनमधूनचा क्रमही बंद पडला. दैनिकाचा संपादक झाल्याने माझे लक्ष वाङ्मयापेक्षा राजकारणाकडे अधिक वळले. राजकारणाला विठ्ठलरावांपाशी वाङ्मयाच्या मानाने दुय्यमच स्थान होते. राजकारणात त्यांना रस होता, पण तो वाङ्मयात शुद्ध होऊन, त्यांच्या अंतःकरणात विरघळे. शिवराम महादेव परांजपे, अच्युतराव कोल्हटकर, बर्नार्ड शॉ – यांची

राजकीय प्रेरणा प्रबल, पण तिचा वाङ्मयीन आविष्कार करण्यात त्यांना आत्मपूर्ती लाभे. विठ्ठलरावांचे बरेचसे तसेच होते. त्यांनी अलीकडेच 'अच्युत बळवंत कोल्हटकर' आणि 'बर्नार्ड शॉ' यांच्यावर पुस्तके प्रसिद्ध केली हा निवळ योगायोग नव्हे. तो त्यांच्या अंतःकरणाचा अभिजात आविष्कार. त्यांनी मागे मुंबई मराठी साहित्य संघासाठी शिवराम महादेव परांजपे यांच्यावर व्याख्याने दिली होती. त्यांचे त्यावेळीच पुस्तक निघाले असते तर मराठी वाङ्मय एका सुरेख पुस्तकाला मुकले नसते.

* *

अनुक्रमणिका

# उत्कृष्ट शिक्षक

## कुलगुरू प्रा. राम जोशी

"अध्यक्ष महाशय, प्रा. विठ्ठलराव आणि बंधू भगिनींनो ! मी विठ्ठलरावांचं रुईया महाविद्यालयातला विद्यार्थी. त्यांचा विषय घेऊन जरी बी. ए. झालो नाही; तरीदेखील ज्यांच्या शिकवणीचा व अध्यापन - कौशल्याचा माझ्यावर खूप मोठा प्रभाव पडला, अशा प्राध्यापकांपैकी विठ्ठलराव एक आहेत. रुईया महाविद्यालयातल्या चार वर्षांपैकी तीन वर्षे त्यांनी आम्हाला इंग्रजी शिकवलं. एक वर्षं स्ट्राचीचे निबंध व दोन वर्षं शेक्सपिअरची नाटकं. त्यांची शिकवण्याची हातोटी त्या वेळेला विद्यार्थी असताना आम्ही अनुभवली. त्यावरून उत्कृष्ट शिक्षक कसा असावा ह्याचं बाळकडू आम्हाला त्या वेळी विद्यार्थीदशेत मिळालं असं म्हणावयास हरकत नाही. रुईयातील 'staff common room' हे त्या वेळी नुसत्या त्या महाविद्यालयाचंच वैभव नव्हतं तर मुंबई शहरातील उच्च शिक्षण जगतातील ती एक शान होती. न. र. फाटक, गोवर्धनदास पारीख, द. के. केळकर, विठ्ठलराव कुळकर्णी, किती नावं मी तुम्हाला सांगू ! अशा त्या ऐन बहरामध्ये आलेल्या त्या शिक्षकांच्या ऐन उमेदीच्या काळामधील चार वर्षं आमच्या रुईया महाविद्यालयामध्ये गेली. आज हातून जर काही बरं काम होत असलं तर त्याचं सगळं श्रेय त्या चार वर्षांमध्ये हे जे उत्तम — सर्वार्थाने उत्कृष्ट शिक्षक आम्हाला लाभले त्यांच्या चरणी वाहायला पाहिजे.

चांगल्या शिक्षकाचा कळत न कळत विद्यार्थ्यांवर जो प्रभाव पडतो तो आयुष्यभर पुसला जात नाही. प्रा. कुळकर्णी ह्यांच्याकडून उत्तम शिक्षक होण्यासाठी काय काय लागते ह्याचे अगदी प्राथमिक धडे आम्हाला मिळाले. जे शिकवायचे त्याची उत्तम तयारी असायला पाहिजे, जे आपल्याला शिकवायचंय ते सहज सोपं करून ज्याला ते शिकवायचं त्याची ते घेण्याची कुवत लक्षात घेऊन त्याला शिकवायचं व ते रोचक करून शिकवायचं, त्यालाही विषयामध्ये रस असला पाहिजे, आणि आपल्या शिष्यांमध्ये खरोखरी जिवंत असा जिव्हाळा आपल्याला दिसायला हवा, हा सर्व उत्कृष्ट शिक्षकाच्या गुणांचा अनुभव आम्हाला विठ्ठलरावांच्या

ठिकाणी आला. काही काही वेळेला त्यांच्या ह्या उत्तम अध्यापन - कौशल्यामुळे विद्यार्थ्यांमध्ये त्यांनी जी लोकप्रियता मिळविली होती त्याच्यामुळे अवघडल्यासारखे वाटायला लावणारे प्रसंगदेखील महाविद्यालयात यायचे. मला आठवतं की आमच्या तुकडीला विठ्ठलराव शेक्सपिअरचे नाटक शिकवतायत, दुसऱ्या तुकडीला तेच नाटक दुसऱ्या एका शिक्षकाला शिकवायला दिलं आहे. पण विठ्ठलरावांची विद्यार्थी-प्रियता एवढी, शिकवण्याची हातोटी इतकी विलक्षण की त्या दुसऱ्या तुकडीतील सर्व विद्यार्थी त्यांच्या वर्गात येऊन बसत. दोन विद्यार्थ्यांसाठी बनवलेली ती बाकं–चार चार मुलं-मुली दाटीदाटीने तेथे बसत आणि जे–जे म्हणून महत्त्वाचे वाटेल ते ते एकीकडे लिहून घेताहेत, व दुसरीकडे मधूनमधून विठ्ठलराव नर्म विनोदाची जी पेरणी करताहेत त्यामुळे हास्यस्फोटही वर्गात होताहेत त्याच्यामध्ये सहभागी होताहेत. एकीकडे असं सहभागी व्हायचं व दुसरीकडे महत्त्वाचे जे असेल ते लिहून घ्यायचं ह्याच्यामध्ये मग विद्यार्थ्यांची तारांबळच व्हायची. काही विद्यार्थ्यांना बसायला जागादेखील मिळत नसे व अक्षरशः भिंतीला टेकून उभं राहावं लागे व अशा अवस्थेतदेखील ती मुलं लिहीत असत व शेजारच्या वर्गात मात्र चिटपाखरूदेखील नसायचं असे प्रसंगही आम्ही पाहिले आहेत. काही वेळेला उपस्थितीच्या दंडुक्यामुळे चार-पाच विद्यार्थी बसलेच तर 'हर हर महादेव' च्या गर्जना तिकडून हमखास ऐकू यायच्या व आम्ही शिक्षक आणि विद्यार्थी ह्यांच्यात वर्गयुद्ध पेटल्याचं समजायचो. विठ्ठलरावांना विद्यार्थ्यांच्याकडून अशा प्रकारचे स्वागत उभ्या आयुष्यात कधी घ्यावे लागले नसणार.

शाळेमध्ये त्यांनी शिक्षकी पेशा पत्करला त्याला किती वर्षं झाली असतील त्याचा विचार करा. त्यावेळेला त्यांच्या हाताखाली शाळेत शिकलेल्या विद्यार्थिनींनी आज चाळीस वर्षांनंतर इतकं सद्‌गदित होऊन आजच्या शिक्षकाबद्दल बोलावं यातच मित्रांनो, आमच्या व्यवसायातील जर काही कृतार्थता असली तर ती हीच होय. आमच्या व्यवसायामध्ये दुसरं काहीच आम्हाला मिळत नाही व त्याच्याबद्दल ज्यांना कमीत कमी खंत असते असेच लोक जास्तीत जास्त यशस्वी होतात. आमच्या गाठोड्यात काय आलं, आमच्या कडोसरीला किती लागलं हे महत्त्वाचं नाही. कधीतरी पाच-पंचवीस वर्षांपूर्वी शिकून गेलेला विद्यार्थी किती आपुलकीने व आदराने बोलतो व त्याच्या आठवणी कशा प्रकारच्या आहेत हे महत्त्वाचं. मला आठवतं दोन-तीन वर्षांपूर्वी एका माध्यमिक शिक्षकाने त्याला राष्ट्रपती-पदक मिळालं म्हणून होणाऱ्या समारंभाचे अध्यक्ष म्हणून मला बोलावलं व दहा-पंधरा वर्षांपूर्वी त्यांच्या हाताखाली शिकून गेलेले अनेक विद्यार्थी तेथे बोलले. त्या सर्व विद्यार्थ्यांनी आपली एक न विसरलेली आठवण सांगितली व ती म्हणजे त्या शिक्षकाने आम्हाला कसं मारलं. सत्काराच्या प्रसंग लक्षात घेऊन त्या माराचा त्यांना कसा उपयोग

झाला हे सांगून त्या प्रसंगाशी जुळवून घेतलं. मी ती सर्व भाषणं ऐकत असताना उगाचच शरमल्यासारखा होत होतो, की ज्या शिक्षकाला राष्ट्रपती-पदक मिळालं त्या शिक्षकाबद्दल त्याच्या विद्यार्थ्यांच्या लक्षात राहिलेली एकच गोष्ट म्हणजे त्याच्या हातून खाल्लेला मार! राष्ट्रपती-पदक सुद्धा नेहमी योग्य स्थानी जातं असं नाही.

माझा आणखी एक अनुभव सांगतो. ज्या शिक्षकाच्या वर्गात विद्यार्थी नसल्याने स्मशान शांतता असावयाची किंवा ज्यांच्या वर्गातून हरहर महादेवच्या आरोळ्या ऐकू यायच्या ते शिक्षक मी रुईया महाविद्यालयात स्वत: शिक्षक म्हणून गेल्यानंतर काही काही वेळा असूयेने विठ्ठलरावांचा, त्यांच्या विद्यार्थिप्रियतेचा उल्लेख करावयाचे व मी त्यांना नम्रतेने म्हणायचो की यात विठ्ठलरावांचा काहीच दोष नाही. त्यांच्या लक्षात आलं नाही, की मला असं सुचवायचं होतं की यात कदाचित असूयेनं बोलणाऱ्यांच्याच शिकवण्यामध्ये वैगुण्य असण्याची शक्यता आहे. त्यांची एकदा तुम्ही जर तपासणी केलीत तर हे बदलण्याची शक्यता आहे. पुढे पाच-सहा वर्षं मी त्या महाविद्यालयात राहिलो पण अशाप्रकारच्या आत्मसंशोधनाला सुरुवात झाल्याचा प्रत्यय त्या काळात काही मला आला नाही.

मघाशी त्यांचे बंधू सदाशिवराव यांनी त्यांच्या विद्यार्थीप्रियतेबद्दल एक उदाहरण सांगितले ते म्हणजे रुईया महाविद्यालयातल्या वार्षिक स्नेहसंमेलनाच्या वेळी फिश-पॉंड वाचण्याचा कार्यक्रम. त्या कार्यक्रमाचे स्टार अॅट्रॅक्शन विठ्ठलराव. खरं म्हणजे त्या कार्यक्रमात शंभर फिश-पॉंड जर वाचले गेले तर जेमतेम पाच-पंधराच चांगले असायचे. कारण हसत-खेळत कोपरखळी देत, दुसऱ्याला त्याच्या वैगुण्याचा राग येऊ न देता उल्लेख करण हे वाटतं तितकं सोपं नाही. पण विठ्ठलराव मोठ्या खुबीने ते वाचायचे. त्यांची उपरोधी बोलण्याची पद्धत, पाहण्याची पद्धत, आविर्भाव करण्याची पद्धत सर्व काही जे वाचायचं त्याला अनुरूप. जो खरा शिक्षक असतो, तो आपल्या सगळ्या अनुभवांचा व कलांचा अध्यापनाच्या प्रक्रियेमध्ये उपयोग करत असतो. डोळ्यांचा, हातवाऱ्यांच्या, आवाजातल्या चढउतारांचा, कशा-कशाचा म्हणून त्याला उपयोग होत नाही! कारण शिक्षक हासुद्धा बऱ्याच प्रमाणात एक नट असतो व ज्या श्रोत्यांशी त्याला एक नातं जोडायचं असतं, त्यामध्ये शब्दफेकीपासून अनेक गोष्टींचा नट जसा उपयोग करतो तसाच शिक्षकालाही करावा लागतो. एखाद्या विद्यार्थिनीला फिश-पॉंड दिलेला असला तर विठ्ठलरावांना त्यामध्ये विशेष मौज वाटत असे. मग ते विद्यार्थिनीला स्टेजवर अशा रीतीने बोलवायचे, ती येत असली तरी दोन-दोन वेळेला तिचे नाव उच्चारून बोलवायचे, ती उभी राहिल्यावर नखशिखान्त तिला न्याहाळायचे व त्या चिठ्ठीमध्ये जी कोपरखळी मारली असेल जो उपरोध व विनोद असेल त्याला अनुरूप असा

आवाज व वाक्य वाचण्याची ढब उचलून विठ्ठलराव जो अभिनय करीत असत त्यामुळे दर दोन–दोन मिनिटांनी श्रोतृवर्गातून हास्याचं कारंजं किंवा हास्याचा अॅटमबॉंब फुटत असे असं म्हणावयास हरकत नाही. आणि असे तास–दोन तास मधूनमधून अॅटमबॉंब फुटत असत. परंतु लगेच दुसऱ्या क्षणाला टाचणी टाकली तरी आवाज होईल इतके शांत होत असत. कारण तितक्याच आपुलकीने ते विठ्ठलराव पढचं काय वाचताहेत हे ऐकण्यासाठी आतुर होत असत. हे ज्या शिक्षकाला जमलं, त्याच्या ताब्यात श्रोतृवर्ग आला. मी म्हणेन तेव्हा श्रोत्यांना हसवीन, म्हणेन त्या वेळेला गंभीर बनवीन, म्हणेन त्या वेळेला सर्व प्राण कानात आणून मी काय सांगतो आहे ते त्यांना ऐकायला लावीन असा त्यांना आत्मविश्वास असायचा. पण या मध्ये कुठेही बुद्धीची घमेंड नव्हती, आपली विद्वत्ता दाखविण्याचा अट्टाहास नव्हता की वक्तृत्वाचे प्रदर्शन करावयाचे नव्हते. हे सगळं आणि त्याचा सुंदर मिलाफ – सातासुरांची मिलावट म्हणतात तशी – इतका काही सुंदरपणे त्यांच्या कार्यक्रमात घडून आलेला होता की, हे सर्व अनायासे घडतंय, स्वाभाविकपणे घडतंय असं वाटे. विठ्ठलरावांच्या व्यक्तिमत्त्वामधला दिलखुलासपणा हा त्यांचा फार मोठा स्वभावविशेष आहे. अतिशय सुंदर असं हे त्यांचं व्यक्तिमत्त्व आहे.

मला ज्या तीन प्राध्यापकांच्या खूप जवळ जाण्याचे भाग्य लाभले त्यांपैकी एक सोनोपंत दांडेकर, हे मी इंटर आर्टस पास झाल्यावर रुईया महाविद्यालय सोडून एस. पी. महाविद्यालयामध्ये पुण्याला गेले. नंतर श्री. गोवर्धनदास पारीख व विठ्ठलराव कुलकर्णी या दोघांचा दोन वर्षं विद्यार्थी म्हणून व पुढे सहा–सात वर्षं त्यांचा सहकारी म्हणून रुईयात जो सहवास लाभला त्याचे संस्कार, चांगले परिणाम व त्यांच्या सुखद स्मृती या माझ्या आयुष्यामधल्या अत्यंत सुखद काळांची एक कायमची आठवण म्हणून माझ्या मनात मी जतन करून ठेवल्या आहेत. मघाशी रा. भि जोशी यांनी त्यांचा पोष्टकार्डाचा उल्लेख केला. असंच एक पोष्टकार्ड माझ्या संग्रही आहे. मला आठवतं की, स्वातंत्र्याला जेव्हा पंचवीस वर्षं पूर्ण झाली, त्या वेळेला आकाशवाणीने मला भाषण करावयास सांगितले होते. १९४२ च्या 'भारत छोडो' आंदोलनात भाग घेतलेल्यांपैकी मी एक तरुण होतो. नुकताच मॅट्रिक पास होऊन फर्स्ट इयरला आलो होतो. आणि मंतरलेल्या त्या दिवसांमध्ये जे अनेक लोक लढ्यात उतरले होते, त्यामध्ये स्वत:ला विसरलेल्या व भारावून गेलेल्या अशा तरुण पिढीचा मी एक प्रतिनिधी होतो. स्वातंत्र्याच्या रौप्यमहोत्सवी दिवसाने पुन्हा एकदा बेचाळीसच्या स्मृतींना उजाळा मिळाला व त्यावेळी मी जितका भारावून गेलो होतो तितकाच पुन्हा भारावलो. व त्या अवस्थेत मी भाषण लिहून काढले व त्याच अवस्थेत वाचले. ते अत्यंत प्रभावी झाले असावे. कारण रेडिओ-वरील भाषण संपताच अनेक मित्रांचे, श्रोत्यांचे टेलिफोन्स आले. त्यांनाही क्षणभर

त्या काळामध्ये गेल्यासारखे वाटले होते. दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशीच्या टपालाने मला विलेपार्ल्याहून आपल्या मुलीकडून विठ्ठलरावांचं असंच एक पोष्टकार्ड आलं. अत्यंत सुवाच्य अक्षरात, कमीत कमी शब्दांत जास्तीत जास्त सांगून जाणारं. ते मी माझ्या संग्रही कायमचं जपून ठेवीन. आपल्या हातून काही तरी बरं घडलं, तर ज्यांनी पाठ थोपटावी असं वाटतं, अशी जी माणसं असतात, त्या माझ्या अत्यंत आदरणीय व्यक्तींपैकी विठ्ठलराव असल्याकारणाने, त्यांच्या या अमृत-महोत्सवाच्या वेळी मला बोलण्याची संधी दिलीत, व समारंभात सहभागी होण्याचा मान मिळाला याबद्दल मी आजच्या या अमृत-महोत्सव समितीचे मनःपूर्वक आभार मानून भाषण संपवतो.''

* *

कुलगुरू प्रा. राम जोशी (मुंबई विद्यापीठ) यांनी प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्या अमृत-महोत्सव समारंभ–प्रसंगी केलेले भाषण.

(२२ जून १९७७)

अनुक्रमणिका

# ' ज्याच्या त्याच्या कातडीचा गुण '

## डॉ. व. दि. कुलकर्णी

प्रा. वि. ह. कुळकर्णी मुंबईचे. मी पुण्याचा. पुण्यात मी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या आचार्य परीक्षेचा अभ्यास करीत होतो. १९५१–५२ मधली गोष्ट असेल. डॉ. केतकरांची ' ब्राम्हण कन्या ' ही कादंबरी नेमली होती. त्या निमित्ताने मी केतकरांच्या सर्वच कादंबऱ्या अभ्यासिल्या. त्यातील वास्तवदर्शन इतके प्रभावी होते की मी केतकरांचे इतर वाङ्मयही वाचून काढले व केतकरांनी पाहिलेली माणसे आणि माणूस समजावून घेण्यात मी रमून गेलो. माणूस, माणसा-माणसांचे संबंध, जाती–गोती, धर्म–पंथ–पक्ष इत्यादींचे अंतरंग काय असते याचे रूप अस्सल मराठी भाषेत चित्रित करणाऱ्या केतकरांच्या कादंबऱ्या अगदी वेगळया जातीच्या आहेत. त्यांना आपल्या नेहमीच्या ' प्रतिभा साधनी ' मोजपट्टया लावण्यात अर्थ नाही, याची माझी खात्री झाली होती. केतकरही म्हणत असत की, " माझ्या कादंबऱ्या एखाद्या डौलदार वृक्षासारख्या नसून त्या एकमेकीत फांद्या अडकलेल्या वृक्षराजीसारख्या आहेत." हे मला पटले होते. अशा वेळी मी केतकरांच्या कादंबरी-वर उपलब्ध असलेली समीक्षा पाहत असता प्रा. वि. ह. कुळकर्णी यांचा मराठी कादंबरीवरील लेख माझ्या वाचण्यात आला. केतकरांच्या कादंबरीतील विषय, त्यातील अनुभवसृष्टी यासंबंधी प्रा. वि. ह. कुळकर्णी यांनी मोठ्या गौरवाने लिहिले आहे. पण केतकरांच्या कादंबरी-विवेचनानंतर पु. य. देशपांडे यांच्या कादंबरीकडे वळताना त्यांनी आपणास कसे वाटते ते उपमेने व्यक्त केले आहे. ते म्हणतात, " डॉ. केतकर यांच्या कादंबऱ्यांचे वाचन संपवून... श्री. पु. य. देशपांडे यांच्या कादंबरीवाचनास सुरुवात केली म्हणजे, घनदाट व कंटकमय जंगलातून रक्तबंबाळ शरीराने बाहेर पडल्यानंतर आखलेल्या पायवाटांच्या दोन्ही बाजूला निरनिराळ्या फुलझाडांची लागवड पद्धतशीर रीतीने केली आहे, अशा उपवनात आल्यासारखे वाटते." (अर्वाचीन मराठी साहित्य : सं. वि. पा. नेने. पृष्ठ १०८.)

हे विधान मला फारच खटकले आणि मी लगेच प्रा. वि. ह. कुळकर्णी यांना पत्र लिहिले. त्यात त्यांचे वरील विधान उद्धृत करून पुढे लिहिले होते की,

"केतकरांच्या कादंबऱ्या वाचताना मलबार हिलवरील टुमदार, आखीव रेखीव बगीच्यात हिंडल्यासारखे वाटत नाही. पण आपण महाबळेश्वरचे रम्य अरण्य-सौंदर्य पाहत आहोत असे मात्र खचित वाटते. येथे अंग खरचटण्याचा व रक्त-बंबाळ होण्याचा प्रश्नच येत नाही."

माझ्या पत्राचे उलटटपाली छोटेसे उत्तर पोस्टकार्डावर आले. त्यात प्रा. वि. ह. कुळकर्णी यांनी म्हटले होते, "हा ज्याच्या त्याच्या कातडीचा गुण असतो. माणसाने आपला स्वत:चा अनुभव प्रमाण मानावा..." उत्तर मह्हामिस्किल होते पण तितकेच अंतर्मुख करायला लावणारे होते. वि. ह. ही व्यक्ती पाहण्यासारखी आहे. बोलण्यासारखी आहे, असे वाटले.

मुंबईस येईतो १९५९ पर्यंत मी वि. हं. ना पाहिले नव्हते. मुंबईस आल्या-वरही उठून त्यांच्याकडे जावे आणि भेटावे अशी मनाने उचल खाल्ली नाही. वर्ष-भराने मुंबईत 'निकदवरी लेन' मध्ये एक वादविवाद आयोजित करण्यात आला होता. 'राम गणेश गडकरी हे श्रेष्ठ साहित्यक आहेत.' हा विषय होता. या वादविवादातील एक वक्ता म्हणून मी गेलो होतो. १०-१५ मिनिटे अगोदर तेथे प्रा. रा. भि. जोशी, प्रा. माधव मनोहर, प्रा. गंगाधर गाडगीळ यांचा हास्यविनोद चाललेला होता. आणि मध्येच या सर्वांहून वयस्कर अशी एक व्यक्ती डोळे मोठे करून, मोठ्या कुतूहलाने त्यांच्याकडे पाहत काहीतरी विनोद करीत गालातल्या गालात हसत होती. पांढराशुभ्र, परीटघडीचा, लांब बाह्यांचा शर्ट, काळी कडक इस्त्रीची पँट, सतेज तुकतुकीत मुद्रा, डोक्यावर पांढरेशुभ्र बारीकसे केस, चोपून बसविलेले. अशी अतिशय स्वच्छ व टापटिपीची ही व्यक्ती कोण ? हे 'वि. ह.' च असावेत असे वाटले आणि म्हणून मी हलकेच गंगाधर गाडगीळ यांना तसे विचारले. गाडगीळ काय, तेवढ्याचा फायदा घेऊन मोठ्याने म्हणाले, "अहो विठ्ठलराव, आहे ! तुम्हालाही न ओळखणारं या जगात कोणीतरी आहे." आणि खुदुखुदु हसत राहिले. वि. हं. नी माझा हात हातात घेतला आणि गाडगीळांना म्हटलं, "अहो, याचा अर्थ माझं जग विस्तारत चाललं आहे !" वि. हं. च्या हाताचा तो स्पर्श सायीसारखा मऊ होता.

पुढे वि. हं. चा आणि माझा पचियय वाढत गेला. वारंवार भेटायला जाणे जमत नसे. पण त्यांची भाषणे मला ऐकायला मिळाली. अध्यक्षीयपद ते कसे भूषवीत ते पाहायला मिळाले. प्रास्ताविकात विषयोपन्यास करताना ते इंग्रजी साहित्यातील एखादा चुटका सांगत. लेखकासंबंधी एखादा मजेदार किस्सा ऐकवीत. मराठी वाङमयीन व्यवहारातील एखादी विनोदी घटना कथन करीत आणि प्रस्तुत विषयासंबंधी श्रोत्यांच्या मनात कुतुहल निर्माण करीत. वातावरण प्रसन्न व उत्कंठ बने. वक्त्यांची ओळखही ते मार्मिकपणे, थोडक्यात करून देत असत. त्याच

मिस्किलपणाची छटा असे, पण वक्त्यांचा गौरव त्यातून ध्वनित होई. श्रोत्यांनाही ते हसत हसत जे पोचवायचे ते पोचवीत असत.

मुंबई मराठी साहित्य संघाने अश्लीलतेवर एक परिसंवाद आयोजित केला होता. १९६२ मध्ये. त्यात डॉ. इरावती कर्वे यांचा निबंध होता. बॅ. सुशील कवळेकर, प्रा. गंगाधर गाडगीळ, बॅ. विठ्ठलराव गाडगीळ, इत्यादींची भाषणे होती. वि. ह. अध्यक्षस्थानी होते. त्या वेळी डी. एच. लॉरेन्स यांची "Lady Chatterley's Lover" ही कादंबरी व त्यावरील खटला गाजत होता. परिसंवादाला प्रेक्षकांनी तुडुंब गर्दी केली होती. ते पाहून वि ह. प्रेक्षकांकडे साभिप्राय पाहत गालात हसत म्हणाले, "अश्लील पुस्तके वाचण्यात लोकांना जशी गोडी असते तशी अश्लीलतेवरील परिसंवाद ऐकण्यातही ती असू शकते, हे आज आपणामुळेच मला समजले. आपण सुज्ञ आहात. आपणास अधिक सांगणे नलगे. फक्त आज येथे डॉ. इरावती कर्वे यांचा जो निबंध वाचला जाणार आहे, त्याच्या प्रारंभी र. धो. कर्वे यांचे एक वाक्य त्यांनी उद्धृत केले आहे, तेवढेच वाचतो." असे म्हणून वि. ह. नी ते वाक्य शांतपणे वाचले. वाक्य असे, 'अश्लीलता हा कोणत्याही लेखाचा, चित्राचा किंवा इतर वस्तूचा गुण नसून, तो फक्त तसा आरोप करणाऱ्यांच्या मेंदूचा गुण होय." वक्ते आणि श्रोते यांच्याकडे रोखून पाहत आणि मिस्किलपणे हसत वि. ह. खाली बसले.

वि. ह. ना त्यांचे स्नेही 'विठ्ठलराव' म्हणतात. पुढे माझ्याही तोंडी तेच नाव बसले. विठ्ठलरावांचे बहुतेक सर्व लेखन मी मनापासून वाचले आहे. ते दीर्घकाळ लिहीत आले आहेत पण त्या मानाने त्यांनी कमी लिहिले आहे. बहुतेक लेख स्फुट रूपातलेच आहेत. मराठी वाङ्मयेतिहासावरील ग्रंथातून त्यांनी कादंबरी आणि निबंध या वाङ्मयप्रकाराचे समालोचन केलेले आहे. त्यात त्यांच्या रसिकतेबरोबर त्यांची मर्मग्राही वाङ्मयीन दृष्टीही दिसून येते. वाङ्मयेतिहासकाराला आवश्यक तो आलोक त्यांच्या ठायी आहे. पूर्वापार संबंध दर्शवीत, तुलनेने ते एखाद्या लेखकाकडे, त्याच्या साहित्यकृतीकडे, समकालीन समग्र साहित्याकडे आणि त्यातून त्या वाङ्मयप्रकाराकडे व कालखंडाकडे पाहतात. त्यात वस्तुनिष्ठता असते.

विठ्ठलरावांनी काढलेली वाङ्मयीन व्यक्तिचित्रे म्हणजे त्यांच्या वाङ्मयीन प्रकृतीची सहज–स्वाभाविक निर्मिती होय. वाङ्मयीन प्रसंग, घटना, किंवा काहीही वाङ्मयीन चमत्कृतिरूप घडले की त्यावर विठ्ठलराव जे विनोदी उपरोधमय स्फुट लिहीत –'प्रतिभा' मासिकातून विविध टोपण नावांनी, विविध सदरांतून जे लिहीत ते केवळ खुसखुशीतच असे, असे नव्हे; तर अंती वेगवेगळे दृष्टिकोन स्पष्ट करणारे ते सदर असे. 'वाङ्मयीन ललित निबंध' असा ललित निबंधाचा काही वेगळा

प्रकार कल्पिता आला तर विठ्ठलरावांनी तो निर्माण केला आहे असे म्हणता येईल. अलीकडे त्यांनी माडखोलकर, जॉर्ज बर्नार्ड शॉ, अच्युतराव कोल्हटकर यांचे व्यक्तिदर्शन ग्रंथरूपाने घडविले आहे. उदंड वाचन करणाऱ्या पण स्वतःच्या डोळ्यांनी पाहणाऱ्या एका बहुश्रुत मर्मज्ञाचे हे लेखन मनोरंजक, चटकदार पण सत्यास बाध न आणणारे आहे. जॉर्ज बर्नार्ड शॉ हे विठ्ठलरावांचे विद्यार्थीदशे-पासूनचे जणू दैवतच होते. त्यांच्या वाणी – लेखणीवर शॉचे सौम्य संस्कार झालेले आहेतच.

विठ्ठलरावांच्या घरी मी अनेकदा गेलो आहे केवळ त्यांना भेटायला, त्यांच्याशी बोलायला. त्यांचे बोलणे रेखीव, मोजके पण मोकळे, प्रसन्न आणि आल्हाददायक. त्यात खेळकरपणा खूप; डिवचून हसवण्याकडे व हसत हसत सांगण्याची – सुचविण्याची खुबी. एकदा दुपारी अडीच वाजताच मी त्यांच्या घरी गेलो. शहाडे सदनमधील त्यांचा ब्लॉक शांतपणे विश्रांतीसुख घेत होता. त्यांनी मला आत घेतले. आम्ही बसलो. माझ्याकडे पाहत विठ्ठलराव म्हणाले, "आता आपण बोलू हळूहळू. तासाभराने चहा घेऊ. साडेतीनपर्यंत सर्वजण विश्रांती घेतात." त्यांच्या बोलण्यात मार्दव होते. आवाज मृदू, होता डोळ्यांत एक मिस्किल छटा होती. ती छटा मला सर्व काही समजावून गेली. दुसऱ्या एका भेटीच्या वेळी विठ्ठलराव घरी एकटेच होते. "आता मी चहा करतो, तो आपण घेऊ आणि मग बोलू." असे म्हणून ते उठले. मी म्हटले, "तुम्ही बसा. मी चहा करून आणतो." त्यावर ते म्हणाले, "तुम्ही बसा. माझ्या घरातील व्यवस्था मला माहीत. तुम्हाला चहा-साखरेचे डबे, काडयापेटी वगैरे कोठे आहे हे काय माहीत ? मी ते तुम्हाला द्यायचे आणि मग तुम्ही चहा करायचा ! बसा तुम्ही !" असे त्यांनी मला चूप केले. हे बोलताना पुन्हा मुद्रेवर हास्य, आवाज मृदू सारे अकृत्रिम. विठ्ठलराव वागण्यात टापटिपीचे, काटेकोर – पण कोरडे, स्वार्थी, हिकमती नाहीत. पोटी उदंड माया, त्यांच्या हाताचा सायीसारखा मृदू स्पर्श या मायेतून स्रवलेला. त्यांच्या पंचाहत्तरीचा समारंभ-सोहळा या मायेने ओथंबून गेलेला होता.

बालमोहनचे सभागृह तुडुंब भरलेले, विठ्ठलरावांचे आप्त, स्नेही, विद्यार्थी यांनी दाटून गेलेले. एक विद्यार्थीनी आली, विठ्ठलरावांना वाकून नमस्कार करून गेली. तिचे वय साठी-पासष्टीचे. दुसरी विद्यार्थीनी आली, विठ्ठलरावांना वाकून नमस्कार करून गेली. तिचे वय चाळिशी-पंचेचाळिशीचे. तिसरी विद्यार्थीनी आली, विठ्ठलरावांना वाकून नमस्कार करून निघून गेली. तिचे वय विशी-पंचविशीचे. तिसरी ही दुसरीची मुलगी आणि दुसरी ही पहिलीची मुलगी. माय, मुलगी, नात आपल्या गुरूला नमस्कार करण्यासाठी आल्या होत्या. तीन पिढ्या गुरु-दर्शनासाठी आल्या होत्या. सहकुटुंब सहपरिवार. एक उत्स्फूर्त, अनौपचारिक, कौटुंबिक स्नेह-

मेळनच गुरूंच्या साक्षीने, निमित्ताने भरले होते. त्यात शिष्योत्तम प्राचार्य राम जोशी, कुलगुरू मुंबई विद्यापीठ यांच्या भाषणाने विशाल परिमाण लाभले. श्री. प्रकाश मोहाडीकर यांनी भेटीदाखल आणलेल्या वस्तूंची यादी संपता संपेना. शिक्षकाला लाभलेले हे प्रेम, हा आदर, ही भक्ती पाहून मी अंतर्यामी पार हेलावून गेलो. ही गुरुपूजा अविस्मरणीय ! केवळ अपवादात्मक !! गुरुमुद्रेवर जी कृतार्थता तीच सर्व त्यांच्या विद्यार्थ्यांच्या मुद्रेवर ! शिक्षकाच्या जीवनातील हा क्षण केवळ अवर्णनीय आनंदाचा, अपरंपार सुखाचा, सर्व भरून पावल्याचा. म्हणूनच तृप्तीचा–मुक्तीचा असतो. ह्या सोहळघात प्रत्यक्ष भाग घेण्याचे भाग्य मला लाभले. याचाच मला केवढा आनंद झाला. त्या सोहळघात विठ्ठलरावांवर बोलताना माझे मन अनावरतेने फुलून आले होते.

काही दिवसांपूर्वी विठ्ठलरावांना भेटायला गेलो होतो. गेल्या वर्षभरात त्यांना भेटायला मला जमलेच नव्हते. दूरध्वनीवरून बोलणे मला प्रशस्त वाटत नव्हते. म्हणून पत्रसंपर्कच तेवढा होता. पण तोही पुढेपुढे राहिला नाही. जीवनाचा तगादाच असा होता की हवे ते करता येऊ नये. फार दिवसांनी विठ्ठलरावांना भेटलो होतो. धाकटचा सूनबाईंनी दार उघडले. मी आत जाऊन बसलो. थोडधाच वेळात आतल्या खोलीतून विठ्ठलराव आले ते तोल सांभाळीत. अगदी जवळ जवळ पावले टाकीत. गुडघे व पाठीचा कणा ताठ ठेवीत. दोन्ही हात सरळ अन् शरीरापासून दूर केलेले. विठ्ठलरावांना मी असे कधीच पाहिले नव्हते. ते हळूहळू आले आणि खुर्चीत बसले. "जरा बॅलन्स जातो. बाकी सर्व ठीक आहे." असे म्हणून हात हातात घेऊन त्यांनी नेहमीप्रमाणे हसऱ्या मुद्रेने माझे स्वागत केले. आणि मग ७-८ महिन्यांतले सगळे सगळे विचारून घेतले. विठ्ठलरावांना सगळ्या गोष्टींचे कुतुहल. खरी जिज्ञासा. तपशील नि तपशील ते विचारून घेतात. माणसासंबंधी जिव्हाळा, तितकाच नवे ज्ञान, नवी विद्या यासंबंधीही आस्था, प्रेम. सर्व त्यांनी विचारून घेतले. विद्यापीठात माझ्यावर अन्याय झाला आहे, माझ्या विरुद्ध Whispering compain उघडली आहे. इ. त्यांच्या कानी मागे ४-५ वर्षांपूर्वी कुणीतरी घातले होते. तेव्हा ते अमेरिकेत होते पण तेथून त्यांची मला पत्रे येत. त्यात काळजीचा सूर असे. दक्षतेचा इशारा असे. त्यामुळे माझे विद्यापीठात सारे ठीक चालले आहे, हे पाहून त्यांना फार समाधान झाले. मग ते हळूच म्हणाले, "व. दि. तुम्हाला आता माझी पुन्हा अमेरिकेहून पत्रं येणार !" आणि माझ्याकडे साभिप्राय पाहत राहिले. मला अर्थबोध होईना. तेव्हा त्यांनी सांगितले, "आता आम्ही येथून अमेरिकेत कायमचे राहायला जात आहोत. स्थायिक म्हणूनच येत्या ऑक्टोबरला जाऊ. मी हा असा एकटा आता राहू शकत नाही. तेव्हा मुलांचा आग्रह पडला."

विठ्ठलराव मुंबईचे. खास मुंबईकर. अनंत काणेकर जसे – अगदी तसे. काणेकर अमेरिकेला गेले आणि चार महिन्यांच्या आत परतले. अमेरिका त्यांच्या मनाला मानवेना. विठ्ठलराव माणसांतले, मराठी माणसांतले – आमच्या दृष्टीने ते दूरदेशी जणू वानप्रस्थासच निघालेले ! मनात आले 'आता त्यांचे अमेरिकेत कसे निभणार ?' पण जगाविषयी, माणसांविषयी उदंड कुतुहल असलेला, पोटी वात्सल्य असलेला हा माणूस मनाने संन्यस्त कधीच होणार नाही. विठ्ठलराव सारे पाहत राहतील, रस घेत राहतील, रस देत राहतील. विठ्ठलरावांचे डोळे अखंड कुतुहल घेऊन आलेले आहेत. अमेरिकेत गेल्यानंतर विठ्ठलरावांची परत भेट होणार नाही या कल्पनेने मनात, आतल्या आत उदास वाटले. विठ्ठलरावांच्या मुद्रेवरील हास्य मात्र कायम होते. जाण्यासाठी दरवाजा उघडला तेव्हा त्यांचा निरोपाचा हात 'वरदहस्ता 'सारखा वर उचललेला होता !

* *

# सुरक्षित बँक

## सौ. सुधाताई जोशी

परवाचाच साहित्य-संघातील 'संघा 'चे सन्मान्य सभासदत्व प्रदान करण्याचा समारंभ. श्री. वा. ल. कुलकर्णी, श्री. वि. ह. कुळकर्णी, श्रीमती मोघुबाई कुर्डीकर इत्यादी मान्यवर सन्मान्य सभासदत्वाची पदके बहाल केली गेल्यावर वडीलकीच्या नात्याने म्हणून 'पँटी 'तले श्री. वि. ह. कुळकर्णी आभार-प्रदर्शनाकरिता उभे राहिले. त्यांना हळुवारपणे हाताला धरून आधार देत उंच डेस्कजवळ नेऊन उभे केल्यानंतर मात्र त्यांनी अगदी नेहमीसारखे अस्खलित भाषण केले. वयोमानानुसार आवाज किंचित अशक्त, कापरा आणि शब्दोच्चार थोडे अस्पष्ट वाटले, इतकेच. पण बाकी सगळा 'बाज ' पूर्णपणे तोच. पूर्वीचाच. खोचक, मिस्किल.

मला वाटते, १९३४-३५ च्या सुमारास 'प्रतिभा ' पाक्षिकाच्या कचेरीत विठ्ठलरावांना मी प्रथम पाहिले. त्या वेळच्या इतर अनेक पुरुषांप्रमाणेच त्यांचा पोशाख असे. काचा न मारलेले धोतर, पांढरट-पिवळट रंगाचा लहान, आखूड कोट आणि मस्तकावर काळी घडीची टोपी, किंचित तिरकी बसलेली. सुरुवातीस मुद्रा जरा गंभीरच; पण एकूण तरुण वय, तरतरीत हालचाल आणि मनाजोग्या बौद्धिक वातावरणातील समवयस्क, समव्यवसायी मित्रांचा सहवास. त्यामुळे त्यांचे समग्र व्यक्तिमत्त्व मला तरी फार आकर्षक वाटे. समोरच्या व्यक्तीकडे पाहताना किंवा बोलताना मान थोडी कलती किंवा खाली करून वर बघण्याची त्यांची सवय मोठी गमतीदार असे. त्यांचा तो सुप्रसिद्ध 'असंऽऽ' हा कोकणी कऱ्हाड्यांचा अनुनासिक उद्‌गार आणि मागोमाग त्यांच्या चेहऱ्यावर प्रगट होणारे केवळ असे खवचट, खोचक भाव आणि लगोलग विलग होते न होते अशी मिस्किल वाटणारी जिवणी ! तुम्ही कितीही सरळ विधान करा, त्यांनी वकिली पवित्रा घेतलाच म्हणून समजा. लगेच तुमची उलटतपासणी सुरू. बोलता बोलता उजवा हात पुढे करून 'मग ते म्हटलंत त्याचं काय ?' (खास त्यांचेच अनुनासिकत्व) समोरची व्यक्ती आरोपीच्या पिंजऱ्यात उभी !

पहिल्या पहिल्यांदा मी अगदी भांबावून जात असे. वऱ्हाडी माणसे पुण्या-मुंबईच्या लोकांना जरा बचकूनच असत. त्यातून माझ्या माहेरी मिश्र समाजाचे

वावडे. त्यामुळे समज-गैरसमज फारच होत. पण हळूहळू हे संभ्रमाचे धुके विरले. भीड कमी झाली आणि मनमोकळया गप्पा सुरू झाल्या. अगदी दररोज नाही तरी दोन-तीन दिवसाआड ते आमच्या घरी येत किंवा आम्ही त्यांच्या घरी जात असू. याचे कारण त्यांच्या अंतःकरणातील विशुद्ध सहानुभूती आणि त्यांचे व्यावहारिक ज्ञान, शहाणपण. ते नेहमी म्हणतात, त्यावेळी तरी म्हणत, "मी बुद्धी किंवा हुशारीपेक्षा शहाणपणाला अधिक किंमत देतो." अगदी खरं आहे; पण हे सारे उपजत असावे लागते. त्यांनी एकदा एका उघडया मोकळया मैदानातील व्यास-पीठावरून मुख्य कार्यक्रम आटोपता आटोपता जाहीर रीतीने एका (त्यांच्या दृष्टीने) सुयोग्य 'उपवधू' तरुणाकरिता यथायोग्य उपवर कन्यकेसाठी आवाहन केले होते; या रोचक प्रसंगाची आज कुणाला बरे आठवण आहे?

त्यांच्यातील या अभिजात गुणामुळेच अनेक गोष्टी, किस्से ते सांगत आणि खळखळून हसत. विद्यार्थिनींबद्दल त्यांना आणि त्यांच्यासाठी विद्यार्थिनींनाही आपुलकी वाटे. पुढे कॉलेजमध्ये शिकवू लागल्यावर एकूण सर्वच विद्यार्थीवर्गाशी त्यांचे वागणे अतिशय खेळीमेळीचे असे. या सर्वांनाच त्यांच्याकडून वेळोवेळी मित्रत्वाचा सल्ला मिळे. जीवनात आवश्यक ते मार्गदर्शनही करीत. साहजिकच विद्यार्थीवृंदात ते अतिशय 'प्रिय' असत. नव्हे, अजूनही आहेत. ते त्यांचे 'अण्णा' आहेत. "आज अण्णा आले होते" "त्यांना अळूच्या वडया, फ्रूट सॅलड फार आवडतं, तेच मी त्यांना आत्ता देऊन आले–" अशा प्रकारचे स्नेहादरयुक्त उद्‌गार आजही त्यांच्या 'आजी' झालेल्या शिष्या काढताना मी ऐकले आहेत.

आणि मला आपले वाटते की, निदान मला तेच अधिक माहीत आहे की, विठ्ठलरावांच्या स्नेहवर्तुळात तरुण किंवा प्रौढ स्त्रिया यांचाच अधिक समावेश आहे. याचे कारण मला वाटते की, अशा स्त्री-वर्गाला आपुलकीची, सहानुभूतीची आणि प्रौढ, प्रेमळ मित्रत्वाची विशेष गरज असते. विठ्ठलरावांचे मन अगदी बंदिस्त सुरक्षित. एखाद्या बँकेसारखे. कितीक जणांची मनोगते, गुपितं, रहस्ये त्यात खोल खोल दडलेली– अगदी स्वतःचीदेखील. पण वागणे-बोलणे मात्र नेहमीच मिस्किल, मनमोकळे वाटावे असे. कधी कुणाला कसला म्हणून सुगावा लागणार नाही.

विठ्ठलरावांच्या या सहानुभूतीपूर्ण आस्थेवाईक स्वभावाचा मला अगदी सुरुवातीपासून परवा परवापर्यंत एकसारखा अनुभव येत गेलेला आहे. यासंबंधी म्हणजे त्यांच्या मजमध्ये असलेल्या interest संबंधी केवळ दोन-तीनच उदाहरणं दिलीत तरी पुरे होईल. जवळजवळ पस्तीस-चाळीस वर्षांपूर्वी त्यांनी मला एकदा मुंबईतील एका उपनगरी साहित्य संमेलन प्रसंगी हमखास भरविल्या जाणाऱ्या कवी-संमेलनाचे अध्यक्षपद भूषवायला सांगितले आणि मी ते दबकतच स्वीकारले, याचे

स्मरण मला आजही स्पष्टपणे होत आहे तसेच सांगली किंवा मिरज अशा कोणत्या तरी ठिकाणी नवीनच भोजल्या जाणाऱ्या स्त्री-संमेलनाचेही अध्यक्षस्थान मी स्वीकारावे अशी इच्छा त्यांनी मजजवळ प्रगट केली होती. मी कुठेही काही– अर्थात सभेत दोन शब्द बोलले किंवा वृत्तपत्र-मासिकात चार ओळी खरडल्या की, विठ्ठलरावांनी त्याला उत्स्फूर्त 'दाद' दिलीच म्हणून समजा. वास्तविक मुंबई-सारख्या शहरात त्या वेळी सुशिक्षित स्त्रियांची काही एवढी वानवा नव्हती. पण विठ्ठलरावांची कौतुकाची वृत्ती माझ्या वाटयास आली होती खरी ! पण मीच कचखाऊ ! त्याला कोण काय करणार ?

अगदी अलीकडे म्हणजे तीन-चार वर्षांपूर्वीच मी माझ्या जीवन-घडणीसंबंधी 'सुगीचे दिवस' म्हणून एक वीस-पंचवीस लेखांची माला गुंफली. विठ्ठलरावांना माझे लेखन फार आवडले. म्हणाले, "अशा प्रकारचे स्त्रियांचे आत्मवृत्त अगदी नवीनच म्हणावे लागेल. तुम्ही ते जरूर छापा. पण मी त्याला प्रस्तावना लिहिणार नाही." या त्यांच्या शेवटच्या वाक्याने माझा सारा उत्साह मावळला. धीरच खचला ! अर्थात हा माझा मूळचाच स्वभावदोष.

तशीच आणखीही एक आठवण. आमची मुलगी त्या वर्षी मॅट्रिकला बसा-यची होती. एके दिवशी संध्याकाळी ते आपणहून आमच्या घरी आले. आणि नीलिमाला म्हणाले, "हं. सांग, तुला कोणता विषय कठीण वाटतो ? गणित ? त्यातला कोणता भाग ? – भूमिती ? – हं, ये इकडे. आण कागद पेन्सिल–," नंतर काही आकृती रेखाटून तिला ते प्रश्न विचारू लागले. म्हणाले, "वा ! छान. मग तुला घाबरायचं काय कारण ? तरी पण तू क्लासला ये. मीच शिकवतो तेथे अगं क्लासला गेलं म्हणजे उत्तरं नीट, नेमकी, पद्धतशीर कशी लिहावीत ते समजतं –मग, काय, येतेस ना उद्यापासून ?" पण ती तरी माझीच मुलगी ! घरी चालून आलेल्या सुवर्णसंधीचा लाभ घ्यायची सद्बुद्धी द्यायला परमेश्वर असा आमच्या बाबतीत कसा बरे विसरला ?

काही स्त्री-संस्थांच्या विश्वस्त–मंडळातही ते असत. आणि अशा संस्थांत त्यांना व्याख्यानांचीही वारंवार आमंत्रणे येत. कारण, कोणताही विषय विनोदी अंगाने खुलवावा–फुलवावा त्यांनीच ! स्त्रिया, स्त्रियांवरील विनोदानेही बेहद्द खूष होतात हा अनुभव सार्वत्रिक आहे. त्यांची ही भगिनी-वर्गातील लोकप्रियता आमच्या खाजगी बैठकीत हमखास खसखस पिकवीत असे !

अर्थात संभाषणे, वादविवाद, गप्पागोष्टी, मिश्र समाजातील व्याख्याने, सर्वत्र खाजगी आणि सार्वजनिक असा त्यांचा हजर जबाबीपणा, बहुश्रुतत्व, साव-काश, विशिष्ट शब्दांवर अर्थानुकूल आघात देत केले जाणारे परिणामकारक रसाळ वक्तृत्व, श्लेष, कोटीक्रम, क्वचित उपरोध–उपहास, पण एकंदर हास्य–विनोदाचा

सुगंधी शिडकावा करीत केव्हा संपे ते श्रोत्यांना कितीतरी वेळा कळत नसे ! त्यांच्या लेखनात तसेच वक्तृत्वातही बरेचसे कोल्हटकरी, थोडेसे शिवरामपंती वळण जाणवे. मला वाटते, त्यांच्या पिढीतील पुष्कळांना असे या लेखक विद्वानांचे आकर्षण असावे.

विठ्ठलरावांचे 'वाचन वेड,' त्या वेळची मुंबईची लोकसंख्या अवघी १२।१३ लाख होती म्हणूनच सहीसलामत निभावले; कारण हे गृहस्थ रस्त्यातून एकाग्र चित्ताने वाचीत जात. उपनगरातील नव्हे तर प्रत्यक्ष गिरगाव, दादरच्या राजपथा-वरून ! तेव्हा मला एक विचार स्पर्शून जाई की, या (अशा) हमरस्ता वाचकाच्या मस्तकावर एखादा छोटा सर्च लाईट, एका खांद्यावर ऑटोमॅटिक हॉर्न आणि पुस्तकावर अलगद बसवलेले वायपर्स......असे काही का कुणी संशोधन करीत नाही ?

पण विठ्ठलराव केवळ 'अक्षरा'तच रमत असत हे खरे नव्हे हं ! त्यांचे नाट्य–गान–कला–क्रीडा निपुणत्व मी स्वत: अनुभवलेले आहे. त्यामुळेच त्यांचा मित्रपरिवार सर्व थरांतील आणि सर्व वर्गांतील असे, आहे. अजूनही त्यांच्या बैठ-कीच्या खोलीत सारखा दरबार भरलेला असतो. जाता–जाता हे अवश्य नमूद केले पाहिजे की त्यांचे कला आणि क्रीडाप्रेम त्यांच्या मुलात आणि मुलीमध्ये उत्तम रीतीने संक्रांत झालेले आहे.

आम्ही आता सर्वच थकलो. प्रत्यक्ष भेटीगाठी क्वचितच होतात. तथापि आता 'दूरध्वनी यंत्र' आहे, त्यांच्या मनातही नसताना त्यांच्या एका सत्‌शिष्याने अवघ्या आठ दिवसांत या अमोल यंत्राची त्यांच्या घरात प्रतिष्ठापना केली. केवढे भाग्य ! पण आता त्यांची कर्णेंद्रिये त्यांच्याशी असहकार पुकारू लागली आहेत ! मात्र सुदैवाने 'पुरस्सर गदांसवे झगडता अजून तनू फारशी भागलेली नाही.' वयो-मानाने बराचसा वेळ घरातच बसून रहावे लागत असले, तरी धीमतांचा काळ जसा जातो, तसाच त्यांचा लेखन–वाचनात सुखेनैव सत्कारणी लागत असल्याचे त्यांच्या अलीकडील 'अच्युत बळवंत', 'शॉ' इत्यादी ग्रंथांवरून स्पष्टच होत आहे. त्यांचे निकटचे मित्र आणि आप्त श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांचे सध्या ते लिहीत अस-लेले चरित्र वाचण्यास आपण सर्वच उत्सुक आहोत !

इतकी तल्लख स्मरण-शक्ती, काम करण्याचा नेट आणि हौस, तशीच पूर्वी-चीच प्रसन्न विनोदप्रियता त्यांच्या या त्यांना लाभलेल्या निरामय दीर्घायुष्यात अशीच साथ देवोत !

* *

# आदर्श दांपत्य

## सौ. सुमती देवस्थळे

२० जून १९४९. सकाळची वेळ. रुइया कॉलेजातल्या लेडीज रूममध्ये मुलींचे घोळके जमत होते. नोटीस बोर्डाजवळ खूप गर्दी. मी या कॉलेजात नवखी... म्हणून थोडीशी भांबावलेली...तोच एक मुलगी आनंदाने नाचत म्हणाली, " अय्या, आम्हाला इंग्लीशला व्ही–एच." मला वाटले, आपणही आपल्याला कोण शिकवणार हे पाहून घ्यावे. पुढे सरकले. स्वतःचे टाईमटेबल शोधून काढताना दमछाक ! पण इंग्लीशला व्ही. एच. के. होते. आणि मघाच्या मुलीच्या उद्‌गारावरून व्ही. एच. चांगले शिकवीत असले पाहिजेत असे अनुमान केले होते, तेव्हा जरा बरे वाटले.

लवकरच कॉलेज सुरू झाले. प्रा. वि. ह. कुळकर्णी आम्हाला टेनिसनची कविता शिकवू लागले. त्यांनी त्यांच्या अध्यापन-पद्धतीप्रमाणे विषय साधा सोपा सरळ करून सांगितला खरा; पण मला काही तो कवी भावलाच नाही. दोष सरांच्या शिकविण्याचा नव्हता तर माझ्या अरसिकतेचा होता...किंवा आत्यंतिक ओढाताणीच्या आयुष्याचा होता. टेनिसनची कविता मनात रुजली नाही, एवढे खरे·

तरीही प्रा. कुळकर्णींचा तास मात्र मला फार आवडायचा. संथ लयीत मिस्कीलपणे बोलण्याची त्यांची शैली. त्याला नाटयमयतेची बारीकशी झालर, वर्गावर दहशत न गाजवता विनोदाच्या साहृयाने खटयाळ कंपूला ताब्यात ठेवण्याची किमया, विद्यार्थ्यांच्या डोक्यावरून आपले शिकवणे वाहून जाणार नाही याची दक्षता, हे उत्तम शिक्षकाचे गुणविशेष त्यांच्या शिकवण्यातून व्यक्त होत असत. त्यांच्या वर्गातले विद्यार्थी कधी इस्त्रीच्या चेहऱ्याने बसले नाहीत; अन् धडाधडा स्टँपिंग करून त्यांनी सरांना त्रासही दिला नाही. तसा दिलाच असता तर त्याला तोंड द्यायचे तंत्र त्यांना चांगलेच अवगत असे. माझ्या मनावर त्यांच्या शिकवण्या-पेक्षा त्यांच्या मिस्किल व्यक्तिमत्त्वाचाच अधिक प्रभाव होता.

संध्याकाळी लायब्ररीतून बाहेर पडले की, सर बॅडमिंटन खेळताना दिसत. देहयष्टी चपळ होती. आणि ते फार सुंदर स्ट्रोक्स मारीत असत. त्यांच्या खेळात सहजता आणि सफाई होती. खेळत त्यांचा पवित्रा फारसा ' ॲग्रेसिव्ह ' नसे. एक

अनुक्रमणिका

निर्भेळ आनंद म्हणून खेळायचे. कोण हरला, कोण जिंकला हा प्रश्न त्यांनी महत्त्वाचा मानला नाही. बॅडमिंटन कोर्टावरचे सरांचे क्रीडाकौशल्य मला आकर्षक वाटे. मला मात्र खेळणे शक्य नसायचे. नोकरी, संसार, कॉलेज, अभ्यास इ. कसरत करताना खेळायला अवसर होताच कुठे ? सरांची मुलगी इरावती लवकरच बॅडमिंटन खेळू लागली आणि बघता बघता तिने त्या क्षेत्रात उत्तम लौकिक मिळविला.

मी मराठीची विद्यार्थिनी असल्याने अभ्यासाच्या बाबतीत सरांशी अधिक जवळीक निर्माण होण्याचा प्रश्नच नव्हता. पण एम. ए. झाल्यावर मात्र मला सरांनी पुष्कळच मदत केली. कोणत्या कॉलेजात जागा रिकामी आहे, तेथे कसा अर्ज करावयाचा इ. सर्व सांगितले. मला उत्तम मार्क असूनही जागा मिळाली नाही हा माझ्या नशिबाचा भाग होता. पण सरांनी मात्र आवश्यक ती सर्व माहिती दिलेली होती हे मी विसरू शकत नाही.

त्या संदर्भात दोन-तीन वेळा सरांच्या घरी जाण्याचा योग आला. त्यांच्या पत्नी सौ. इंदिराबाई यांचाही परिचय झाला. घरी येणारा सरांचा विद्यार्थी म्हणजे आपलाच माणूस असे मानून त्यांनी मला आपलेसे केले. त्यांच्याइतकी सहृदय, वत्सल, तात्काळ जिव्हाळा निर्माण करणारी स्त्री मला अद्याप भेटलेली नाही. घरी आलेल्या पाहुण्यावर स्नेहाची संततधार असायची. सर्वांवर प्रेम करण्याची एक विलक्षण ताकद त्यांच्याजवळ होती यात शंकाच नाही.

१९५५ साली माझ्या पायाला भयंकर अपघात झाला होता. हे वृत्त त्यांना कोठूनतरी समजले. लगेच शिवाजीपार्कला राहणाऱ्या माझ्या बहिणीकडे त्या गेल्या अन् तिच्या सोबतीने मला भेटायला आल्या, याचे मला खरोखरच आश्चर्य वाटले. मजजवळ बसून, मला आधार वाटेल असे बोलून सर्व वातावरण प्रसन्न करून त्या गेल्या. अपघातापायी विकल झालेल्या माझ्या मनाच्या जखमेवर त्यांनी जणी काही जादूची फुंकर मारली. कालांतराने मी त्या आपत्तीतून पार पडले; आणि कुळकर्णी कुटुंबाच्या स्नेहाने कायमची बांधली गेले.

एक मजेदार प्रसंग आठवतो आहे. सौ. इरावतीच्या मंगळगौरीचा सोहळा कार्यालय घेऊन अगदी थाटामाटाने साजरा झाला. रात्री जेवणाची वेळ. हॉलच्या मधली जागा मोकळी ठेवून निमंत्रित स्त्रिया भिंतीला टेकून बसलेल्या होत्या. इतक्यात सर स्वतःच्या जावयाला घेऊन हॉलमध्ये आले अन् म्हणाले, "आता मी तुम्हाला या सर्वांची ओळख करून देतो हं." जावयाला घेऊन ते प्रत्येक स्त्रीसमोर उभे राहायचे, अन त्या स्त्रीचे नाव, वैशिष्ट्ये इ. सगळे काही जावयाला सांगायचे. शे-दीडशे स्त्रियांची अशी घाऊक प्रमाणात ओळख करून देण्याचा खरा उद्देश वेगळाच होता अन् तो सरांच्या कौतुकाने ओथंबलेल्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता.

त्यांना प्रत्येकीला सांगायचे होते, 'बघा – कसा आहे माझा जावई ? छान मुलगा पटकावलान की नाही माझ्या मुलीनं ?' त्या ठिकाणी 'नवरे' मंडळींना आमंत्रण नव्हते म्हणून बरे. नाही तर एकूणएकांना त्या तरुण जावयाचा हेवा वाटला असता अन् प्रत्येकजण मनातल्या मनात म्हणाला असता, 'कसा छान गुलहौशी सासरा पटकावलान बेटघानं ! लकी आहे हं हा.'

जितके जावयाविषयी कौतुक तितकेच सुनांचेही कौतुक. सरांच्या घरात सुना येतात, त्या आठवड्याच्या आत घराशी एकरूप होतात. कारण त्यांच्या प्रत्येक गुणाला नेमकी दाद मिळते. एकदा त्यांच्या सुनेचा – जयन्ताच्या पत्नीचा फोटो एका इंग्रजी मासिकावर आला. सरांनी ते मासिक मला आवर्जून दाखविले अन् म्हणाले, "या मासिकाचे संपादक खूप चिकित्सक आहेत. वाटेल तो फोटो छापीत नाहीत. फक्त सुंदर स्त्रियांचेच फोटो छापतात." मी म्हटले, "सर, फोटो तर सुंदर आहेच. पण श्रेय फक्त फोटोग्राफरचं नाही. तुमची सूनबाईच खूप सुरेख आहे. माझ्यासारखीचा फोटो कोण छापणार ?" त्यांना माझ्या तोंडून हेच हवे होते. सुनेच्या रूपगुणांची प्रशंसा केली की त्यांना समाधान वाटते, अभिमानही वाटत असावा.

एकदा मी जायला उठले, तशी म्हणाले, "बरं. आता तुम्ही जा. मीही मेकप करायला जातो – कारण मला क्लासमध्ये जायचे आहे."

'मेकप ? तोही साठीच्या पुढच्या पुरुषानं करायचा ?' मला हसू आले. कदाचित जाताना पाहुण्याने हसत जावे असा उद्देश असेल. ज्याला खऱ्या अर्थाने मेकप म्हणतात तसले काही सर करत असतील असे वाटत नाही. फार तर पावडर लावत असतील. पण एक गोष्ट मात्र खरी की पोशाखाच्या बाबतीत ते अत्यंत चोखंदळ आहेत. अतिशय स्वच्छ, नीटनेटके कपडे, पॉलिश केलेले बूट आणि काळ-पट लाल रंगाचा टाय हा त्यांचा कॉलेजमधला पोशाख असायचा. कुठल्याही बाबतीत बावळटपणा किंवा गबाळेपणा नव्हता. घरी असले तरी स्वच्छ धोतर, स्वच्छ शर्ट असे चुरचुरीत कपडे. गलथानपणा कुठेही आढळायचा नाही. 'डीसेन्सी' हे एक महत्त्वाचे जीवनमूल्य आहे अशी त्यांची धारणा.

दुसऱ्यांचे मनमोकळे कौतुक करायला माणसाचे मन विशाल असावे लागते. सर तुमच्या लहानसहान साहित्यकृतीचे कौतुक करतील. त्या बाबतीत कंजूषपणा बिलकुल होणार नाही. स्वतःच्या घरातल्या माणसांविषयी, विशेषत: सुनेविषयी कोणी आस्थेने बोलत नाही. पण सर आणि त्यांची पत्नी त्याला अपवाद. सरांच्या मोठ्या मुलाने गुजराथी मुलीशी विवाह केला. तिचे नाव पन्ना. या मुलीला मी पाहिलेले नाही. ती अमेरिकेत असते. केव्हा तरी तिचा विषय निघाला. सर आणि इंदिराबाई – दोघांनीही जशी काही 'मर्म बंधातली ठेव' मला उलगडून दाखवली.

आपली सून कशी कर्तृत्ववान आहे, धीट आहे, प्रेमळ – बुद्धिमान, सेवाभावी इ. आहे हे त्यांनी अगदी अहमहमिकेने सांगायला सुरुवात केली. तिच्याविषयी किती सांगू अन् किती नको असे होऊन गेले. दोघेजण आळीपाळीने पन्नाचे गुणविशेष सांगत होते. मी एकदा सरांकडे अन् एकदा बाईंकडे पाहून नुसती ऐकत होते. वाटले, ही सून खरोखर किती भाग्याची ! सासूसासऱ्यांकडून एवढे कौतुक करून घेण्याचे भाग्य कितीशा सद्गुणी सुनांना लाभत असेल ?

सभा कशा गाजवायच्या, किंवा एकादा कार्यक्रम-परिसंवाद औचित्यपूर्ण रीतीने कसा यशस्वी करायचा हे तंत्र सरांना उत्तम जमलेले आहे. पूर्वी अमरहिंद मंडळात ब्रेनट्रस्टचे कार्यक्रम होत असत. त्या कार्यक्रमाचे संचलन प्रा. कुळकर्णींकडे हमखास असायचे. उत्तरे देण्यासाठी जमलेल्या बुद्धिमान वक्त्यांपैकी कोणाला कोणता प्रश्न विचारायचा, तो कसा पेश करावयाचा, त्याला मिस्कीलपणाची झालर कशी जोडून द्यायची, कोणाची कशी फिरकी ताणायची या बाबतीत सर अगदी उत्तम जाणकारी दाखवीत. ते संचलन करणार असले म्हणजे कार्यक्रम हमखास रंगणार अशी संचालक मंडळाला खात्री असायची.

सरांचे उतारवयातील स्फुट लिखाण मी वाचलेले आहे. पण ते काही त्यांचे खरेखुरे स्वत्व नव्हे. ऐन उमेदीमधले 'प्रतिभा' मधून प्रसिद्ध झालेले लेख प्रा. वा. ल. कुळकर्णींसारखे टीकाकार अद्यापही स्मरतात. त्यातच सरांचे वैशिष्ट्य असले पाहिजे. आमच्या पिढीला त्या लिखाणाचा परिचय नाही. सरांनी लिहिलेले व्यक्ति-चित्रांचे पुस्तक मात्र उत्तम प्रकारे परिचित आहे.

"टॉलस्टॉय एक माणूस' हे पुस्तक मी लिहीत होते तेव्हांची गोष्ट. मी माझा मनोदय बोलून दाखविला. सरांनी विचारले, "आधुनिक चरित्रग्रंथ कसा असावा याची तुम्हाला काही माहिती आहे का ?" मी गडबडून गेले. चरित्र लेखनाला काही तंत्र असते ही गोष्टच मला माहीत नव्हती. मी आपली शुंभा-सारखी बसून राहिले. मग सरांनी आपल्या संग्रहातील काही उत्तम चरित्रे मला वाचायला दिली. त्यात 'बॉस्वेल्स लाईफ ऑफ जॉन्सन' आणि 'एरिअल' ही पुस्तके होती. त्यातून माझ्या डोक्यात पुरेसा प्रकाश पडणार नाही अशी शंका आल्याने आणखी काही वाचायला सांगितले. त्यात व्हर्जीनिया वूल्फचे 'मॉडर्न बायग्रॉफी' वरील दोन लेख होते. त्या लेखांची सरांनी फारच जोरदार तारीफ केली होती, म्हणून मी ते लेख वाचले. टॉलस्टॉय लिहिताना या साऱ्या वाचनाचा उपयोग झाला असावा. टॉलस्टॉयच्या 'कन्फेशन' या पुस्तकाची एक दुर्मिळ प्रत त्यांच्या जवळ होती. ती त्यांनी मला देऊन टाकली. बक्षीस...घ्या, वाचा...! माझ्या ग्रंथसंपत्तीचा कोणी तरी लाभ घेत आहे यातच त्यांचा आनंद सामावलेला होता.

दुसऱ्यांना काही तरी देणे, अगदी सहजतेने उपयोगी पडत राहणे – ते देखील दुसऱ्याला भार वाटू न देता, त्याच्यावर उपकाराचे ओझे न लादता उपयोगी पडणे हा अभिजात सुसंस्कृत मनाचा गुणधर्म आहे सरांच्या ठिकाणी हा गुण-विशेष इतक्या स्वाभाविक रीतीने वावरतो की, त्यात काही विशेष आहे असे त्यांना वाटतही नसावे. चांगल्याची जाण, त्या संदर्भातली विचक्षण वृत्ती, गुणांना दिलखुलास दाद देण्याची हौस हे सरांचे गुणविशेष आहेत. हल्ली ते फार दुर्मिळ झालेत म्हणून मुद्दाम त्यांचा उल्लेख केला.

माझ्या टॉलस्टॉयवरील ग्रंथास मॅजेस्टिक पारितोषिक मिळाले. मॅजेस्टिकने अगदी समारंभपूर्वक पारितोषिक वितरण केले. त्या वेळी सर अमेरिकेत आपल्या मुलाकडे होते. त्यांना मी समारंभाचा तपशील कळवला आणि माझ्या भाषणात त्यांच्या मार्गदर्शनाचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख केल्याचेही कळवले. त्या पत्राने ते खूपच सुखावले असावेत पत्राचे उत्तर स्नेहभावाने ओथंबलेले होते. एखाद्या विद्यार्थ्याच्या यशाने शिक्षक किती आनंदित होतो त्याचे प्रत्यंतर त्या पत्रातून येत होते.

सर आणि इंदिराबाई विद्यार्थ्यांवर प्रेम करीत. त्यापायी कित्येकदा त्यांना काळजी करण्याचे प्रसंग येत. पण 'जाऊ दे की – आपल्याला काय करायचे आहे ?' अशी तुटक वृत्ती त्यांनी धारण केली नाही. माणसे जोडली. एकदा मी त्यांच्या घरी गेले असता मला श्वास लागला. वास्तविक नेहमीची गोळी घेतलेली होती. अशा प्रसंगी माझा चेहरा एकदम बदलून जातो. अजिबात बोलवत नाही. संपूर्ण विश्रांती हे एकमेव औषध ठरते. मी नुसती बसून राहिले. दोघे पती-पत्नी काळजीने व्याकुळ झाले. डॉक्टरांना बोलावू का ? टॅक्सीने घरी सोडू का ? इ. अनेक प्रश्न विचारीत राहिले. बाईंना तर स्वस्थ बसवेना. त्यांनी एक मात्रा उगाळली. त्यात आले, लिंबू व मध मिसळून ते चाटण दिले. सुमारे अर्धा तासात मी ठिकाणावर आले. आपल्यापायी हे प्रेमळ जोडपे इतक्या काळजीत पडले. याचा मला अत्यंत संकोच वाटला. मी घरी निघाले तेव्हा 'घरी जाताच फोन कर' ही सूचना आणि 'स्वत: फोन करू नकोस. मुलीला सांग' ही उपसूचना !

अलीकडे बरेच दिवसांत मी त्यांच्याकडे गेले नाही. बाई गेल्यापासून तर क्वचितच गेले असेन. सर शॉ वरील चरित्र ग्रंथ लिहीत आहेत, प्रकाशनाच्या खटपटीत आहेत हे माहीत होते. यथावकाश 'शॉ' वरील ग्रंथ प्रकाशित झालाही. मला आमंत्रण होते. उतारवयापर्यंत टिकून असलेला सरांचा वाङ्मयविषयक उत्साह पाहण्यासाठी मी मुद्दाम गेले होते. समारंभ शानदार झाला. सरांचे एकेकाळचे विद्यार्थी व्हाईस चान्सलर राम जोशी अध्यक्षपदी होते. प्रा. माधव मनोहर, प्रा. रा.

मि. जोशी हे वक्ते होते...समारंभ संपल्यावर मी सरांजवळ जाताच ते म्हणाले, "अगं, तू हल्ली असतेस तरी कुठे ?"

वात्सल्याने भिजलेला त्यांचा स्वर ऐकला अन् वाटले, एकदा त्यांच्याकडे सावकाशीने बोलण्यासाठी जायला हवे.

* *

अनुक्रमणिका

# आदर्श प्रोत्साहक

## डॉ. रा. कों. फाटक

या ग्रंथासाठी विहंच्या आठवणी पाठवा असे लेखिकेचे पत्र आले, तेव्हा ठरवूनच टाकले की ज्या अनेक आठवणी गेली कित्येक वर्षे माझ्या मनात घर करून राहिल्या आहेत त्यांपैकी काहींना लेखणीत आणून सोडावयाचे. मराठी माणसांत अभावाने तळपणारा एक मोठा गुण विहंच्या वृत्तीत फार मोठ्या प्रमाणात मला दिसत आला आहे. या गुणाशी निगडित अशा काही आठवणीच मी येथे देणार आहे.

मराठी माणसाबद्दल एक समज प्रचलित आहे अन् तो खराही आहे की, त्याला चांगल्याला चांगले म्हणण्यासाठी फार आढेवेढे घ्यावे लागतात, मनाची जबरदस्त तयारी करावी लागते. इतकेच कशाला, असेही मराठी महाभाग आहेत की ज्यांना समोरून परिचित व्यक्ती येताना दिसली तर साधासुधा नमस्कार करणेही फार जीवावर येते. उजवा हात आहे तसाच लोंबता ठेवून त्याची फक्त बोटे तीस अंशाच्या कोनात वर केली की झाला त्यांचा नमस्कार. या संदर्भात काही आठवणींचा मी जेव्हा विचार करतो तेव्हा वाटते, 'धन्य ते विठ्ठलराव.'

वीस-पंचवीस वर्षांपूर्वीची ही एक आठवण. एके दिवशी सकाळी दाराची घंटा खणाणली. दोघी-तिघी अपरिचित महिला आत आल्या. वनिता समाजाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या त्या होत्या. 'समाजात' एक परिसंवाद आयोजिला असून त्यासाठी एक वक्ता म्हणून मी यावे अशी त्यांची विनंती होती. 'मराठी साहित्यात अश्लीलता पुरुषांनीच आणली' हा विषय परिसंवादासाठी होता. या विषयावर उलटसुलट विचार मांडण्याचे काम वक्त्यांवर सोपविले होते. ज्या विषयावर माझ्यासारख्या नवागताला भाषण देताना संकोचल्यासारखे व्हावे असा गहिरा विषय आणि बोलायचे ते फक्त वनिता व महिलांचाच श्रोतृसमुदाय असलेल्या सभागृहात, अशा दुहेरी अडचणीत मी सापडलो होतो. त्यांची विनंती नम्रपणे फेटाळण्याचे मी मनात ठरवून टाकले व मी त्यांना सहज विचारले, "अहो, पण तुम्ही इतर चांगले वक्ते सोडून माझ्याकडेच का आलात?" त्यावर एक भगिनी म्हणाल्या, "आम्ही आताच विहंकडे ही विनंती घेऊन गेलो होतो. पण त्यांना दिवस गैरसोयीचा असल्याने ते येऊ शकत नाहीत. मग दुसरा चांगला वक्ता

अनुक्रमणिका

सुचवा असा आग्रह आम्ही धरला. त्यांनी तुमचे नाव सुचविले आणि आम्ही इकडे आलो."

विहंनी आपले नाव सुचविलेले ऐकताच मी भारावून जाऊन बोलून गलो, " तुमची विनंती मान्य. मी येईन त्या दिवशी."

त्या भगिनी घरातून बाहेर पडताच भाषणाचे वडपण वाटू लागले. विहंची भाषणशैली मला नेहमीच आवडत आलेली असल्याने मी त्यांना वक्तृत्वकलेतील माझे गुरू मानीत आलो आहे व आजही मानतो. त्यांनी माझे नाव सुचवून जणू शाबासकीचा हातच पाठीवर ठेवला असे मला वाटले. गुरूंची आज्ञा समजून मी सम्मती दिली होती.

दुसरे दिवशी मी श्री. विठ्ठलरावांना भेटून सांगितले की त्यांनी माझे नाव सुचवून फार मोठी व मला न पेलणारी जबाबदारी माझ्यावर टाकली आहे व त्यामुळे मी बेचैन झालो आहे. त्यावर विह म्हणाले, " अहो फाटक, बेचैन कशाला होता. तुम्ही आभाराची, परिचयाची व प्रास्ताविकाची भाषणे देऊन एक वेगळ्या ढंगाची शैली विकसित केली आहे. या विषयावर तुम्ही चांगलेच बोलाल अशी माझी खात्री आहे. घाबरता कशाला ?" हे ऐकून माझा विश्वास दुप्पट झाला.

गुरूंचा अपेक्षाभंग होऊ नये म्हणून माझ्या नेहमीच्या पद्धतीने (एकदा तरी समग्र भाषण लिहून काढावयाचे) भाषणाची जय्यत तयारी केली. ठरलेला दिवस आला. अध्यक्षस्थानी कै. प्रा. कृ. पा. (नानासाहेब) कुलकर्णी होते. वक्ते म्हणून अनुराधाचे संपादक श्री. ब्रह्मानंद नाडकर्णी, श्रीमती यमुनाबाई हिर्लेकर, मी व आणखी एक (नाव लक्षात नाही) असे होतो. जवळजवळ वीस मिनिटे मी बोललो. त्या वेळी 'पोटिमा ब्लाऊज' व पाठीवर रुळणारे दोन शेपटे ही फॅशन स्त्रियांनी नुकतीच वर्षापूर्वी सुरू केली होती. त्यामुळे अश्लीलतेची प्रात्यक्षिके स्त्रियांनी पुरुषांना दाखविली व सदा सोज्ज्वळ लिहिणाऱ्या पुरुषाला अश्लीलतेकडे झुकवण्याचे काम स्त्रियांनीच केले व आता मात्र चोराच्या उलटया...ऐकू येत आहेत; हा माझ्या भाषणाचा गाभा होता. विनोद, उपरोध मदतीला घेऊन भाषण चांगलेच रंगविता आले. कै. श्रीमती इंदिराबाई कुळकर्णी (गुरुपत्नी) श्रोतृसमुदायात होत्याच. त्यांना भाषण आवडले. विहंनाही आनंद झाला व चेल्याचे जोरदार अभिनंदनही त्यांनी केले. चांगल्यास दिलखुलासपणे चांगले म्हणणारे आणि एखाद्याचा अंगचा गुण अधिक विकसित व्हावा म्हणून नेहमी प्रयत्नशील राहणारे वि. ह. म्हणजे एक आगळाच मराठी माणूस असे मीच काय कोणीही म्हणेल.

गेल्या वर्षीची ही आठवण. वि. ह. फार आजारी होते. घराबाहेरही पडत नसत. पंच्याहत्तरीच्या निमित्ताने मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयात माझा सत्कार झाला तेव्हा नियोजकांनी या समारंभाचे अध्यक्ष म्हणून विहंची योजना केली होती. 'केवळ

रा. कों. चा सत्कार आहे म्हणूनच मी त्या दिवशी घराबाहेर पडणार आहे ' या शब्दांत त्यांनी अध्यक्ष होण्याचे मान्य केले. आपल्या वैशिष्टयपूर्ण शैलीत केलेल्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी अत्यंत प्रेमाने ज्या भावना व्यक्त केल्या त्या मी कधीही विसरू शकणार नाही. या आधी पंच्याहत्तरीच्या निमित्ताने त्यांनी मला धाडलेल्या पत्रातील काही व्यक्त झालेल्या भावना खाली देण्यायोग्य वाटल्याने त्या देत आहे.

"...... अनंत निवासात राहून तुम्ही शारीरिक, मानसिक व बौद्धिक गुण इतके संपादन केले आहेत की इतके अनंत गुण दोनशे वर्षांत सुद्धा कोणाला संपादन करता येतील की नाही याची शंका वाटते. वृद्धावस्थेच्या अंधकारात हाती काठी घेऊन एकेक पाऊल चाचपडत टाकावे लागते; हे पाहिले म्हणजे कोजागिरीच्या निरभ्र चांदण्यात मोठ्या प्रसन्न मनाने व हसतमुखाने सहल करीत असल्याचे भाग्य फार थोड्या लोकांच्या वाट्याला येते. हा नुसता निसर्गाचा प्रसाद नसून त्याला तुम्ही आपल्या निरलस व निष्कलंक गुणांची साथ दिलेली आहे. तुमच्या कर्तृत्वाची क्षेत्रे अगदी भिन्न स्वरूपाची असूनही त्यात तुम्ही पहिला क्रमांक मिळविला आहे."

वरील पत्रात श्री. विठ्ठलरावांच्या मनाचे मोठेपण, वृत्तीतील प्रसन्नता आणि मित्रप्रेम शिगोशीग भरले आहे. याची मला धन्यता वाटते. मी कृतज्ञ आहे.

* *

# मास्तर

## कामिनी गोविंद आगासकर

संस्कृत हा माझा शाळा-कॉलेजातील अत्यंत आवडता विषय. पण ही आवड कशी नि कुणी निर्माण केली ? गम (गच्छ) to go म्हणता म्हणता चिनोमी चिनुव: चिनुम: शिकवणाऱ्या कुळकर्णी मास्तरांच्या वर्गात म्हणजे ९वीत आम्ही पदार्पण केले नि काय जादू – मास्तर वर्गात येतात कधी असे होऊन जायचे. (आमच्या शाळेत सर म्हणण्याऐवजी मास्तर म्हटले जाई.) मास्तरांचे शिकवणेच असे हसत खेळत असायचे की तास संपूच नये असे वाटे. त्या वेळच्या संस्कृत अध्ययनात व्याकरणावर जास्त भर असे. इतका की अखेरच्या मॅट्रिकच्या परीक्षेत ४० गुण व्याकरणाला आणि ६० गुण भाषांतरासाठी असत. श्लोकांचे अर्थ लावणे, इंग्रजी तर्जुम्याचे संस्कृत भाषांतर करणे किंवा संस्कृतचे इंग्रजीत करणे ह्या अभ्यासाला खूपच रंग चढे.

साल १९३४. एप्रिल अखेर. वार्षिक परीक्षा पार पडून मी इंग्रजी ७ वीत म्हणजे मॅट्रिकच्या वर्गात गेले होते. आमच्या मुख्याध्यापिका कमलाबाई मला म्हणाल्या, "संस्कृतमधली तुझी प्रगती पाहता आपले कुळकर्णी त्या विषयात तुझ्याकडून तयारी करून घेणार आहेत. मनापासून अभ्यास कर आणि शाळेचं नाव उज्ज्वल कर." कुळकर्णी मास्तरांच्या हसत-खेळत शिकवण्यावर आम्ही विद्यार्थिनी बेहद्द खूष होतो. त्यात मला ही विशेष संधी मिळाली.

३४ सालच्या जून महिन्यापासून मॅट्रिकची परिक्षा पार पडेपर्यंत मास्तरांनी कधीही कंटाळा न करता मला सतत ह्या गीर्वाणवाणीचे सुभग दर्शन घडवले. कादंबरीसार वाचून घेतले कालिदासाच्या नाटकातील प्रसिद्ध श्लोकांचा परिचय करून दिला नि मुख्य म्हणजे व्याकरणाचा पाया चांगलाच मजबूत करून घेतल्यामुळे गीताभ्यास सुलभ करून दिला. अनेक व्यवधाने सांभाळून माझ्या या शिकवणीसाठी मास्तरांनी रोजचा तास दीड तास खर्च करावा. दिवसभरची शाळा संपल्यावर माझे हे अध्ययन चाले पण वेळ इतका आनंदात जाई. त्यात मास्तरांची विनोदबुद्धी. एकूणच त्यांच्या घरी असताना मी वेगळ्याच विश्वात वावरायची. कुळकर्णी तिघे बंधू एकत्र राहत असत. पण कधी कासावणे, करवादणे हे ऐकलेच

नाही. एक आदर्श कुटुंब मी जवळून पाहत होते. मला त्याची अपूर्वाई नि कौतुक वाटे.

माझे अध्ययन चालूच होते. १९३५ च्या एप्रिल महिन्यात परीक्षा पार पडली नि मला हायसे वाटले. पेपर चांगला गेला होता. पण निकालाविषयी साशंक होते. नि काय आश्चर्य! सर्व विद्यार्थिनींमध्ये संस्कृत विषयात मी प्रथम आले. नि मला यमुनाबाई दळवी शिष्यवृत्ती (त्या वेळचे रु. २००) मिळाली. मास्तरांनी घेतलेल्या मेहनतीचे चीज झाले नि शाळेचे नाव उजळ झाले. आजच्या ह्या युगात प्रत्येक कृतीचे नि वस्तूचे मोजमाप पैशांनी होत असते. पण ते दिवसच वेगळे होते. मास्तरांनी मनापासून मला शिकवले पण पैशाची कधीच अपेक्षा ठेवली नाही. म्हणूनच त्यांनी केलेल्या ज्ञानदानाचे ऋण आजही मोठ्या अभिमानाने मी मिरवीत आहे.

माझ्या आतापर्यंतच्या आयुष्यातला तो काही महिन्यांचा तुकडा म्हणजे एक अमोल ठेवा आहे. संस्कृत विषयाच्या जोरावर बी. ए. करताना व पुढे मराठी-संस्कृत घेऊन एम. ए. करताना झालेला आनंद, तसेच हिंदी, बंगाली, गुजराथी भाष्याभ्यास करताना वाटलेली सुलभता, मराठीतून यशस्वी झालेल्या वक्तृत्वस्पर्धा, या साऱ्याचे श्रेय मास्तरांचे आहे.

मास्तरांचे व्यक्तित्व, त्यांची वागण्याची-बोलण्याची पद्धत, निरहंकारी वृत्ती, मनापासून अध्यापन करण्याची तयारी – किती किती गुण वर्णावेत ? आदर्श शिक्षक कसा असावा म्हणून कुणी विचारले तर प्रथम मुखी नाव येईल ते वि. ह. कुळकर्णी.

* *

# सर

## गिरिजा कीर

रुईया कॉलेजचा मधला चौक. उत्सुक, आनंदी, खोडयाळ चेहऱ्यांचं सम्मेलन. चहूअंगाला ठेचाठेच गर्दी. व्यासपीठावर इंग्रजीचे प्राध्यापक ' फिश पॉण्डस 'वाचून दाखवत आहेत. एखाद, दुसरं वाक्य हवेत विरघळलं असेल नसेल, पोरांचा हाऽऽ गिल्ला " We want V.H. we want...we..." आवाजाची पट्टी वाढती. मान्यवर प्राध्यापक महाशय पराभव स्वीकारून बाजूला होतात आणि खास या समारंभाचे अनभिषिक्त ' शब्द सम्राट ' टाळ्यांच्या गजरात व्यासपीठाकडे जायला निघतात.

मध्यम उंची, चालताना मानेला किंचित तिरका बाक, नजर खाली. तर हे व्ही. एच ! या...या माणसासाठी मुले एवढं आकाश खाली खेचतायत? नवल आहे.

आणि नजर वर होते. चष्म्याआडचे लुकलुक डोळे मिस्किल हसतात. गर्दीशी स्नेह जोडतात. तसा चेहरा-मोहरा, देहयष्टी इतर चार-चौघांसारखीच, पण उभं राहण्याची लकब अशी – चेहऱ्यावरचा विश्वास असा की जाणवावं, अरे, तुम्हाला हवेत ते शब्द फक्त मीच देऊ शकतो. मग त्या नजरेनीच चाहत्यांना एक नम्र अभिवादन किंचित नाटकी पण ढोंगी नव्हे. गर्दीतून हास्याची धून. टाळ्यांची पोच पावती. त्यात स्वागत आहे.

मग पुढच्या अर्ध्या–पाऊण तासात हास्याची खसखस, शब्दांचे फुलतुरे, टाळ्यांच्या फैरी, शिट्यांची ऐटबाज साथ – सगळ्या वातावरणाला एक सुखद गिरकी...श्रावणमास नसतानाही रुईया कॉलेजच्या आवारातल्या त्या सायंकालचे रंग इंद्रधनुष्यी होतात.

शब्दांची ही अजब किमयागारी साधलेल्या प्रा. वि. ह. कुळकर्णीचं पहिलं दर्शन मला झालं ते हे असं !

अशा मोठ्या माणसाशी जवळून परिचय होण्याची काही शक्यताच नव्हती. पण तसा योग आला. प्रा. मो. दि. पराडकरांनी माझी ओळख करून दिली. चष्म्या-आडचे डोळे माझ्यावर रोखून सर हसत म्हणाले, " या कधी वर्गात बसत नाहीत वाटतं ?"

" बसते ना सर !"

"मग मला कशा दिसल्या नाहीत ?"

"मी दुसऱ्या बाकावर पहिली."

"ठीक. म्हणजे तुम्ही मागे बसणाऱ्या 'लॉर्डस' पैकी नव्हे. माझं लक्ष तिकडे विशेष असतं."

पण त्या दिवसापासून सर माझ्या जाण्यायेण्यावर बारकाईने लक्ष ठेवू लागले ते एका विशेष प्रसंगानं मला जाणवले.

'सशाची शिंगे' या नाटकासाठी विद्यार्थ्यांची निवड व्हायची होती. वेळ साडेदहाची होती. लेक्चर आटोपून, वाचनालयातून पुस्तक घेऊन मी निवडीसाठी ठरलेल्या खोलीत शिरले. माझ्या प्रवेशाबरोबर सर म्हणाले, "ही पहा तुमच्या नाटकातली मेघा." आणि आत्माराम भेंडे चटकन उत्तरले, "अगदी परफेक्ट! हे सिलेक्शन तर झालंच!"

मी मात्र आश्चर्यानं दोघांकडे पाहत राहिले. सर हसत म्हणाले, "बिचकू नका. तुम्हाला ॲक्टिंग करायलाच नको. तुमच्या हातात नेहमीच पुस्तकांचा भारा असतो. नेहमी जशा गंभीर वागता तशाच स्टेजवर वागा. या रोलला शोधून अशी मुलगी मिळाली नसती. वंडरफुल कॅरेक्टर!" आणि त्यानंतर महिनाभर वेळ मिळेल तेव्हा सर तालमींना येऊन बसायचे. भारतीय विद्याभवनातल्या प्रयोगाच्या वेळी त्यांनी आमच्या बरोबर येऊन आम्हा सर्वांचं तोंडभर कौतुक करून आम्हाला खूप चिअर अप केलं. घरातल्या वडीलधाऱ्या माणसानं घ्यावी तशी आमची जबाबदारी सरांनी घेतली होती.

मी बी. ए. च्या वर्गात गेले अन् शेक्सपिअर शिकवायला वि. ह. येणार हे ऐकून आनंदले. तिसऱ्या तासाची घंटा झाली. अन् कुठून कुठून मुलांच्या झुंडी वर्गात शिरल्या. दोन मुलांच्या बाकावर चार-चार, पाच-पाच मुलं रेटारेटीने बसली. सबंध वर्ग विद्यार्थ्यांनी फुलून गेला अन् सरांनी 'एन्ट्री' घेतली. 'एन्ट्री' हाच शब्द चपखल बसणारा. सर एखाद्या इंग्लीश नटासारखे प्रवेश करत होते. नजर खाली पण डोळे गर्दीचा वेध घेणारे. एका हातात पुस्तक. मग टेबलाला किंचित तिरकं रेलून त्यांनी वर्गाचा अंदाज घेतला. गालात कोंडलेलं हसू आता चेहऱ्यावर सांडलं होतं. डोळे म्हणत होते – "अरे बाबांनो, तुम्ही माझे विद्यार्थी नव्हेत. दुसऱ्या प्राध्यापकाला माशा मारायचं काम लावून इकडे आलात. पण मला ठाऊक आहे, तुम्ही माझ्याच वर्गात यायला हवं."

त्याच दांडग्या आत्मविश्वासात आणि मिस्किल हास्यात सरांनी शेक्सपिरियन रंगभूमी आमच्या डोळ्यांपुढे उभी केली. सरांनी शिकवलेलं डोक्यात पक्कं झालं. 'मी शिकवतोय हे तुमच्यापर्यंत निश्चित पोचलंय–' हा आत्मविश्वास घेऊन सर वर्गाबाहेर पडले. पाठोपाठच वर्गाचं वादळसं ओसरलं.

सरांच्या कारकीर्दीत आमच्या कॉलेजात अनेक विद्वान प्राध्यापक होते. उत्तम शिकवणारे होते. भारदस्त व्यक्तिमत्त्व व चांगला नावलौकिक असलेलेही होते. पण प्रा. वि. ह. कुळकर्णींच्याइतका विद्यार्थीप्रिय प्राध्यापक शोधूनही मिळाला नसता. यावर अनेकांची मल्लिनाथी अशी की वि. ह. हे खरे ' मास्तर.' विद्यार्थ्यांना पास व्हायला शिडधा दाखवतात. सरांचा विद्यार्थी नापास होणंच कठीण हे तर खरंच. पण ते आवडते होते त्याचं कारण अगदी निराळं.

सरांना दुर्मुखलेलं, वैतागलेलं, संतापलेलं, चिडलेलं आम्ही कधीही पाहिलं नाही. त्यांचं प्रसन्न हसणं त्यांच्यापुरतं नसायचं. चांदणं शिंपल्यासारखं ते आनंद शिंपायचे. विद्यार्थ्यांची तरुण मनं टवटवीत करायचे जाणिवा जाग्या होण्याच्या त्या काळात जीवनाला हसत सामोरं कसं जावं हे आम्ही सरांकडे बघून शिकलो. सरांनी आमच्या डोक्यात शेक्सपिअर रुजवला अन् मनात हास्याचा मळा.

सरांचा आणि माझा परिचय कदाचित कॉलेजपुरताच राहिला असता. पण एका मजेदार योगायोगाने तो आणखी जिव्हाळ्याचा झाला. संस्कृत वक्तृत्वस्पर्धा होत्या. आमची जय्यत तयारी झाली होती. स्पर्धेला जाण्यापूर्वी कॉलेजमध्ये आम्ही भाषण म्हणून दाखवावं अशी प्रा. रं. रा. देशपांडे यांची इच्छा होती पण आमचं संस्कृत भाषण ऐकायला ऑडियन्स आणायचा कुठून ? आम्ही दोन स्पर्धक, प्रा. रं. रा. देशपांडे आणि प्रा. मो. दि. पराडकर असे चौघे चिंताक्रांत चेहरे करून एका वर्गाबाहेर उभे होतो. एवढ्यात समोरून वि. ह. आले. आमचे विचारमग्न चेहरे बघून त्यांनी कारण जाणून घेतलं. म्हणाले, " काळजी करू नका. मी देतो ऑडियन्स " आणि पाचच मिनिटांत आमची फलटण घेऊन ते एका तुडुंब भरलेल्या वर्गात शिरले.मुलं ' हे कोण पाव्हणं ' म्हणून आमच्याकडे पाहू लागली. आम्हीही बुचकळ्यात पडलो. काही कळण्यापूर्वीच सरांनी बोलायला सुरुवात केली–

" कॉलेजमधल्या या दोन विदुषी (आमच्याकडे नजर टाकून, ' टाळ्या वाजवा ' अशी मुलांना खूण केली. हशा आणि टाळ्यांचा प्रचंड कडकडाट. आमचे चेहरे बावळटासारखे.) या संस्कृत वक्तृत्वस्पर्धा गाजवायला चालल्या आहेत. (आगला ! भलत्याच हुशार रे ! पोरांचा आहेर. मला पळून जावंसं वाटतं. सर पुढं बोलणं सुरू करतात–) या तुम्हा हुशार विद्यार्थ्यांना भाषण ऐकवायला मुद्दाम आल्या आहेत. तरी त्यांचं स्वागत करा–" प्रचंड हशा आणि बाक वाजवून स्वागत. मौज म्हणजे तो बी. ए. चा इंग्रजीचा वर्ग होता. तिथे मराठी मुलांबरोबर पार्शी आणि ख्रिश्चन मुलेही होती. आमचं संस्कृत भाषण आम्हालाच धड कळत नव्हतं. मग त्यांना कळण्याची तर सुतराम शक्यता नव्हती. आम्ही घडाघडा बोलत होतो आणि पोरं मजेदार चेहरा करून स्वतःची करमणूक करून घेत होती.

त्यानंतर आणखी कसल्या स्पर्धा झाल्या. मला दोन-तीन बक्षिसे मिळाली.

कॉलेजात सर्वांनी पोटभर कौतुक केले. लेडीज रूममध्ये इरावती भेटायला आली.

" मी वि. ह. कुळकर्णींची मुलगी. अण्णांनी तुझी ओळख करून घे म्हणून सांगितलं. आईनं तुला घरी बोलावलंय. येशील ?"

मी इरावतीच्या घरी गेले. मधल्या दारातून आत डोकावले. इरावती सांगत होती. " हे इकडच्या बाजूचे भाऊसाहेब खांडेकर, मधले माडखोलकर आणि ते तुमचे सर – आमचे अण्णा." मी दुरूनच तिथला काव्यशास्त्रविनोद ऐकत होते. महाराष्ट्रातले तीन थोर साहित्यिक डोळे भरून आदराने पाहत होते. आपल्याला असं व्हायचंय असं मनातल्या मनात म्हणत होते आणि इरावतीने मला स्वयंपाकघरात नेले. आई चकल्या तळत होत्या. गरमगरम चकल्या आणि लोणी माझ्यापुढे ठेवत त्या सायीचं मऊमऊ बोलत राहिल्या. मायमाखल्या नजरेनं कौतुक करत राहिल्या.

' आई ' हा माझा वीक पॉईंट. न कळत्या वयात हे नातं गमावलेल्या मला आईविषयी नेहमीच कुतूहल वाटे. आई इतकी छान असते ! इतकं मृदू बोलते ? ... मी हळूच म्हटलं, " इरावती, मला तुझी आई आवडली."

" मग येत जा ना ग ! आईला तुझं फार कौतुक आहे. अण्णा नेहमी सांगतात ना तुझ्याबद्दल."

" येत जा ग ! तू मला आमच्या इरावतीसारखीच !" आई म्हणाल्या.

इरावतीच्या घरून मी बाहेर पडले ती एक नवा शोध लावून. सरांच्या चेहऱ्यावर न संपणारं हसू होतं. त्याचं कारण आईंसारखी आनंदमूर्ती, तृप्त सहचारिणी त्यांना लाभली होती म्हणून. आईंच्यामुळं मी सरांच्या घराला जोडली गेले.

माझी लग्नानंतरची काही वर्षे धावपळीत, विवंचनेत, संसाराची घडी बसवण्यात गेली. जगाशी संपर्क तुटला. कुणाकडे जाणे-येणे राहिले नाही. १९६७ मध्ये ' माहेरचा आहेर ' हे पुस्तक प्रसिद्ध झालं. प्रकाशकांनी मला अतोनात मनस्ताप दिला. दोन प्रकाशकांच्या व्यक्तिगत वैमनस्याचा मला विनाकारण उपद्रव झाला. साहित्यातही राजकारण असते हे कळून मन उद्विग्न झालं. कुणाला पुस्तक दाखवायची उमेद राहिली नाही. अशा मरगळलेल्या मन:स्थितीत इरावतीचं सुरेख पत्र आलं. सरांनी आणि आईंनी ते पत्र तिला लिहायला सांगितलं होतं. मोठ्या प्रेमाने मला भेटायला बोलावलं होतं. माझ्या पहिल्यावहिल्या पुस्तकाचं अभिनंदन करण्यासाठी आईंनी माझी खणा-नारळानी ओटी भरली. गोड-धोड खाऊ घातले. दोघांनी तोंडभर शाबासकी दिली. पुस्तक निघाल्याचा आनंद मला त्या दिवशी प्रथम झाला.

त्यानंतर मी ' अनुराधा ' मासिकाचे संपादनाचे काम करू लागले. आणि

सरांकडे जाणे-येणे वाढले. माझ्या शब्दाचा मान ठेवून सरांनी अनुराधेत चुरचुरीत लेखमाला लिहिली. रेशमी चिमटे घेत सत्यदर्शन घडवणाऱ्या वि. हं. च्या खेळकर शैलीने अनुराधेच्या सौंदर्यात दर्जेदार बदल घडवून आणला. साहित्याची आवड असलेली आपली एक विद्यार्थिनी धडपडून पुढे येतेय याचे सरांना विलक्षण कौतुक वाटायचे. वेळी-अवेळी फोन करून ते मला घरी बोलवायचे. मासिकाच्या स्वरूपावर ते चर्चा करायचे. माझ्या लेखनावर आवर्जून बोलायचे. सूचना द्यायचे. नव्या उपक्रमाचे कौतुक करायचे. कुठे माझ्या भाषणाबद्दल, कथाकथनाबद्दल ऐकले की लगेच पत्र टाकायचे. माझ्या नव्या-जुन्या परिचितांत सरांच्या इतकं माझे कौतुक क्वचितच कुणी केले असेल.

आणि हे माझ्याच बाबतीत नव्हे, तर सर ज्यांच्या म्हणून सहवासात आले त्यांच्याशी सौहार्दानंच वागले. ज्याला आपले मानले, त्याचं भरभरून कौतुक करायचे. त्याच्या गुणांचं कौतुक करायचे, त्याच्या यशाने आनंदित व्हायचे, अन् त्याच्या दुःखाने व्यथित व्हायचे हा सरांच्या स्वभावातला विलोभनीय विशेष, म्हणावा लागेल.

मी घेतलेल्या मुलाखतींचे महाराष्ट्रात चहूबाजूंनी भरभरून कौतुक झाले. साहित्यिकांच्या 'खाशा गोटात' कौतुकाचा जरा दुष्काळच असतो. सर मात्र त्याला अपवाद ठरले. त्यांची कौतुकाची तऱ्हाच आगळी. त्यांनी मुलाखतीवर विस्तृत लेख लिहून माझ्या हाती आणून दिला. (सरांसारख्या मान्यवर समीक्षकाचा तो लेख 'जगावेगळी माणसं' या माझ्या मुलाखतीच्या पुस्तकाची प्रस्तावना म्हणून मी गौरवाने वापरला आहे) माझ्या परिचयाच्या पंचवीस वर्षांत सरांची मी विविध रूपे पाहिली आहेत. प्रसन्न, हसरी, उत्साही ! एकदाच त्यांच्या चेहऱ्यावरचं हे हसू मावळलेले पाहिले– आई गेल्या तेव्हा.

फोन आला तेव्हा मी लगेच घरी जाऊन पोचले. आतल्या खोलीच्या दाराशी उभी होते. सर जवळ आले आणि म्हणाले, "इरावतीजवळ बस. तिची समजूत घाल." दुःखाने काठोकाठ भरलेले असताही सरांनी मनावर विलक्षण संयम ठेवला होता.

त्यानंतर मी त्यांच्या घरी गेले तेव्हा आईंच्या हातचं मृत्युपत्र त्यांनी मला वाचायला दिले. आईंच्या तृप्त समाधानी वृत्तीबद्दल, सोशिकपणाबद्दल ते प्रथमच त्या दिवशी बोलले. त्यापूर्वी किंवा त्यानंतर तो विषय पुन्हा निघाला नाही.

सरांच्या वृत्तीत नाट्य आहे पण नाटकीपणा नाही. जिव्हाळा आहे पण दिखाऊ हळवेपणा नाही. त्यांच्या हसऱ्या, आनंदी वृत्तीचा गाभा मात्र संयमी, विचारी आणि खंबीर आहे. याचा अर्थ सर कठोर आहेत असा नाही. कधी मला बरं नाही असे कळले तरी ते लगेच पत्र टाकतील. विश्रांती घ्यायचा उपदेश

करतील. कळवतील – " जगाचे कसे होईल ही विवंचना करू नये. महिनाभर कथा-कथन अथवा लेखन केले नाही तर महाराष्ट्र सारस्वताची फार मोठी हानी होईल असे समजू नये. जगभर दौरे काढून तब्येतीची हेळसांड करू नये–" मी उत्तर पाठवले नाही तर अस्वस्थपणाने चौकशी करतील. पुन्हा धडपडून आपणच पत्र लिहितील. त्यात झकास दोन-चार टोमणे मारतील. या सगळ्यामागे त्यांचे पित्याचे वत्सल मन असते.

मी अनुराधेतून बाहेर पडले तेव्हा सरांना अतोनात दुःख झाले. माझे लेखन मागे पडणार नाही याची त्यांना खात्री होती. पण माझी आर्थिक परिस्थिती बिकट होईल की काय हीच त्यांना काळजी वाटत होती. त्यामुळे त्यानंतर प्रसिद्ध झालेल्या माझ्या पुस्तकाच्या प्रकाशनाला ते आवर्जून आले. नुकतेच आजारातून उठले होते. दोघा-दोघांच्या आधाराने जिना चढून आले. उभे राहता येत नव्हते तरी पंधरा-वीस मिनिटे भरभरून बोलले. म्हणाले, " तुझं कौतुक करायला मी येणार नाही तर कोण येईल ? मला घरी राहवलंच नसतं."

सरांची दोन्ही मुले आज परदेशात आहेत. नातवंडांत सुखाने काळ घालवायला ते अमेरिकेत राहू शकले असते. मुलांना हट्टानं त्यांनी इथं ठेवून घेतले नाही. तसेच आपण तिकडे राहणार नाही हेही ठामपणे सांगितलं. त्यामागे उतारवयाचा हट्टीपणा नाही, तर ठाम निष्ठा आहे. सर सांगतात, " मी इथल्या मातीत जन्म घालवलाय. इथली माणसं, हे रस्ते, खिडकीतून दिसणारं हे मोकळं आकाश माझ्या सवयीचं झालंय. ही गर्दी आणि मोकळ्यावर वावरणारी ही माणसं मी पाहिली नाहीत तर मी वेडा होईन. मी माणसांवर प्रेम करणारा माणूस आहे."

आमचे सर हे असे आहेत – प्रेम देणारे, जीव लावणारे, हसरे, आनंदी. सरांची पंचाहत्तरी झाली तेव्हा मी भाषण केले नाही. मला पटतच नाही की सरांची पंचाहत्तरी उलटली. चैतन्याला वय नसतं. हास्य कधी म्हातारं होत नाही. रुचीने जीवन जगणाऱ्या आणि हास्याची फुलं फुलवणाऱ्या सरांसारख्या माणसांनी उदंड जगावं. नव्या पिढीला चैतन्याचा प्रकाश द्यावा. 'सर' म्हणजे आमच्या पिढीला मिळालेलं वरदान आहे !

* *

अनुक्रमणिका

# दुर्लभः स गुरुर्लोके शिष्य चित्तापहारकः

## स्नेहलता मुळये

१९४१ साल. त्या वेळची मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण होऊन रामनारायण कॉलेज-मध्ये मी प्रवेश केला. कॉलेजशिक्षण परवडणारे नव्हते. शिकवण्या वगैरे करूनच कॉलेज फी व पुस्तकांची सोय करावी लागे. तसेच कॉलेजच्या प्राध्यापकांना जाऊन आपल्या अडचणी सांगणे किंवा त्यांच्याशी बोलणे म्हणजे महाकर्मकठीण. कारण प्राध्यापकांशी मराठीतून बोलणे म्हणजे कमीपणा, अप्रतिष्ठा, बावळटपणा अशी काहीबाही भ्रामक समजूत होती.

रुईया कॉलेजमधील इंग्रजी विभागातील प्राध्यापकांत प्रा. वि. ह. कुळकर्णी यांचा समावेश होता. प्रा. फर्नांडिस, प्रा. रॉड्रीक्स, प्रा. डिसुझा, प्रा. मर्ढेकर हे सारे आंग्लभाषीय. त्यामुळे साहजिकच प्रा. वि. हं. शी आम्ही जास्त मनमोकळे-पणाने बोलू शकत असू. इंग्लिश ऑनर्स घेतल्यावर परिचय दृढ झाला व सरांच्या घरातही शिरकाव झाला. बाईंच्या अगत्यामुळे, जिव्हाळ्यामुळे सरांच्याकडे जाण्यास कधीच भीड अथवा संकोच वाटला नाही.

इंग्लीश ऑनर्सच्या पेपर्सपैकी प्रा. वि. हं. नी आम्हाला ' हिस्ट्री ऑफ इंग्लीश लिटरेचर ' हा प्रचंड भाग इतक्या खुमासदारपणे शिकवला की अजूनही त्यांनी दिलेल्या नोटस् पुन्हा पुन्हा वाचाव्याशा वाटतातच. परंतु त्यांच्या अध्यापनामुळेच काही काही विशिष्ट साहित्यिकांच्या साहित्याबद्दल ओढ निर्माण झाली. कुतुहल जागृत झाले. शिकवता शिकवता सरांनी केलेल्या कॉमेंट्स् मोठ्या मार्मिक आठवणी मोठ्या अविस्मरणीय. तसा सरांचा स्वभाव मिस्किल. वर्गात हास्य-कल्लोळ. परंतु सर जैसे थे. रंगतदार निवेदनपद्धती, इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व, घटकाचा अभ्यास, यामुळे तासाची झालेली घंटा कधी कधी कळायची नाही.

१९४५ साली बी. ए. परीक्षेच्या वेळी घरच्या अडचणींमुळे ऑनर्स पेपर्सना बसणे नकोसे झाले. परंतु त्या वेळचे एलफिन्स्टन कॉलेजचे प्रिन्सिपॉल वेलिंगकर यांनी मोठा धीर दिला. ऑनर्स पेपर्सना बसण्यास प्रवृत्त केले. तशी माझी त्यांची ओळख ना देख; परंतु माझी एकूण अडचण लक्षात घेऊन त्यांनी माझी परीक्षा—

मंडपात इतकी काळजी घेतली की मी ऑनर्स पेपर्सला बसले व त्यात 'हिस्ट्री ऑफ इंग्लीश लिटरेचर' या विभागाने मला तारले. अक्षरश: माझ्या हातून काही अभ्यास होऊ शकला नव्हता. मला इंग्लीश ऑनर्स मिळाले. त्या क्षणी प्रा. वि ह. व प्रि. वेलिंगकरांबद्दल जी काही कृतज्ञता दाटून आली ती शब्दातीत आहे.

माझ्या जीवनाला जी काही यथोचित कलाटणी मिळाली त्याचे बरेचसे श्रेय माझे गुरुवर्य प्रा. वि. ह. कुळकर्णी, एलफिन्स्टनचे प्रि. वेलिंगकर व एस्. टी. कॉलेजचे प्रि. नुरुल्ला यांजकडे जाते. योग्य क्षणी मिळालेल्या मार्गदर्शनाची, मदतीची फेड कोणीही काहीही केले तरी करू शकत नाही हेच खरे.

पुढे योगायोग असा की ज्या शाळेत शिक्षक म्हणून प्रा. वि. हं. नी आपल्या अध्यापनकार्यास सुरुवात केली, त्याच एस. एल. ॲण्ड एस. एस. गर्लस हायस्कूल-मध्ये मीही अध्यापिका म्हणून रुजू झाले. त्या शाळेतही सरांचा लौकिक मोठा. बी. टी. झाल्यावर ज. ए. इ. च्या मुलींच्या शाळेत रुजू झाले आणि सरांची इरावती माझ्या वर्गात. इरावतीला इंग्लीश शिकविताना धाकधूक वाटे, परंतु घरी एकंदर रिपोर्ट बरा गेलेला दिसला. इरावतीमुळे पुन्हा सरांच्या घरी जाणे येणे झाले. नेहमीप्रमाणे मिस्कीलपणे सर म्हणाले, "इरावती इंग्रजीचा तास आवडतो म्हणते." मी मुद्दामच त्यांच्या चेहऱ्यावरचे भाव न्याहाळले.

आजतागायत सर लिहीत आहेत. त्यांच्या लेखनव्यापाकडे पाहून मन थक्क होते. नैराश्याने त्यांना वेढले नाही. अडचणींचा त्यांनी कधी बाऊ केला नाही. आपल्या लेखनानी त्यांनी मराठी साहित्यात मोलाची भर घातली. एवढंच नव्हे तर कित्येक नवोदितांना उत्तेजन दिले. मार्गदर्शन केले. अमेरिकेची वारी त्यांना फारशी पसंत पडलेली दिसली नाही. 'शहाडे सदन' मधील वास्तव्य जास्त प्रिय वाटते. अलीकडे मात्र डाव्या हातात पुस्तक घेतलेले, थोडीशी तिरकस, झुकती मान ठेवून, रस्त्याच्या कडेने सकाळी अगर संध्याकाळी क्लासकडे जाणारे प्रा. कुळकर्णी दादरमध्ये दिसत नाहीत.

बदलत्या परिस्थितीशी जुळवून घेण्याचे फार मोठे कसब सरांनी हस्तगत केले आहे. चुकल्या चुकल्यासारखं वाटलं तरी ते तसे वाटून घेणार नाहीत. जीवनाची सारी आव्हाने आनंदाने स्वीकारायची हा स्वभावधर्म. म्हणूनच बाईंच्या आकस्मिक निधनानंतर निर्माण झालेली असह्य पोकळी ते सहन करू शकले.

प्रा. वि. हं. नी आपल्या अध्यापनकौशल्याने आम्हा विद्यार्थ्यांना आपलेसे केलेच परंतु त्यांच्या आदर्श जीवनदृष्टीमुळे आम्ही जास्त भारावलो. आजच्या घडीला त्यांच्याकडे पाहून आठवण होते ती एका श्लोकाची–

गुरव: सन्ति बहव: शिष्यवित्तापहारका: ॥
दुर्लभ: स गुरुर्लोके शिष्य चित्तापहारक: ॥

* *

# आणि राजीनामा स्वीकारला गेला नाही

सौ. वासंती पेंगणकर

सौ. आशा धारप यांनी स्वत:ची फोन करून ओळख करून दिली व पूज्य तो. श्री. वि. ह. कुळकर्णीसर यांच्या आठवणी त्या प्रकाशित करत असल्याचे सांगितले. सरांची मी एक विद्यार्थिनी असल्याचे त्यांना समजले होते.

सन १९२७ ते ३१ या आयुष्याच्या बाल्य व तारुण्य या उंबरठ्यावरील काळात मन पोहोचले. आपल्या भावनांशी समरस होऊन त्यात पूर्ण गुरफटून जाण्याचे ते निरागस वय. विद्यार्थ्यांवर संस्कार करणारे त्या वेळचे दोन घटक म्हणजे घर व शाळा. सिनेमा, टी. व्ही. व मित्र-मैत्रिणींची कंपनी नव्हती. सुदैवाने शाळेत आम्हाला पुस्तकी ज्ञान शिकवण्याबरोबर इतर उत्तम संस्कार करणारे शिक्षकपण लाभले होते. तेव्हाचे शिक्षक 'सर' नव्हते, 'मास्तरच' होते.

अतिशय विद्यार्थीप्रिय मास्तर म्हणजे आमचे पूज्य श्री. वि. ह. कुळकर्णी. संस्कृत व मराठी हे त्यांचे विषय आणि अतिशय उत्तमरीतीने हसत-खेळत ते शिकवून विषय समजावून देत. त्यांच्यावर आमची किती भक्ती ! हो भक्तीच. त्या वेळचे ते संवेदनाक्षम मन. मास्तर आवडले की 'गुरुर्देवो भव'च व्हायचे. ज्यांना स्वभावामुळे किंवा चांगल्या रीतीने न शिकविता आल्यामुळे मुलींची मने काबीज करता येत नसत, त्यांची थोडीबहुत टिंगल, नक्कल दुपारच्या सुट्टीत व्हायची.

त्या भक्तीचे किंवा आदराचेच उदाहरण सांगते. काही कारणावरून शाळेच्या चालकांचा व श्री. कुळकर्णी मास्तरांचा मतभेद होऊन प्रकरण विकोपाला गेले व मास्तरांनी राजीनामा देण्याचा निर्णय घेतला व निर्णयाप्रमाणे राजीनामा दिलाही. तेव्हा आम्ही पाचवी-सहावीच्या (आत्ताची आठवी-नववी) विद्यार्थिनींनी एकत्र येऊन एक अर्ज तयार केला. मास्तर जर शाळा सोडून निघाले तर सह्या करणाऱ्या सर्व विद्यार्थिनी शाळा सोडून जाणार असा मजकूर लिहिला. कुठे काय चाव्या फिरल्या माहीत नाही, पण हे प्रकरण मिटले व मास्तर शाळा सोडून जाणार नाहीत असे नक्की ठरले. त्या शुक्रवारी देवीपुढे फुटाणे, शेंगादाणे या नैवेद्याबरोबर पेढे पण होते.

कधीही गैरहजर न राहणारे मास्तर एकदा लागोपाठ पाच-सहा दिवस

शाळेत आले नाहीत. कुणीतरी बातमी आणली की ते आजारी आहेत. वर्गातले हसू पार पळून गेले आणि सर्वच चेहरे उतरले. आणि सर्वांनी मिळून त्यांना भेटावयाला जावे असा एका धीट मुलीने प्रस्ताव मांडला. रविवारी जायचे असे ठरले. त्यावेळी गिरगावातून गोरेगाव हा दूरचा प्रवास वाटायचा. मी तर पहिल्यांदाच आगगाडीत बसले. (आता माझी धाकटी सूनबाई १२ महिने गोरेगाव ते व्ही. टी पर्यंत नोकरी-साठी ये-जा करते. ती बिच्चारी की मी बिच्चारी ?) धडधडत्या मनाने आमचा घोळका मास्तरांच्या घरी गेला. नुकताच ताप उतरल्यामुळे ते उठून बसले होते. कै. सौ. कुळकर्णीबाईंनी आम्हाला हास्यमुखाने या-या म्हणून बसवून, नावे विचारून गप्पागोष्टी सुरू केल्या. थोडया वेळाने मास्तरांनी आम्हाला ते लिहीत असलेल्या जी. के. चेस्टटंनच्या चरित्राची टाचणे दाखविली. मास्तरांचा केवढा दांडगा अभ्यास, केवढे वाचन ! ते पाहून आम्ही अगदी थक्क झालो. अभिमानाने मन भरून आले. निघताना एका धिटुकलीने, " मास्तर, तुम्हाला लवकर बरं वाटू दे अशी आम्ही देवाकडे प्रार्थना करतो " असे लाजत लाजत म्हटले. त्यावर लगेच उत्तर " अग देवबाप्पाने तुमची प्रार्थना कधीच ऐकली आहे. मी पूर्ण बरा आहे. परवापासूनच शाळेत येणार. तेव्हा बहुधा, पुस्तके होमवर्क सर्व व्यवस्थित आणा."

अत्यंत विनोदी बोलणे, एखादीच्या अभ्यासाबद्दल किंवा वागण्याबद्दल परखडपणे शेरा मारताना सुद्धा बघण्याची विशिष्ट तिरकस नजर, शिकविण्याची सुंदर पद्धत, यामुळे शिक्षक म्हणून आम्हा विद्यार्थ्यांकडून त्यांना अगदी १०० टक्के मार्क मिळाले होते. ज्या दिवशी त्यांचा तास असायचा त्या दिवसाची आम्ही उत्सुकतेने वाट पाहत असू. तास फार लवकर संपतो हे तर नेहमीच वाटायचे.

माझ्या एका भावाच्या डोळयात जन्मापासून मोतीबिंदू होता. कुठूनतरी त्यांना हे समजले. तेव्हा ते काही औषधी वनस्पती व मंत्र याचा अभ्यास करीत होते. त्याच्या साह्याने आपण मोतीबिंदू बरा करण्याचा प्रयत्न करू शकू असे त्यांनी मला सांगितले. घरी सांगितल्यावर खर्चाची चौकशी करण्यास आईने मला सांगितले. मास्तरांना विचारल्यावर ते म्हणाले, " एक पैसाही मी घेऊ शकत नाही. तसे सक्त बंधन आहे." सतत पंधरा दिवस दुपारच्या पाऊण तासाच्या सुट्टीत ते आमच्या घरी (ठाकूरद्वारपासून गिरगावापर्यंत) जाऊन उपचार करीत असत. गुण आला नाही. पण मास्तरांची आस्था पाहून मात्र आम्हा सर्वांचे मन भारावून गेले. व्यवसायाशिवाय इतर काही शिकण्याची त्यांची आवड व जिद्द निश्चितच कौतुकास्पद. त्यांच्याबद्दल वाटणाऱ्या आदरात आणखी भर पडली.

शाळेतले शिक्षण संपले. पुण्यात स्थायिक झाल्यामुळे मुंबईतील लोकांच्या विशेष भेटीगाठी होत नसत. मैत्रिणीकडून समजले की ' रुईया 'मध्ये मास्तरांची प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली आणि ते 'सर' झाले. तिकडेही ते अतिशय

विद्यार्थीप्रिय झाले.

मध्यंतरी माझ्या मुलीची लग्न-पत्रिका मी त्यांना पाठवली. पत्रिकेच्या नमुन्याला रसिकतेने दाद देऊन शुभाशीर्वादाचे पत्र पाठवणारे ते एकटेच होते. कधीही पुण्याला आले की आठवण ठेवून थोडा वेळ तरी भेटायला येतातच. कसल्यातरी सेमिनारच्या निमित्ताने ते आपल्या मित्रासह आमच्याकडे दोन-तीन दिवस मुक्कामाला होते. एक दिवस पुरणपोळीचा बेत केला. त्यांनी इतकी आवर्जून तारीफ केली की मला मी सुगरण असल्याची खात्री वाटू लागली. 'मी एकुलती एक तेव्हा साहजिकच लाडावलेली. पुरणपोळीचा स्वयंपाक मी करू शकेन असे त्यांना वाटलेच नाही.' असा एक बारीकसा टोमणाही दिला. कधीही आता पुरण-पोळी करते तेव्हा ते कौतुकाचे शब्द कानी येतात आणि पुरणपोळी कधी बिघडतच नाही. त्यांच्या चांगुलपणाच्या किती आठवणी सांगाव्यात !

सौ. धारप यांनी आठवणी द्यायला सांगितल्या. पन्नास वर्षांपूर्वीच्या काळात मागे वळून पाहताना मागेपण विरघळले आणि त्याच काळात वावरत असल्याची अनुभूती आली.

माझ्या विरंगुळ्याच्या क्षणात ह्या अनुभूतीचा आनंद मोठा आहे. व तो सदैव जपून ठेवीन.

* *

# पाठनपटीयांसः प्राध्यापकमहोदयाः।

## प्रा. मो. वि. महाशब्दे

प्राध्यापकानां वि. ह. कुळकर्णीमहोदयानां संस्कृतानुरागो नाविदितो मे। तैः सह नैकवारं सञ्जातेषु संलापेषु प्रकटीभूतः संस्कृतप्रणयस्तेषां प्रदर्शितश्च तै-रमन्दादरोऽस्या भाषाया विषये इति तस्यामेवायमादराञ्जलिः समर्प्यते। नितरां ते बहु मन्येरन्निमं मे व्यवसायमिति विश्वासः।

सर्वथाऽनुकूलस्य विधेरयं विलासो यत्तदानींतनीं मॅट्रिकपरीक्षामुत्तीर्णोऽहं प्रविष्टो रामनारायण रुइयामहाविद्यालयम्। तत्र किल एतैः कुळकर्णीमहोदयैः सह गोवर्धन पारीख– देशपाण्डे– टोपे– न. र. फाटक– सोनोपंत दाण्डेकरसदृशाः स्वे स्वे विषयेऽभिज्ञाः प्रकटिताप्रतिमपाठनपाटवाः प्रगताध्यापनपरायणाः प्राध्यापका विराजन्ते स्म। आङ्ग्लभाषानभिज्ञा मादृशाः केचन विद्यार्थिनस्तु महाविद्यालये प्रायः सर्वे विषया आङ्ग्लभाषयैवाध्येतव्या इति चकितचकिता दीनदीना सलिलविहीना मीनाइवाऽऽकुलीभूताः संभ्राता नैराश्यग्रस्ता ध्वस्ता इव कथं कथमपि महता कष्टेनाधीयते स्म। बलवती खलु तेषां मनीषाऽध्ययनविघ्नमेनं दूरीकर्तुं महद्यशश्च समासादयितुम्।

एतादृशान्विद्यार्थिनः समाश्वासयितुं सर्वात्मना प्रयतमानेषु प्राध्यापकेषु कुळकर्णीमहोदयाः किलाग्रेसराः। न केवलं तेषां वाणी 'रुचिरस्वरवर्णपदा रसभाववती' विनोदप्रचुराऽऽकर्षयच्चेतांसिच्छात्राणां परं पाठनपटीयस्त्वमपि किमप्यसाधारणं वरदानभूत्तेषाम्।

स खलु शिक्षको यः सम्यक् शिक्षयति शिष्यान् यस्य चाध्यापनेन चेतस्तेषां समुल्लसति, संजायते समाधानं समागच्छति च तृप्तिः। कुळकर्णीमहोदयानामध्यापनस्य सौष्ठवेन सारल्येन माधुर्येण चान्वभवंस्ते कुशाग्रबुद्धयो वा जडा वा किमप्यनिर्वचनीयं प्रमोदभरं, काममप्यनन्यसाधारणां निर्वृतिम्।

"वितरति गुरुः प्राज्ञे विद्यां यथैव तथा जडे"

इति भवभूतिवचनमन्वर्थमभूत्तेषां विषये।

आत्मनोऽधीतविद्यत्वं स्वविषयनदीष्णत्वं तस्य विषयस्य सङ्क्रान्तिश्चेति भिन्नमेतद्। तदेव पाठकस्य पाठकत्वं यत्पिपठिषूणां चेतांसि विकसयत्युन्मीलयति च चक्षु-

स्तेषामज्ञानतिमिरान्धानां ज्ञानाञ्जनशलाकया। स्वयमधिगतविद्या अपि नैकेऽध्यापका अवगतज्ञानस्य विद्यार्थिषु सम्यक्तया संक्रान्तिं कर्तुं न पारयन्ति। अध्यापनविषयस्य यथावदाकलनं सुष्ठुतयाऽऽलोचनं सुलभतया च तस्याऽध्यापनमिति यद्यद्-प्राध्यापकस्यावश्यकं तत्तत्सर्वं कुळकर्णीमहोदयेषु दृष्टमनुभूतं च मया। अत एव ते शिक्षकाणां धुरि स्थापयितव्या इति मे मतिः। तथा चोक्तं कालिदासेन–

श्लिष्टा क्रिया कस्यचिदात्मसंस्था
संक्रान्तिरन्यस्य विशेषयुक्ता।
यस्योभयं साधु स शिक्षकाणां
धुरि प्रतिष्ठापयितव्य एव ॥ इति

"अध्यापक : परिक्लेशादक्षयं फलमश्नुते" इति तत्त्वं साक्षादात्मसात्कृतमासीत्तैः। विस्मृतं च 'साकल्येन यत्केनाप्याङ्ग्लविदुषा सोपालम्भमुक्तम्' 'When both, the speaker and the audience are comfused, the speech is said to be profound'

शेक्सपिअर इत्यस्य कस्याप्यन्यस्य नाटककारस्य ललितकृतिर्वा भवतु। अस्तु वा कार्लाईल्सदृशस्य तत्त्वज्ञानिनो ग्रन्थः। नैकविधान्युदाहरणान्युद्धृत्य तासां तासां कृतीनां सुलभतयाऽध्यापनमित्यस्ति तेषां विशेषः।

एतादृशस्य धन्यस्य मान्यस्य वदान्यस्यान्तेवासी भवितुं सौभाग्यं मया लब्धमित्यात्मानं सामन्दानन्दमभिनन्दामि। अन्तत इदानीमशीतिवर्षदेशीयानां तेषामुर्वरितमायुः प्रदीर्घं भवतु ते चानामयत्वमिह वा विदेशे वा परां समृद्धिं लभन्तामित्यभ्यर्थये तां जगदम्बामनेन श्लोकेन– यः किल–

अध्यापनेन पारितोषयति शिष्यवृन्दं सद्वर्तनेन खलु नन्दयति बन्धुवर्गम्।
साहित्यनिर्मितिवशात्सुखयत्यभिज्ञान् तं सर्वदाऽव वि. ह. पूर्वकुळकर्णिमम्ब ॥

* *

# ऑल द ह्यूमर स्टँडिंग ऑन द प्लॅटफॉर्म

## प्रा. वसंत गो. नातू

१९४७ मध्ये मी रुईया महाविद्यालयात कलाशाखेत प्रवेश केला. प्रा. वि. ह. कुळकर्णी आम्हाला निबंधाचे पुस्तक शिकवणार होते. पुस्तक बाजारात उपलब्ध व्हायला बराच वेळ लागला. पण विठ्ठलरावांनी पुस्तकातील बहुतेक निबंध शिकविले. वास्तविक त्या काळी एफ. वाय. ची परीक्षा कॉलेजच घेत असे. जेवढे शिकवले असेल तेवढ्यावरच प्रश्न विचारले की झाले. पण विठ्ठलरावांना शिकविण्याची इतकी हौस की त्यांनी चुकारपणा कधीच केला नाही. १९४७ साली त्यांनी शिकविलेले निबंध त्यातील बारकाव्यांसहित अजूनही स्मरणात ताजे आहेत. Hastlitt चा 'on people with one idea.' Lamb चा 'The two races of men' Priestley चा 'On Doing Nothing. गोपाळकृष्ण गोखल्यांचे 'Farewell to Fergusson College.' जगदीशचंद्र बोसांचा निबंध. ह्यातले काही निबध शिकविण्याकरता किती तयारी करायला लागते, हे आता शिक्षकाची भूमिका घेतल्यावर लक्षात येते. विठ्ठलरावांनी कुठलाही संदर्भ गाळला नाही. उलट रंगवून खुलवून क्लिष्टता काढून टाकली आणि इंग्रजी साहित्याविषयी रुची निर्माण केली. निबंध-वाङ्मय शिकवायला बहुश्रुतता लागते. चतुरस्रपणा लागतो. विठ्ठलरावांचे वाचन विपुल आणि विविध. विनोद तर त्यांना अतिशय प्रिय. त्यामुळे निबंध-वाङ्मय ते उत्तम शिकवत. विठ्ठलरावांच्यामुळेच मला निबंध-वाङ्मयाबद्दल आकर्षण उत्पन्न झाले. नाहीतर माझ्या आवडीचे प्रांत म्हणजे काव्य व नाटक.

डिकन्स हा त्यांचा आवडता लेखक. Pickwick Papers मधील वेचा शिकवताना विठ्ठलराव रंगात येत. डिकन्सच्या विनोदातील सर्व छटा ते उकलून दाखवीत. ते करताना शिकविण्याच्या जोडीला अभिनयाची जोड देत. सबंध वर्ग हसत असे. प्राध्यापक झाल्यावर मीही Pickwick Papers मधील उतारे शिकवले. विठ्ठलरावांचे अनुकरण करणे किती कठीण आहे ह्याची जाणीव होऊन तो नाद सोडून दिला. विनोदाचे शिवधनुष्य पेलणे सोपे नाही हे लक्षात आले. आपल्याला जेवढा आनंद विठ्ठलरावांनी दिला, तेवढासुद्धा आपण आपल्या विद्यार्थ्यांना देऊ शकत नाही याची खंत वाटली. ह्यावरून एक गोष्ट आठवते– इंटरला निबंधाचे

पुस्तक प्रा. परांजपे शिकवीत. Log Fire हा Gardiner चा निबंध त्यांनी छान शिकविला. पण त्यांना विनोदी वाङ्मय शिकवता येत नसे. आमच्या पुस्तकात Robert Lynd चा 'A serman on shaving' हा विनोदी ललित निबंध होता. आता ह्या निबंधाचे कसे होणार म्हणून मी चिंताग्रस्त होतो. पण प्रा. परांजपे रजेवर होते तेव्हा त्यांचे दोन तास विठ्ठलरावांनी घेतले आणि नेमका तोच निबंध दोन्ही तुकड्यांना शिकवला. डिकन्स शिकवताना ते मजा आणीत पण त्यांचे (विठ्ठलरावांचे) विद्वान प्राध्यापक डिकन्स कसा शिकवीत ते सांगून आणखी मजा आणीत. विद्यार्थ्यांना हसू येत असे पण हसणार कसे? कारण "All the seriousness standing on the platform!" विनोदी प्रसंग शिकवून संपला की मग ते (विद्वान प्राध्यापक) विद्यार्थ्यांना हसायची परवानगी देत.

निबंधाचे शीर्षक विठ्ठलराव अशा रीतीने वाचीत की, विद्यार्थ्याला गोडी वाटावी. Priestley चा निबंध 'On Doing Nothing' ह्या शीर्षकातील पहिले दोन शब्द वाचल्यावर ते जरा थांबत आणि मग नाट्यमय रीतीने Nothing हा शब्द उच्चारीत. हातात पुस्तक आहे– विठ्ठलराव पाननंबर सांगतात पण निबंधाचे नाव सांगत नाहीत. कारण नावातसुद्धा मजा असते. 'On Doing' हे शब्द उच्चारतात– मग पुस्तक मिटतात. वर्गाकडे पाहून आढ्याकडे पाहतात आणि मग एकदम शेवटचा महत्त्वाचा शब्द 'Nothing' उच्चारतात. हे दृष्य १९४७ सालातील अजून माझ्या डोळ्यांसमोर आहे.

मराठी निबंधकारांत काळकर्ते परांजपे त्यांचे आवडते लेखक. मुंबई मराठी साहित्यसंघातर्फे त्यांनी श्री. शिवरामपंत परांजपे यांच्यावर ४ व्याख्याने दिली. भाऊसाहेब खांडेकर त्यांचे स्नेही होते. भाऊसाहेबांना विठ्ठलरावांबद्दल आदर होता. मी १९४७ साली भाऊसाहेबांना पत्र लिहिले. उत्तराच्या पत्रात त्यांनी लिहिले– "आपल्या कॉलेजमध्ये प्रा. वि. ह. कुळकर्णी आहेत. काय वाचावे आणि कसे वाचावे याबाबत ते मार्गदर्शन करतील." हे मार्गदर्शन १९४७ सालीच नव्हे तर अजूनही मला उपयोगी पडत आहे. नवीन लेखक पुस्तक शिकवायचे असले की विठ्ठलरावांना गाठायचे. काय वाचू? हा प्रश्न करावयाचा. विठ्ठलराव नुसती पुस्तकांची यादी देत नसत, तर त्यांच्या ग्रंथसंग्रहातील काही पुस्तके पण वाचायला देत.

विठ्ठलराव विद्यार्थीप्रिय होते. ते विद्यार्थ्यांमध्ये सहज मिसळत. त्यांचे गुण ओळखत व त्यांना प्रोत्साहन देत. त्या वयात अशा प्रोत्साहनाची फारच गरज असते. हे प्रोत्साहन तोंडदेखले शाब्दिक नसते. वास्तविक ते इंग्रजीचे प्राध्यापक, पण मी एक मराठीत लेख लिहिला तो प्रथम विठ्ठलरावांना दाखविला. त्यांनी तो काळजीपूर्वक वाचला. इतकेच नव्हे तर कोठल्या मासिकाला पाठवावा याचेही

मार्गदर्शन केले. या वयात काही कळत नसते. आपले साहित्य प्रथम श्रेणीच्या मासिकात छापून यावे ही महत्त्वाकांक्षा मात्र असते. वेळीच डोळस मार्गदर्शन मिळाले तर आपला वकूब ओळखता येतो.

१९६४ साली इंग्रजी वाङ्मय मंडळाचे उद्घाटन करण्याकरता मी त्यांना आमच्या कॉलेजमध्ये बोलावले. परिचयाचे भाषण मी केले. त्यांचे व्याख्यान चांगलेच रंगले व फुकटचे श्रेय मला मिळाले. २–३ महिन्यांनी आमची भेट झाली. तेव्हा त्यांचे पहिले उद्गार होते, "तुम्ही खूप चांगलं बोललात–जरा कमी बोलला असता तर बरं झालं असतं." परिचयाचं भाषण ते काय पण मुद्दाम त्यांनी कौतुक केलं आणि जास्त वेळ बोललो हेही सांगितले.

१९७३ मध्ये विठ्ठलराव आणि आनंद साधले माझ्या घरी चांगले २॥–३ तास बसले होते. अतीव आनंदाचे तास. माझी भूमिका श्रोत्याची. मी त्यांना मी संपादित केलेले कॉलेजचे मासिक दिले. दोन दिवसांत मला पत्र आले. माझ्या संपादकीयाची इतकी स्तुती होती की मी संकोचून गेलो. त्यांनी लिहिले– "तुमच्या संपादकीयातील शैली व साहित्यिक गुणांसाठी मला आवडलेला भाग उद्धृत करायचा म्हटला तर मला तुम्ही लिहिलेला ३।४ भाग परत लिहावा लागेल." त्या मासिकात 'सोबत' मध्ये मी केलेल्या एका पुस्तकाचे परीक्षण उद्धृत केले होते. त्याला अनुलक्षून त्यांनी लिहिले, "तुम्ही वारंवार लिहायला पाहिजे !"

विठ्ठलरावांना व्यवस्थितपणा, शिस्त प्रिय आहे. त्यांचा ग्रंथसंग्रह पाहिला की त्यांचा व्यवस्थितपणा नजरेत भरतो. कुठलेही पुस्तक ते पटकन काढून देतात. मी त्यांना दिवाळीच्या शुभेच्छा पाठविल्या. एकाच डाकेने मला त्यांची दोन पत्रे आली. एका पत्रात शुभेच्छा मिळाल्या असा मजकूर. तर दुसऱ्यात "मी अमूक दिवशी, अमूक वाजता तुमच्याकडे येईन. काम सोडून घरी बसू नका." हा मजकूर. एक पत्रात दोन मजकूर लिहिले नाहीत.

स्ट्रॅट फोर्ड–अपॉन–ॲव्हनला, 'रॉयल शेक्सपिअर थिएटर'मध्ये गेलो. प्रयोग होता, 'ॲज यू लाइक इट' या नाटकाचा. बरोबर अमेरिकेतील, कॅनडातील प्रवासी होते. मी माहिती पुरवली, शेक्सपिअरने स्वतःच्या दोन नाटकांत भूमिका केल्यात. 'हॅम्लेट' व 'ॲज यू लाइक इट.' माझ्या विद्वत्तेवर सहप्रवासी खूष. पण ही माहिती माझ्या वाचनात नाही. १९४८ साली विठ्ठलरावांनी हे सांगितले होते. भारतात आल्यावर विठ्ठलरावांच्याकडून माहितीची सत्यता पडताळून पाहिली.

दुर्दैवाने विठ्ठलरावांच्यावर इतकी कौटुंबिक जबाबदारी पडली की ग्रंथलेखनासाठी लागणारे स्वास्थ्य त्यांना मिळालं नाही. 'व्यक्तिचित्रे' सारखं न कोमेजणारं पुस्तक ज्यांनी लिहिले त्यांच्या हातून आणखी काहीच लेखन होऊ नये ? त्यांचा बराच वेळ अध्यापनात गेला. विद्यार्थ्यांना, सहाध्यायांना मदत करणे. कुणाचे

काही चांगले वाचले की विठ्ठलरावांचे पत्र गेलेच.

सामाजिक जबाबदारीची जाणीव तीव्र, त्यामुळे वेळोवेळी वर्तमानपत्रात पत्र लिहीत असतात. 'ही कसली दुधखुळी दूध योजना ?', 'सर्पांना ऐकायला येते काय ?' ह्या विषयापासून ते स्वत:ची फसवणूक झालेली सांगण्यापर्यंत. मी अमूक अमूक साहित्यिकाचा मुलगा आहे असे सांगून एका भामटयाने त्यांना फसवले. विठ्ठलरावांनी लगेच जनमनाच्या कानोशात त्या भामटयाबद्दल पत्र लिहिले. त्या भामटयाने हाच प्रयोग कल्याणला केला तेव्हा तो लगेच सापडला. कारण त्या गृहस्थाने विठ्ठलरावांचे पत्र वाचले होते.

ग्रंथलेखनासाठी निवांतपणा त्यांना सत्तरी उलटल्यानंतर मिळाला. 'बर्नार्ड शॉ' वर पुस्तक लिहून तयार आहे. अच्युत बळवंत कोल्हटकरांचं चरित्र प्रकाशित झालं आहे. आता ८० च्या घरातसुद्धा पत्नीच्या अपघाती मृत्यूनंतरही मनाची उमेद कायम आहे. विनोदबुद्धी तरतरीत आहे. एकसुरीपणा अजून त्यांच्या बोलण्यात येत नाही. त्यांच्याशी संभाषण, ही अजूनही मेजवानीच वाटते. ही मेजवानी अजून २०–२५ वर्षे मिळत राहो हीच प्रार्थना

* *

अनुक्रमणिका

# निर्भेळ विनोद व स्त्रिया

## सौ. मोहिनी निमकर

काही काही व्यक्ती आपल्या आयुष्यात अशा येतात की, जेंव्हा जेंव्हा त्यांची आठवण येते तेव्हा प्रथम क्षणी आदराव्यतिरिक्त दुसरी भावनाच मनात उद्भवत नाही. प्रा. वि. ह. कुळकर्णी हे अशाच व्यक्तींपैकी एक आहेत. मला वाटते, अंगिकारलेल्या तत्त्वापासून, स्वीकारलेल्या व्रतापासून आणि निर्भीड मतांपासून जराही दूर न जाता जी माणसे नेकीने आयुष्य चालत असतात, त्यांच्याविषयी नेहमी हीच भावना प्रथम मनात येते. अशा व्यक्तींच्या व्यक्तिमत्त्वाचा कधीही पुसला न जाणारा ठसा आपल्या जीवनावर उमटून जातो; आपल्याला नकळत विचार करायला लावतो.

तसे पाहिले तर मी काही वि. हं.ची विद्यार्थिनी नाही. मी पुण्याची माहेरवाशीण ! विवाहापर्यंतचा काळ पुण्यात गेलेला ! त्यामुळे विद्यार्थिनीच्या नात्याने त्यांच्यासमोर बसून इंग्रजी-मराठीचे धडे घेण्याचं भाग्य मला कधीच लाभले नाही. आमची ओळख झाली ती १९६०–६१ च्या सुमारास. वक्तृत्वाच्या मुंबईतल्या एका स्पर्धेत मी भाग घेतला होता. तत्पूर्वी व्यासपीठावरून बोलण्याचा सराव नसल्याने निवडलेल्या विषयाच्या अनुषंगाने नेमके कोणते मुद्दे कसे काढावेत या विचाराने मी गोंधळले होते. अशा वेळी कुणीतरी "वि. ह. मदत करतील" असे सुचवल्यामुळे मी प्रथम त्यांच्या घरी गेले आणि मग एकदा गेले ती नेहमीच जात राहिले. स्वतः वि. ह. आणि त्यांच्या पत्नी ह्यांच्या आणि माझ्या वयात अंतर असूनही मला ते कधीच जाणवले नाही. उलट जणूकाही मी माझ्या माहेरीच जात आहे, इतक्या मोकळ्या मनानं तिथे जात असे. हळूहळू वि. हं. ची मदत घेण्याचा आपल्याला हक्कच आहे असे मी गृहीत धरून चालू लागले. माझ्या पहिल्या कथासंग्रहाला त्यांनीच प्रस्तावना लिहून दिली आणि नाते दृढ झाले.

नंतरच्या कालावधीत मुंबईत होणाऱ्या परिसंवादांमधून मी वि. हं. च्या बरोबरीने व्यासपीठावरून वावरू लागले. त्यांची भूमिका कधी संचालकाची असे तर कधी विरुद्ध बाजूने बोलणाऱ्या वक्त्याची असे. बाकी भूमिका कोणतीही असली तरी त्यांची कुशल आणि मिस्किल भाषा, संथ परंतु अत्यंत आत्मविश्वासाने

केलेला विषयाचा ऊहापोह आणि बिनतोड युक्तिवाद हा नेहमीच ऐकत राहावा इतका सुंदर असे. शिवाय परिसंवादातील अगदी शेवटचं भाषण जर का त्यांचे असेल तर मग आमच्या मुद्द्यांचा पार धुव्वा उडून जाऊन अनेकदा आमची सपशेल जिरत असे. परंतु अशी जिरली तरीदेखील घरी येताना आमचे मन खिन्न कधीच नसे. उलट अतिशय प्रसन्न असे. कारण युक्तिवाद करतानाच त्यांची भाषा व्यक्तिगत प्रहार करणारी किंवा मुद्दाम वाकड्या वाटेने जाणारी टोकदार कधीच नसे. त्या भाषेला ममतेचा स्पर्श नेहमीच झालेला असे आणि तो फार सुखावह असे.

आज जी एक आठवण तुम्हाला सांगायला मी सिद्ध झाले आहे, ती एक माझ्या फजितीचाच किस्सा आहे. माझी सपशेल जिरल्याचे जे काही प्रसंग माझ्या गाठी जमा झाले आहेत, त्यांपैकीच हा एक आहे. तरीही मी तो तुम्हाला सांगणार आहे. कारण त्या प्रसंगाने मला स्त्री-जीवनाबाबत वेगळया दृष्टिकोणातून विचार करायला लावले आहे माझ्या विचारांना नवीन दिशा, नवीन वळण दिले आहे.

त्या प्रसंगाला १० वर्षे उलटून गेली. दादरला हिंदू कॉलनीतील भगिनी समाजाने गणपती उत्सवाच्या निमित्ताने एक परिसंवाद आयोजित केला होता. विषय होता– 'स्त्रियांना विनोदबुद्धी असते का नसते ?' विषय वि. हं. नीच सुचवला होता आणि चार पुरुष एका बाजूला आणि चार स्त्रिया एका बाजूला अशी कार्यक्रमाची आखणी होती.

विषय कळल्यापासून माझ्या अंगात वीरश्री संचारली होती. प्रतिपक्षाला हाणून पाडण्यासाठी मी नवीन नवीन मनसुबे रोजच्या रोज रचत होते. माझी पंचाईत फक्त एवढीच झाली होती की हेच भाषण जर का दुसरीकडे कुठे असते, तर मी काढलेल्या मुद्द्यांवर चर्चा करायला एखाद वेळेस मी वि. हं. कडे गेले असते. परंतु या वेळी ते विरोधी पक्षाचे सदस्य असल्याने प्रतिपक्षाला आपले मुद्दे आधीच सांगणे योग्य झाले नसते त्यामुळे चूळबूळ करीत घरी गप्प बसण्याखेरीज गत्यंतर नव्हते.

विषय इतका खुसखुशीत होता की प्रत्यक्ष परिसंवादाच्या दिवशी श्रोत्यांची उपस्थिती शेकडोंच्या संख्येनं होती. प्रा. सौ. सरोजिनी वैद्य, सौ. मृणालिनी देसाई यांसारख्या मातब्बर व्यक्ती आमच्या बाजूला होत्या. माझ्या उत्साहाला तर नुसते उधाण आले होते... प्रथम एका पुरुष वक्त्याचे भाषण झाले आणि त्याने स्त्रियांच्या विनोदबुद्धीवरच नव्हे तर एकंदर बुद्धीवर यथेच्छ ताशेरे झाडून घेतले. मला मात्र जास्तच चेव आला. माझे सबंध भाषण या ठिकाणी उद्धृत करणे कठीण आहे. परंतु माझ्या प्रत्युत्तराचा आशय पुढीलप्रमाणे होता. मी म्हणाले–

"लोक हो, स्त्रियांना बुद्धीही असते आणि विनोदबुद्धी तर जरूर असते. परंतु आजकाल असं झालं आहे की सुरुवातीचा सोज्ज्वळ विनोद थोडासा चावट

केल्याशिवाय पुरुषांना चैनच पडत नाही आणि त्यामुळे मख्खासारखा चेहरा करून बसण्याखेरीज आम्हाला गत्यंतर नसतं. खरं विचाराल तर अशा चावट विनोदावर आणखी वरताण चावट बोलायला आम्हाला सुचलेलं असतं. परंतु एकतर सद-भिरुचीच्या मर्यादा पुरुष जितक्या झटकन ओलांडतात तितक्या झटकन आम्ही बायका ओलांडू शकत नाही, हे एक. आणि दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी आहे की एखाद्या बाईला असले विनोद कळतात, आवडतात, करता येतात, अशी एकदा पुरुषांची समजूत झाली की, मग वाङ्मयात विनोदाशी साऱ्या गोष्टी न थांबता, मऊ लागलं म्हणून खणत पुढे जावं या न्यायानं हळूहळू वाङ्मयात वर्तनालाही सुरुवात होते. आणि त्यामुळे मोठ्या दूरदर्शीपणानं आम्ही बायका वेड पांघरून पेडगावला जातो. आपण जणूकाही त्या गावच्याच नाही असं भासवत बावळट चेहरा करून बसून राहतो आणि नेमका इथेच पुरुषांचा आमच्या बुद्धीविषयी गैरसमज होतो." माझ्या एकंदर वक्तव्यावर श्रोतेमंडळी खूष झालेली पाहिल्यावर मी जरा जास्तच खुषीनं माझ्या दुसऱ्या मुद्द्याकडे वळले.

"आपल्याकडील समाजव्यवस्थाच मुळी अशी आहे की लग्न होईपर्यंत लहानपणापासून आम्ही वडिलांच्या धाकात, जन्मभर नवऱ्याच्या धाकात आणि म्हातारपणी आम्हीच ९ महिने पोटात वाढविलेल्या मुलांच्या धाकात, अशी आमची वाटचाल सुरू असते. घोड्याच्या डोळ्याला झापड बांधून जसं त्याला आपण चालायला लावतो, तसं आमचं आयुष्य असतं. त्या मनाला जराही सैरभैर वाहायला आपल्या समाजानं वाव ठेवलेला नाही. त्यामुळे कुचंबलेल्या मनाच्या अवस्थेत विनोद निर्माण होत नाही. त्यात पुन्हा आजकालच्या नोकरी करणाऱ्या स्त्रीला नोकरी आणि संसार सांभाळताना एका क्षणाची विश्रांती मिळत नाही. सूर्य उगवला केव्हा नि मावळला केव्हा हे जसं तिला समजत नाही, तसं आपण तरुण कधी होतो आणि म्हातारे कधी झालो हेही कळत नाही. त्यातून पुन्हा ह्या साऱ्याच्या जोडीला 'पतिराजांची तैनात' हा एक अत्यंत जटील आणि गहन प्रश्न तिला २४ तास पडलेला असतो. (श्रोत्यांत थोडी खसखस) काही पुरुष अत्यंत तापट असतात तर काही एकदम मवाळ, काही मुलखाचे गबाळे तर काही नको येवढे व्यवस्थित. काहींचं आपल्या बायकोकडे लक्षच नसत तर काहींचं नको तेवढे लक्ष ! (जोरदार खसखस) थोडक्यात म्हणजे नॉर्मल पुरुष तसे संख्येनं कमीच असतात. त्यामुळे त्यांना सांभाळता सांभाळतानाच बायकांच्या इतके नाकी नऊ येतात की ती बिचारी विनोद करणार तरी कधी ? घरातला तारेवरचा नाच तरी संपायला हवा ना ?"

तिसऱ्या आणि महत्त्वाच्या मुद्द्याला हात घालताना मी म्हटलं.

"तेव्हा सारांश हा की स्त्रियांना विनोदबुद्धी नसते किंवा केलेले विनोद

कळत नाहीत किंवा करता येत नाहीत असं काऽऽ ही नाही फक्त विनोद निर्माण व्हायला मनाला जो एक मुक्तपणा असावा लागतो तो तिच्या वाट्याला येत नाही. तेव्हा पुरुष हो, तुम्हाला तिची विनोदबुद्धी, तिची समयसूचकता, तिचा हजर-जबाबीपणा पाहायचा असेल तर आमची एक मंगळागौरीची रात्र पाहायला या. त्या दिवशी ती खरी तिची ती असते. सबंध दिवसाची तिची कर्तव्यं संपलेली असतात, मुलांची निजनीज झालेली असते. भांडीवाली बाई आणखी १२ तास तरी डोकं खाणार नसते आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे नवऱ्याच्या तावडीतून ती सुटलेली असते. त्यामुळे ती खऱ्या खऱ्या मुक्तमनानं रात्रभर वावरते. उखाण्यांच्या शाब्दिक चकमकी सुरू झाल्या की तिच्या जिभेवर सरस्वतीचं नृत्य सुरू होतं, हास्याचे कल्लोळ उठतात आणि त्या तशा मनाच्या अवस्थेत तिच्या स्वभावाचे, बुद्धीचे अनेक पैलू, बारकावे पाहायला मिळतात."

येथपर्यंत भाषण आले आणि येवढा वेळ मुठीत घडी करून धरलेला कागद मी उलगडला. स्त्रीच्या तरल बुद्धीचा प्रत्यय येईल अशी अनेक उदाहरणे, अनेक किस्से, उखाण्यांच्या गमती मी लिहून आणल्या होत्या. त्या सांगायला सुरुवात केली. प्रथम जुन्याकाळी लग्नाच्या वेळी विहिणी विहिणी फुगड्या खेळत त्यावेळी ज्या चकमकी उडत त्यांची उदाहरणे सांगितली. टोल्याला प्रतिटोला मारताना किती कसब दाखवावे लागते ते दाखवून दिले.

१) शिंद्यांनी दाखवला बडेजाव मोठ्ठा । आणि
सीतेच्या गळ्यातला चंद्रहार खोटा ।।

२) नवऱ्याकडच्या करवल्या घालती ठुशी । आणि
नवरीकडच्या वरमाया अंबोणाच्या म्हशी ।।

३) दारी होती केळ तिला मारला धपाटा ।
मोकाश्यानं बायको केली लवंगी फटाका ।।

४) पैशाची वांगी साडेतीन मण ।
आपट्याची सोनू बूटबैंगण ।।

५) केळे बाई केळे वसईचे केळे ।
यमी मोठ्ठी झाली तरी लगीन नाही झाले ।।

६) रविवार गेला सोमवार गेला, आला मंगळवार!
सोहोनींची उषा मोठ्ठी नाजुकनार ।।

७) समोरच्या कोनाड्यात ठेवली चिंच ।
माधवभाऊजींपेक्षा आमची वच्छीच उंच ।।

८) लोणच्याची मोहरी कशी झणझणते, झणझणते ।
नंदा आपल्या नवऱ्यावर फणफणते, फणफणते ।।

आणखीही बरीचशी उदाहरणे दिली. आज ती सगळी आठवत नाहीत आणि भाषण पूर्ण करताना एक टोला हाणला की, " स्वत:च्या बायकोच्या बुद्धीविषयी कधीही पुरुषांना ॲप्रिसिएशन नसतं. शेजारणीच्या मुळचट विनोदालाही तेच पुरुष खो खो करून हसतात आणि ती शेजारीण दिसायला सुंदर असली तर मग बघायलाच नको."

भाषण संपले. टाळ्यांचा कडकडाट झाला. मला अस्मान ठेंगणे भासत होते. श्रोत्यांमधील स्त्रीवर्ग तर बेहद्द खूष होता. क्रमाक्रमाने सर्व वक्त्यांची भाषणे झाली आणि वि. ह. बोलायला उठले. आम्हा चौघींकडे, विशेषत: माझ्याकडे बघून संथपणे, शांतपणे म्हणाले, " स्त्रीवक्त्यांची, विशेषत: मोहिनी निमकरांचं भाषण ऐकून स्त्रियांना विनोदबुद्धी कशी नसते, हे स्पष्ट झालं आहे. "

माझ्या पायांखालची जमीन सरकली.

" त्यांचं भाषण खुसखुशीत होतं. श्रोत्यांना त्यांनी हसवलं म्हणजे त्यांना विनोदबुद्धी आहे. परंतु 'विनोदबुद्धी असणं' याचा अर्थ नुसते विनोद करणं किंवा समजणं असा नसून त्यात खिलाडूवृत्ती असणं हाही एक अर्थ दडलेला आहे. इंग्रजीत ज्याला Sporting Spirit म्हणतात ते Spirit स्त्रियांमध्ये नसतं असा आजच्या विषयातला गर्भितार्थ होता. बायकांना स्वत:वर झालेले हल्ले खेळकरपणे स्वीकारता येत नाहीत आणि दुसऱ्यावर केलेले त्यांचे हल्लेही सरळ नसून तिरके असतात, असा त्यातला अर्थ होता आणि मोहिनी निमकरांनी जी उदाहरणं दिली त्यावरून ही गोष्ट त्यांनीच सिद्ध केली आहे. मंगळागौरीच्या रात्री खेळ खेळताना स्त्रिया कशी शाब्दिक कुरघोडी करतात हे त्यांनी आत्ताच सांगितले. त्यात सभ्य-सूचकतेचा भाग राखून केलेल्या हुशारीचा भाग जरूर होता. परंतु ती चकमक अत्यंत बोचरी होती हे तुमच्या लक्षात आलंच असेल. समोरचीच्या जिव्हारी झोंबल्याखेरीज स्त्रियांना आनंद मिळत नाही आणि समोरची दुखावल्याखेरीज त्या सुखावत नाहीत, हेच स्पष्ट झालं आहे. येवढंच नाही तर ती समोरची देखील उलट काहीतरी बोचरा प्रतिहल्ला केल्याखेरीज गप्प बसत नाही आणि याचाच अर्थ स्त्रियांना निर्भेळ विनोद करता येत नाही, त्यांच्यात Sporting Spirit नसते, खिलाडूपणा नसतो, विनोदबुद्धी नसते. "

वि. ह. भाषण संपवून खाली बसले आणि सर्वांत प्रथम जर कुणी टाळ्या वाजवल्या असतील तर मी ! कारण त्यांच्या भाषणातला शब्द न शब्द खरा होता. त्यांच्या भाषणावर झटकन आनंद व्यक्त करून मी माझ्या मनाचा मोठेपणा त्या-वेळी दाखवला याचा आज मला आनंद वाटतो. वाईट फक्त एकाच गोष्टीचं वाटतं की निर्भेळ विनोद करण्याची आम्हा सुशिक्षित आणि सुसंस्कृत बायकांमध्ये कुवत असतानाही मी नेमकी स्त्रियांच्या मनोवृत्तीचा वाईट कंगोरा दर्शविणारी उदाहर-

णेच निवडली होती.

त्या दिवशी घरी परतताना मी माझी उदाहरणे आठवून पाहत होते. १) ॥ माधवभाउजींपेक्षा वच्छीच उंच ॥ २) ॥ यमी मोठी झाली तरी लगीन नाही झालं ॥ ३) ॥ सोहोनींची उषा मोठी नाजूकनार ॥ ४) ॥ नंदा आपल्या नवऱ्यावर फणफणते ॥ ५) ॥ मोकाशाने बायको केली लवंगी फटका ॥ ६) ॥ आपटयांची सोनू बूटबैंगण ॥

छे ! एकही निर्भेळ विनोदाचे उदाहरण हाती गवसेना. प्रतिपक्षावर हल्ला चढवायला ' मंगळागौर ' हा हुकमी एक्का आहे असे मी समजत होते. परंतु ते पान योग्य तऱ्हेने न टाकल्याने डाव माझ्यावरच उलटला होता. माझी सपशेल जिरली होती.

अर्थात त्या प्रसंगाने माझ्या विचाराला वेगळी दिशा मिळाली. मी स्वत: अंतर्मुख झाले. त्यानंतर अनेक दिवस मी चिंतन केले. स्त्री जीवनाकडे, आजूबाजला वावरणाऱ्या बायकांकडे अनेक दृष्टिकोनातून पाहिले. बारकाईने अभ्यास करून अनेक भगिनी मंडळातून हा विषय मी आवर्जून मांडला. माझ्याप्रमाणे प्रत्येक स्त्री याबाबत जागरूक व्हायला हवी, असे मला सतत वाटत राहिले. थोडया अंशी तरी माझा प्रयत्न सफल झालाच.

आज इतक्या वर्षांनंतरही हा प्रसंग काल घडल्याइतका मला स्पष्ट दिसत आहे आणि त्याप्रसंगी वि. हं. ची शिकवण तर जन्मभर मला साथ करणार आहे.

* *



अनुक्रमणिका

# ' शारदा बासुंदी '

## वसंत देशमुख

खारकेसारखी खुटखुटीत देहयष्टी, खारीसारखी भिरभिरती, चौकस नजर, मुद्रेवरच्या सात्त्विक छटेवर मिस्कीलपणाचा छुपा आविष्कार, पांढरेस्वच्छ तलम धोतर, शर्ट, अशा थाटात हे प्राध्यापक आपल्या वडील बंधूकडे, नाना कुळकर्ण्यांकडे, जरा डुलत डुलत येताना मी न्याहाळीत असे. प्रभाकर पाध्ये, माडखोलकर, आचार्य जावडेकर, आचार्य भागवत वगैरे साहित्यश्रेष्ठींचा त्या काळात नानांकडे राबता असे.

सत्याग्रही समाजवाद, साहित्य-निकष, कळ्यांचे निःश्वास, धुक्यातून लाल ताऱ्याकडे, आंधळ्यांची शाळा, नाट्य मन्वंतर, बालगंधर्व, भावड्या... असे अनेक शब्द माझ्या अनभिज्ञ कानांवरून जात. पण माझाही सूर शब्दांशी मिळता जुळता असल्यामुळे अण्णांचा नि माझा परिचय बेताबेताने वाढत गेला. परिचय वाढत गेला तसे मला जाणवले की सकृतदर्शनी मितभाषी वाटणारे, किंबहुना तुसडे भासणारे प्राध्यापक हळुवार, सर्जनशील आणि अत्यंत भावनाप्रधान असे आहेत. तीन कुळकर्णी बंधू, कसल्यातरी विषयावर सतत चर्चा करत असत हे दृश्य पाहून मला खूपच आश्चर्य वाटायचे ! असो !

दरम्यान माझा आयुष्यात एक विलक्षण घटना घडली. दहा जानेवारी १९४४ हा दिवस मला चांगला आठवतोय ! ' दस आय लिव्ह ' नावाचा एक ग्रंथ मी एकटाकी-एका महिन्यात झपाट्याने लिहून पुरा केला. प्रा. कुळकर्णी ह्यांना एक प्रकरण दाखविले- " MY FRIENDS " ह्यातल्या ह्या वाक्यावर प्राध्यापक महाशय वेहद्द खूष...Thus does life ebb and flow to the rhythm of our whispered secluded talks...and although cafes and servants miss us all, still our perennial talks conjure up a vision of a sweet tempered happy lot in somebody's humble apartnents, wearing out the starry night with tales of our follies and those of others, and imbibing just a cup of tea. as if it were champagne in cute and shy glasses."

'दस आय लिव्ह' ह्या पॉप्युलर प्रकाशनातर्फे काढलेल्या माझ्या पहिल्या इंग्रजी पुस्तकाचे प्रकाशन मा. माधवराव आळतेकर यांच्या अध्यक्षतेखाली झाले आचार्य अत्र्यांच्या नवयुग छापखान्यात ते छापले. शिवसेना प्रमुख बाळासाहेब ठाकरे यांनी मुखपृष्ठ आणि सहा व्यंगचित्रे काढली. त्या समारंभाला अण्णा होतेच. त्यांनी भरघोस आशीर्वाद दिला.

मातृभाषेत माझे लेखन प्रकाशित होऊ लागल्यापासून त्यांचे माझ्यावर बारीक लक्ष होते. एखादा माझा लेख त्यातल्या त्यात मनासारखा उतरला तर तो अण्णांना वाचून दाखविण्याची ओढ लागायची. पण अण्णा रुईया कॉलेजात अन् मी सेक्रेटरीएटमध्ये ! म्हणून भेटीगाठी अधूनमधूनच व्हायच्या. स्वप्नील दिवस होते ते. माफक उत्पन्नात मानसिक समाधान देणारे दीस !

सुप्रसिद्ध वनिता समाजात एकदा एक परिसंवाद आयोजिला होता. अण्णा अध्यक्ष होते. तीन अति-शिक्षित महिला आणि मी एकमेव बंडू होतो. अर्थात अध्यक्ष वगळून ! त्या महिलांनी असंबद्ध भाषणांची जणू चढाओढ लावली होती. हैराण झालेले अण्णा मी पाहत होतो. प्रत्येक वक्त्याला ठराविक वेळ दिला होता. पण त्या विदुषी पार बंधनाच्या पलीकडे पोहोचलेल्या ! अध्यक्षीय भाषणात अण्णा म्हणाले, "आनंद झाला. सर्वांचीच भाषणं उत्तम झाली. आपला हा हॉल सुसज्ज ! पण त्यात एक छोटीशी— पण महत्त्वाची उणीव आहे. ह्या एवढ्या प्रशस्त हॉलमध्ये भिंतीवर घड्याळ नाही. म्हणूनच मला वाटते ह्या व्यासपीठावरच्या सर्व भगिनींनी काळवेळ लक्षात घेतली नसावी !" ह्या नर्मविनोदी टोल्यामुळे (आणि तो उमजल्यामुळे ) हॉलमध्ये हास्याची लकेर उमटली. अनेक रंगीत अन् सुगंधी हातरुमाल ओष्ठद्वयांपाशी झटकन गेले !

माझ्यासारख्या स्वप्नील साहित्यिकाला एक हुरहूर सतत छेडीत असते. झपाट्यानं बदलणाऱ्या ह्या काळात माणसं अन् समाज फारच झपाट्याने बदलत आहेत. दिवसेंदिवस अशा व्यासंगी, विनम्र आणि ध्येयवादी व्यक्तींची पिढी लोपत आहे. मग ?... मग पाच-दहा वर्षांनी ती आमची 'या कुन्देन्दुतुषारहार धवला या शुभ्रवस्त्रांवृता' अशी शारदादेवी बॉबकट करून मिनीस्कर्ट घालून बॅंजो वाजवीत स्कूटरवरून धडाडत येणार काय !

आणि ह्या पार्श्वभूमीवर आठवतात पुन्हा अण्णा. अण्णा ज्या पिढीत वाढले ती पिढी पीळदार, (मनाने आणि देहाने ), दमदार, व्यासंगी, ज्ञानपिपासु आणि स्वाध्यायप्रिय अशी होती. टिळक, गोखले, आगरकर, सार्वजनिक काका, लोकहितवादी देशमुख, अशा अमोल नररत्नांच्या प्रगल्भ प्रतिभेने, विचारांच्या आणि आचाराच्या उत्तुंगतेने, निरलस देशसेवा आणि समाजसेवेचे सतीचे वाण घऊन पावन झालेली ही आधीची पिढी महाराष्ट्राला एक वैभवशाली असा सांस्कृतिक व

राजकीय वारसा आंदण देऊन काळाच्या पडद्याआड लुप्त झाली होती. खुंटीला शेंडी बांधून वा म्युनिसिपालटीच्या दिव्याखाली अभ्यास करून कष्टाने विद्या करण्याचे ते दिवस होते. कष्टमय जीवन काढीत असताना अण्णांनी शारदादेवीचे चरण सोडले नाहीत. गिरगावातल्या कुंद आणि घामट चाळीतल्या कोंदट वातावरणात बी. ए. ची पदवी मिळाली आणि त्याच नेटाने एम. ए. चे शिखर गाठले. ज्या काळात चकचकीत बंदा राणीछाप चांदीचा रुपया हा वाघाच्या डोळ्यासारखा भासायचा, त्या काळात त्यांनी वाघिणीचे दूध पिऊन पचविले. इतकेच नव्हे तर त्या वाघिणीच्या दुधाची घट्ट अशी ‘ शारदा बासुंदी ’ आटवून तीन तपांच्यावर तो पवित्र प्रसाद लाखो विद्यार्थी आणि विद्यार्थिनींना प्रदान केला.

त्या काळात त्यांना मोठ्या पगाराची, सरकारी हुद्द्याची, मानाची नोकरी सहज मिळाली असती. पण त्या शृंखलेचा मोह त्यांना कधी पडलाच नाही. वर्गातला काळा फळा आणि पांढरा खडू हीच त्यांच्या प्रदीर्घ साधनेची सामग्री ! देवी सरस्वतीच्या नखावरला मेंदीचा रंग त्यांनी फळ्यावर पांढऱ्या खडूने वर्षानुवर्षे चितारला. पुढे एकाएकी अवचितपणे होऊ नये ते घडले. प्रफुल्ल मुद्रेच्या, प्रेमळ आणि अगदी घरेलू अशा काकू, त्यांच्या पत्नी, अपघातानेच भाजून निघाल्या आणि त्यामुळेच त्यांचा अंत झाला. अण्णांना मी भेटायला गेलो. विकलांग, शोकमग्न आणि मूक अश्रू ढाळणाऱ्या अण्णांची कारुण्यमय मूर्ती आजही डोळ्यांसमोर तरळते. साहित्यसेवा आणि प्राध्यापकी सांभाळून अण्णांनी संसार मात्र अगदी नेटका केला आणि काकूंची अनुपस्थिती त्यांच्या मुलांना जाणवू दिली नाही हे विशेष !

पण बिकट अशा ह्या विधुरावस्थेत त्यांनी काकूंना वचन दिल्याप्रमाणे जगप्रसिद्ध साहित्यिकाचे, जॉर्ज बर्नार्ड शॉचे, चरित्र लिहिण्याचा संकल्प सोडला. अनंत अडचणींवर मात करून तो सिद्धीस नेला. एकूण मराठी साहित्यात ह्या प्रचंड व्यक्तीवर हाच तो सर्वमान्य अन् उत्कृष्ट असा ग्रंथ ! ह्या ग्रंथनिर्मितीमुळे त्यांच्या जीवनाच्या साहित्य मंदिरावर त्यांनी सोनियाचा कळस चढविला, असे मी मानतो. त्यांनी आपणा सर्वांना एक बहुमोल धडा घालून दिला नाहे. निदान मला तरी... अन् तो म्हणजे...

“ Let us then be up and doing with a heart for every fate; still achieving still pursuing, and learn to labour and to wait.”

Longfellow

त्यांच्या हातून अजूनही भरघोस साहित्य-निर्मिती होवो हीच प्रार्थना !



# उदंड भक्तिभावाची पळीभर धार

## सौ. उषा दातार

सौ. आशा धारप यांचे पत्र आले नि एक उंचच्या उंच लाट समोर धावत आल्यासारखे वाटले. आयुष्यातला स्वाती नक्षत्राचा काळ अलगद पुढ्यात उभा राहिला. रुईया कॉलेजमधला फर्स्ट इअरचा आर्टस्‌चा वर्ग. कॉलेजचा पहिला दिवस.

एक धूसर, अतितरल सीमारेषा. मात्र स्मृतिकोशातून पुसली न जाण्याएवढी पक्की. शाळा आणि कॉलेजमधला दुवा सांधणारी तर खरीच. शिवाय त्याहूनही वेगळी नि आगळी. जीवनातल्या अनोख्या प्रांगणात प्रवेश केल्याची जाणीव. क्लास-मधला शे-दीडशेचा मिश्र जमाव. सारेच चेहरे काहीसे संभ्रमित. वृत्ती किंचित गांगरलेली. नजरांतून ओसंडणारे कुतुहल. तेवढ्यात पहिली बेल झाली नि वर्गात औत्सुक्याची सूक्ष्म लहर झरंदिशी भिरभिरली. किंचित दबलेले वातावरण नि नजरांचा रोख नकळत दरवाज्याच्या दिशेला.

सरांची भारदस्त मूर्ती दारातून आत शिरून प्लॅटफॉर्मपाशी पोचलीदेखील आणि समोरच्या उठून उभ्या राहिलेल्या विद्यार्थ्यांना हाताने बसण्याचा इशारा देता देताच त्यांनी वर्गाचा कब्जा घेतला. आता लक्षात येतंय. वर्गावर काबू ठेवणे ही महाकठीण गोष्ट. भल्याभल्यांना शरण आणणारी, पण सरांना ती किमया जन्मा-जात साध्य होती. ना कधी चेहऱ्यावर ताण, ना अवास्तव आवाज चढवणे, ना टेबलावर मुठीची ठोकाठोक, तरीही नाठाळ विद्यार्थीदेखील चूपचाप. दर्शनीय लक्ष्य ठेवून अचूक शरसंधान करणारे धनुर्धारीदेखील त्यांच्या तासाला आपली आयुधं भात्यात ठेवून व्याख्यानात रस घेत.

माझा कॉलेज-जीवनातला पहिला तास... इंग्लीशचा पहिला पीरियड नि कुळकर्णी सरांचे पहिले लेक्चर. हा एक त्रिगुण योग. त्या दिवशीचा त्यांच्या व्याख्यानाचा आवाका फारच व्यापक होता. पुढल्या शैक्षणिक काळासाठी, किंबहुना सबंध आयुष्यासाठीच त्यांनी परिपूर्ण शिदोरी बहाल केली होती.

अभ्यासाच्या दृष्टीने काही मार्गदर्शन. कटाक्षाने पाळायच्या तशाच टाळा-यच्या बाबी, यशस्वी जीवनासंबंधी आवश्यक अशा शिस्तीसंबंधी थोडेफार... आता त्यांतले शेवटचे वाक्यच ध्यानात उरलंय. " अँन्ड दस् यू विल डो ऑन अ स्ट्रेट

कॉलेज स्टुडंट." मात्र अशा गोष्टी वेळ टळून गेल्यावरच लक्षात याव्यात हे विषाद-पूर्ण सत्य.

कितीतरी काळ लोटलाय. संदुकीतले अनेक मोती घळघळून गेले आहेत. तरीपण काही काही अजून अचानक समोर येऊन चमकतात. आजच्या जगातली फेव्हिकोल चोपडून खुर्चीला चिकटून राहण्याची स्पर्धा नजरेला पडली की वेळे-आधीच खुषीने निवृत्त होणाऱ्या नामदार गोखल्यांचे नितान्त सुंदर भाषण आठवते. फर्स्ट इयरसाठी नेमलेल्या निवडक उताऱ्यांमधला नामदार गोपाळ कृष्ण गोखल्यांचा लेख. 'फेअरवेल स्पीच टु फर्ग्युसन कॉलेज.' ते भाषण मुळात प्रभावी तर आहेच, पण काही गुण सोन्याचे, तसेच काही कारागिराचे. तो लेख मनात एवढा पक्का ठसण्यामध्ये सरांच्या परिणामकारक शैलीचा फार मोठा हिस्सा निश्चितपणे होताच.

तशीच कधी देहाला आणि मनाला मरगळ आली की 'ऑन डूईंग नथिंग'... नि परहस्ते गेलेले एखादे आवडते पुस्तक कायमच पसार झालेले आढळले की 'ऑन बॉरोइंग बुक्स' हे इंटरच्या वर्गात घटवलेले खुसखुशीत निबंध अचूक दिलासा देतात. एफ. वाय्.च्या वर्गातले निवडक वेचे नि इंटरच्या वर्षी 'इंग्लिश ह्यूम-रिस्टस्' अठराव्या शतकातील लॅम्ब, हॅजलिट, कोलरिच गोल्डस्मिथ, यांचे चुर-चुरीत हलकेफुलके निबंध. सरांच्या हाताखाली हे एवढेच शिक्षण घेण्याचा माझा योग होता. मात्र वाङ्मयाचा आस्वाद घेण्याची दृष्टी लाभली, हेही काही थोडे-थोडके नाही. उत्कृष्ट शिक्षकाला लागणाऱ्या अत्यावश्यक गुणांचा समुच्चय म्हणजेच कुळकर्णी सर होय.

स्वतःच्या विषयावर विलक्षण प्रभुत्व, शिकवण्याची जबर हातोटी, विद्वत्तेला नर्म विनोदाची झालर, अस्खलित वक्तृत्व, लयबद्ध श्रवणीय स्वर, समतोल प्रगल्भता आणि स्वभावातील आत्यंतिक ऋजुता. शिक्षणाचा काळ चुटकीसरसा पार पडला. नंतरदेखील अनेक उन्हाळे पावसाळे लोटले. अचानकच 'अनुराधा'च्या दिवाळी अंकातला सरांचा 'प्रेमपत्रे' हा मिस्किल शैलीतला लेख हातात आला. इंग्लीश वाङ्मयातील प्रेमपत्रांचे शेलके दाखले त्यात होते. विषयाच्या ओघात 'स्टेला' आणि 'व्हेनिसा' या दोघी प्रणयिनींच्या पत्रातील स्पेलिंगच्या चुकांबद्दल मजकूर आला आणि स्मृतीचा रहाट धडधडा उलट फिरला. इन्टरच्या वर्गातली त्या धड्यावरची सरांची खेळकर मल्लीनाथी आठवली. स्त्रियांच्या स्पेलिंगच्या अज्ञाना-मुळे बिचाऱ्या प्रियकरांवर ओढवणारी चुका दुरुस्तीचीच आफत ! आठवणीनेच हसू लोटले.

आणि त्या तंद्रीतच मी सरांना एक जंगी पत्र लिहून (भरकटणे शब्द जास्त समर्पक) टाकले. उत्तराची जिज्ञासा अर्थातच होती. परंतु विशेष उत्तर येईल असे वाटले नव्हते.

ही मात्र अपेक्षा नव्हती. वृत्ती उगाचच काहीशी विमनस्क होती. सुखासीनतेमुळे निर्माण झालेली पोकळी नि हातून संसारातल्या चूलबोळक्यापलीकडे काहीच घडत नसल्याची खंत. अन् सरांकडून उत्तर आले ते अत्यंत आस्थेचे आणि जिव्हाळ्याचे आणि शेवटी अधिकारवाणीने विचारलेला एक प्रश्न ! "तुम्ही लिहीत का नाही ?"

या प्रश्नासरशी डोक्यात आवर्त उठले. कथानकाचे आषाढ मेघ नेहमीच गच्च दाटलेले असायचे. पण त्यांना मूर्तरूप द्यावे हे कधी सुचलेच नव्हते. नृत्य-गायनादी गोष्टींप्रमाणेच लेखनाची मिरासदारीदेखील कुणा तिसऱ्यांकडेच, हीच सोयिस्कर समजूत करून घेतलेली. पण आता भणाणत्या डोक्याला नवी दिशा मिळाली. नंतर वेळ ठरवून आम्ही उभयतांनी सरांची भेट घेतली.

प्रसन्न आणि सौजन्यपूर्ण स्वागत. रीतसर परिचय-सोहळा आणि जुजबी क्षेम-कुशल झाले. नि सरांचा प्रश्न आला– "तुम्ही चहा घेता ना ?" संकोचादाखल माझे आढेवेढे. "नको. कशाला. घरून निघतानाच झालाय." त्यावर विनाविलंब सरांचा मिस्किल परंतु मुद्देसूद प्रतिप्रश्न. "तूर्त प्रश्न असा आहे की, तुम्ही चहा घेता की नाही ?" नि हास्याच्या खळखळाटात वातावरणातील दडपण खळ्दिशी गळून पडले. मोकळेपणा आला. नंतर अनेक विषयांवर संभाषण अन् शेवटी पुन्हा एकदा आपुलकीचा सल्ला. "नुसती पत्रं लिहून तीं वाऱ्यावर जातात. समाजा-समोर येईल असं काहीतरी लिहा. येतं वर्ष आंतरराष्ट्रीय महिला वर्ष आहे. (म्हणजे नेमकं काय ते मला अद्यापही समजलेलं नाही.) तरी त्या निमित्तानं प्रयत्न करून पहा."

आणि तेव्हापासून माझे साचलेपण मोडले. माझे असे चिमुकलेसे वर्तुळ मला मिळाले. दीडदोनशे कथा, सात-आठ पुस्तके, वाचकांकडून, संपादक-मंडळींकडून मिळणारी दाद, अर्थात त्यात स्वानंदापलीकडे विशेष अर्थ असल्याचे मला स्वतःलाच वाटत नाही. पण तेवढाच निरुपद्रवी विरंगुळा. त्यातील श्रेयाचा वाटा सरांनी खड-सावून विचारलेल्या प्रश्नाकडे जातो. ते ऋण तसेच शिरावर बाळगण्यात मला आनंद आहे. फार तर कृतज्ञतेदाखल एका कलाकृतीची अर्पणपत्रिका. तेवढीच माझ्या हाती आहे.

लिहायला सुरुवात केली नि सरांच्या मागे निराळीच कटकट सुरू झाली. मी काहीतरी खरडावे आणि हस्तलिखित किंवा मुद्रित प्रत वाचण्यासाठी त्यांच्या माथी मारावी हा शिरस्ता सुरू झाला. मात्र ठीक चौथ्या दिवशी त्यांचे सविस्तर अभिप्राय पत्र ! माझा शब्दन् शब्द वाचल्याची साक्ष !

पुढे माझा पहिला कथासंग्रह 'कुलकर्णी ग्रंथागार' तर्फे प्रकाशित होण्याचे ठरले नि मी नवीच पीडा सरांच्या मागे लावून दिली. मला सापडेल तेथे पुरेपूर

फायदा घेण्याचा मनुष्यस्वभाव ना ! आठ-दहा कथांचे ते बाड मी प्रस्तावना लिहिण्यासाठी म्हणून त्यांच्या हवाली केले. वस्तुतः अति कंटाळवाणे काम ! (हे आज माझ्या ध्यानी यतंय.) पण आठवड्याच्या आत पत्र ! 'प्रस्तावना तयार आहे. घेऊन जावी.' माझा जीव अक्षरशः संकोचून गेला नि प्रत्यक्षात पाहिल्यावर तर मी आश्चर्याने थक्क !

त्यांच्या कसलेल्या लेखणीतली प्रदीर्घ आणि प्रोत्साहनपर प्रस्तावना ! दरेक कथेवर नेटके विवेचन. त्या संग्रहातील माझ्या 'अविधवानवमी' या कथेच्या अनुषंगाने त्यांनी विचारलेला मार्मिक प्रश्न ! त्या कथेत विषयाला अनुरूप असे बरेच तपशील आहेत. खाद्यपदार्थांचीही रेलचेल. त्या संबंधात "तुम्हाला हे पदार्थ करता येतात का ?" किती अडचणीत टाकणारा सवाल ! क्षरणीच्या टोकाने सहस्र भोजन घालणे देखील द्रौपदीएवढं सोपे !

त्यानंतर जेव्हा जेव्हा एखाद्या लालारसजनक पदार्थाचा उल्लेख लेखनात येतो, तेव्हा सट्‌दिशी तो प्रसंग आठवून हसू फुटतं.

सौ. धारप यांनी स्मरणिकेमध्ये माझ्याजवळच्या आठवणींना आवर्जून स्थान देऊन माझा खरोखरच गौरव केला आहे. सरांच्या हाताखाली एम. ए. पीएच. डी. करण्याचे भाग्य लाभलेल्या त्यांच्या शिष्यवर्गाने आठवणींच्या घागरी ओतल्या असतील, त्यातच माझी पळीभर धार–मात्र उदंड भक्तिभावाने वाहिलेली.

* *

अनुक्रमणिका

# प्रापंचिक उपदेश

सौ. रेखा प्र. नगरकर

मी प्रा. कुळकर्णी यांची रुईया कॉलेजातील विद्यार्थिनी. माझ्या विवाहाचे आमंत्रण देण्यासाठी मी श्री. वि. ह. कुळकर्णी यांच्या घरी गेले होते. माझे भावी पती नवी दिल्ली येथे 'सेंट्रल पब्लिक वर्क्स डिपार्टमेन्ट' येथे आर्किटेक्ट म्हणून नोकरीस होते. लग्नानंतर मी सरांना दुरावणार होते. म्हणून मी त्यांना विनयाने वाकून पदस्पर्श करून आमंत्रण दिले. व त्याप्रमाणे सर कार्याला आले. त्यांनी प्रेमाची भेट म्हणून य. दि. पेंढारकरांचे "प्रापंचिक पत्रे" अर्पण केले. या पुस्तकात संसारात नवीन पदार्पण करणाऱ्या तरुणींसाठी उपदेशपर व मार्गदर्शक अशा पत्रांचा संग्रह आहे. ते पुस्तक मी उत्साहाने वाचले व त्यानुसार आदर्श गृहिणीप्रमाणे आचरण ठेविले. अभिमानाची गोष्ट ही की आज मी माझ्या भाग्यशाली संसारात पूर्ण रमले आहे. सेवानिवृत्त प्रेमळ पती, उच्चशिक्षित पुत्र व स्नुषा, दोन सुविद्य विवाहित कन्या व जामात, त्यांचेही सुसंपन्न संसार, त्यांच्या जोडीला सर्व मिळून माझे पाच नातू यांच्यासमवेत मी समाधानाने कालक्रमण करीत आहे. याचे श्रेय सरांनी गुरुजी या नात्याने दिलेले आशीर्वाद व त्यांनी दिलेली अमोल भेट यांनाच द्यावे लागेल. त्यांनी मला आहेरादाखल दिलेल्या पुस्तकाचे हे दृश्य फळ आहे असे मी मानते.

सुमारे ३३ वर्षांपूर्वीचा म्हणजे ऑगस्ट-सप्टेंबर १९४७ चा काळ होता. नवी दिल्ली येथे जातीय दंगल उद्भवली होती व त्या निमित्ताने जाळपोळ, लूटमार अशी भयानक परिस्थिती निर्माण झाली होती. निरपराध कुटुंबाला निष्कारण जाच होऊ लागला. सामान्य नागरिकांचे जीवन धोक्यात आले होते. मी विवाह होऊन नवी दिल्ली येथे स्थायिक झाले होते. साहजिकच मुंबईतील आमच्या आप्तेष्टांना आमच्या सुरक्षिततेसंबंधी चिंता वाटू लागली. दिल्लीला मुंबईहून व मुंबईला दिल्लीहून पाठवलेली पत्रे मिळत नव्हती. त्यामुळे मुंबईतील आमच्या नातलगांना आमचे क्षेमकुशल समजत नव्हते. प्रा. वि. ह. कुळकर्णी, रामनारायण रुईया कॉलेजात त्या वेळी सिनीयर बी. ए. च्या वर्गात शिकत असणाऱ्या माझ्या धाकट्या भगिनीकडे माझ्याकडून पत्र आले का वगैरे आस्थेने चौकशी करीत असत.

परंतु साराच पत्रव्यवहार बंद पडला होता. शेवटी दिल्लीच्या आमच्या पत्त्यावर Reply Paid Telegram करून पाहावा असे त्यांनीच सुचविले. त्यांच्या सल्ल्यानुसार माझ्या वडिलांनी तसा एक चान्स घेतला. आश्चर्याची गोष्ट म्हणजे उशिरा का होईना आम्हाला ती तार पोहोचली. तसेच आमचे उत्तरसुद्धा मुंबईला विलंबाने पण पोहोचले. आमचे सुखरूप असल्याचे वृत्त ऐकून आमच्या घरच्या मंडळींप्रमाणे प्रा. कुळकर्णी व त्यांच्या कुटुंबालाही फार समाधान वाटले. आपल्या माजी विद्यार्थिनीबद्दल प्रा. वि. ह. कुळकर्णी यांनी दाखविलेली आपुलकी हल्लीच्या स्पर्धा व धक्काबुक्कीच्या युगात फारच दुर्मिळ. ईश्वर त्यांना दीर्घायुष्य व आरोग्य देवो हीच सदिच्छा.

* *

# भावना

## सौ. गीता यशवंत गोध

आमचे विश्वविद्यालयीन शिक्षण रामनारायण रुईया कॉलेजात झाले. आज ३। ३।। दशके उलटून गेली तरी तो काळ व शैक्षणिक जीवनातील त्या आठवणी अद्यापही ताज्या आहेत. आम्ही भगिनीद्वय प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्या विद्यार्थिनी व ते आमचे इंग्रजीचे प्राध्यापक. वास्तविक ते मराठी साहित्यातील नामवंत साहित्यिक. पण इंग्रजी भाषेवरील त्यांचे प्रभुत्व वाखाणण्याजोगे होते. ते इंग्रजी सहजसुलभ भाषेत शिकवीत असत. मधूनच विषयाच्या अनुषंगाने काही मनोरंजक गोष्टी अथवा अनुभव ओघानेच कथन करीत असत, किंवा संदर्भ देत असत. या त्यांच्या शैलीमुळे विलष्ट व अवघड विषयसुद्धा सुलभरीतीने समजत असे.

काही वर्षांपूर्वी आमचे एक कौटुंबिक वार्षिक हस्तलिखित "भावना" आम्ही प्रसिद्ध करीत असू. दरवर्षी आम्ही प्रा. वि. ह. कुळकर्णी यांना ते घरी जाऊन नेमाने, आदराने वाचावयास देत असू. त्यांनी आमच्या नियतकालिकाचे मन:पूर्वक कौतुक केलेले आहे व त्यासंबंधी त्यांचे अभिप्राय, प्रशस्ती व शुभ आशीर्वाद त्यात नमूद केलेले आहेत. प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्या घरी त्या निमित्ताने आमचे कधीतरी जाणे-येणे होत असे. त्यांच्या घरी त्यांच्या पत्नी सौ. इंदिराबाई (दुर्दैवाने त्या आता हयात नाहीत व त्यांची कन्या इरावती जी त्या वेळेस एक शाळकरी विद्यार्थिनी होती) आमच्याशी मनमोकळेपणाने दिल-खुलास गप्पागोष्टी करीत असत. प्रोफेसर साहेबांशी आम्ही काही चर्चा करीत असू. त्यात त्याही रसिकतेने भाग घेत असत. त्यामुळे कुळकर्णी कुटुंबाशी आमचे एक प्रकारे सलोखा व जिव्हाळ्याचे नाते जडले होते. आमच्या विवाहकार्याला, समारंभाला ते अगत्यपूर्वक उपस्थित राहिले. त्यांची सुकन्या सौ. इरावती कुळकर्णी यांचेही स्फुट लिखाण अधूनमधून वाचनात येत असते. आपल्या पित्याच्या पावला-वर पाऊल ठेवून त्याही साहित्यक्षेत्रात उदयास येत आहेत व भावी काळात त्या मानाचे स्थान पटकवतील अशी उमेद आहे.

* *

अनुक्रमणिका

# मनमोकळी दाद

## के. जी कुलकर्णी

प्रा. वि. ह. कुळकर्णी म्हणजेच विद्यार्थ्यांना हवे असलेले कुळकर्णी असे म्हणावयास मुळीच हरकत नसावी. त्यांच्या असंख्य विद्यार्थ्यांचा मला आज हेवा वाटतो. कारण की माझे दुर्भाग्य असे की मी त्यांचा विद्यार्थी कधीच नव्हतो. पुणे येथे फर्ग्युसन कॉलेजमध्ये सुमारे पन्नास वर्षांपूर्वी माझे शिक्षण झाले. त्या वेळी आम्हाला प्रा. जी. एच. केळकर उत्कृष्ट इंग्रजी शिकवत असत. कधी कधी आम्ही एस. पी. कॉलेजमध्येही प्रा. आर. के. लागू यांची टेनिसन, शेक्सपियर वगैरे महान साहित्यिकांच्या साहित्यावरही विद्वत्ताप्रचुर अशी व्याख्याने ऐकली. परंतु या व्याख्यात्यांकडून ज्ञान मिळाले हे तर खरेच, तरीही शिकत असताना असे वाटे की 'विनोद' म्हणून जे काही वाङ्मयात असते ते हे लोक शिकवीत असताना कधीही त्यांच्या चेहऱ्यावर सुरकुती अशी पडलीच नाही.

मुंबईमध्ये आल्यानंतर प्रा. वि. ह. कुळकर्णी यांचा थोडासा जो काही सहवास घडला त्यामुळे मला त्यांच्याबद्दल नितांत आदर वाटू लागला. एका प्रसंगी त्यांना मी आमच्या परळ येथील आर. एम. भट हायस्कूलमध्ये व्याख्यानास नेले होते. त्या वेळी त्यांनी राम गणेश गडकरी यांच्या वाङ्मयातील विनोद, आपल्या विनोदपूर्ण रीतीने सांगून सर्व सभागृह हसवून सोडले आणि साहित्यातील 'विनोद' कसा श्रोत्यांना समजावून द्यावा याची जाणीव करून दिली.

दुसरा एक प्रसंग असा की चेम्बूर येथील सुप्रसिद्ध प्रा. विलास बाळकृष्ण पाटणकर यांच्याकडे एका कार्यानिमित्त भोजनप्रसंगी व तदनंतर जवळजवळ दोन तास मला प्रा. वि. ह. कुळकर्णी यांचा सहवास घडला. त्या वेळी अनेक प्रासंगिक गोष्टी त्यांनी सांगून आमचा वेळ कसा घालविला ते मुळीच समजले नाही. त्या बोलण्यात कोणाचाही अनादर किंवा टिंगल तर नव्हतीच; तर त्या व्यक्तीबद्दल आदर होता. एक अत्यंत महत्त्वाची व कायम लक्षात राहण्यासारखी गोष्ट त्यांनी सांगितली ती अशी–

'एका प्रसंगी एका व्यासपीठावर लोकमान्य टिळक, रँग्लर परांजपे एकत्र होते. श्री. राम गणेश गडकरी प्रेक्षक म्हणून होते. त्या वेळी राम गणेश गडकरी

म्हणाले, "अखिल महाराष्ट्राची बुद्धिमत्ता आज या व्यासपीठावर आसनस्थ झाली आहे." केवढा हा आदरपूर्ण अभिप्राय ! प्रा. कुळकर्णी यांच्या स्वभावाची जडण-घडण अशीच घडली असावी. प्रा. वि. ह. कुळकर्णी दुसऱ्यांच्या विनोदावरही तितकेच खूष असून कौतुक करीत असत.

एकदा वाटेत त्यांची व माझी भेट झाली असता, (हल्ली ती नेहमीच होत असते) मी त्यांना सांगितले की, आचार्य अत्रे बालमोहनचे प्रिन्सिपॉल दादासाहेब रेगे यांच्याबद्दल असे म्हणाले की धृतराष्ट्राला १०० पुत्र होते. परंतु आमच्या दादांना हजारो मुले आहेत. (बालमोहनची विद्यार्थी संख्या हजारोंनी असते) तेव्हा प्रा. वि. ह. कुळकर्णी यांनी मनापासून आचार्य अत्रे यांचे जे कौतुक केले ते मला आजही आठवते.

प्रा. वि. ह. कुळकर्णी यांना दीर्घायुष्य व आरोग्यसंपन्नता देव देवो हीच त्याच्याजवळ प्रार्थना.

* *

# ' शनिवारच्या गप्पा '

## बाळ कुडतरकर

मी शाळेत शिकत असतानाच प्रा. वि. ह. कुळकर्णी यांचं नाव मी ऐकून होतो. मुळातच मला साहित्य आणि साहित्यिक यांच्याविषयी नितांत आकर्षण. तेव्हा कसे कुणास ठाऊक पण हे नाव मी ऐकले होते. पुढे अनेक साहित्यिकांशी माझी जी जवळीक झाली, ती माझ्या कधी स्वप्नातही नव्हती. आदरणीय प्रा. वि. ह. कुळकर्णी यांची ओळखही नव्हती. पण ते नवल वर्तले ते आकाशवाणीवर. त्या काळच्या फक्त ' ऑल इंडिया रेडिओ 'वर – मी नाट्य कलावंत म्हणून नोकरीला लागल्यामुळे.

श्री. बा. सी. मर्ढेकर हे आमचे वरिष्ठ अधिकारी होते. मर्ढेकरांचा प्रा. कुळकर्ण्यांवर फारच लोभ. आकाशवाणी केंद्रावर, अर्थात मुंबईच्या, त्यांच्या अनेक गाठीभेटी होत. अशाच एका भेटीत प्रा. वि. हं. ची आणि माझी भेट झाली. गगन ठेंगणे वाटले. असे कधी घडेल, असे तत्पूर्वी कधी वाटलेच नव्हते.

काय असते, काही माणसे नुसती पाहताक्षणीच त्यांचा आपणाला तिरस्कार वाटू लागतो. उगीचच. त्यांनी आपले काहीच घोडे मारलेले नसते. कदाचित ती बिचारी सज्जन, सच्छील माणसे असण्याचाही संभव नाकारता येत नाही. पण काही माणसे पाहताक्षणीच ती आपलीशी वाटू लागतात. प्रा. वि. हं. च्या बाबतीत नेमके असेच घडले. त्यांच्याविषयी आधीपासून वाटणारा आदर दुणावला. माझाच काय कुणाचाही तसाच दुणावायला हवा आणि तसे नाही घडले तर त्या माणसात, म्हणजे त्याच्या बुद्धीत काहीतरी उणेपणा आहे असे खुशाल समजावे. स्वभाव तर इतका गोड की त्याला कशाची उपमा द्यावी असा विचारच पडतो. बोलणे तर ऐकतच राहावे. त्या बोलण्यात आपणाला आकर्षित करणारा मिष्किल विनोद सारखा पाझरतच असतो. बुद्धिवंत ते होतेच नि आहेतच. ते मी पामराने काय सांगावे. पण बुद्धिवंतांची आढ्यता त्यांच्या ठायी तिळमात्रही कशी नाही याचे मात्र आश्चर्य या घटकेलाही वाटते.

१९४० चा ब्रिटिश राजवटीचा तो काळ. ऐन दुसऱ्या महायुद्धाचा. युद्धकाळात आकाशवाणीला अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त होणे साहजिकच होते

अनुक्रमणिका

युद्धाच्या घडामोडी जनसामान्यांपर्यंत पोचाव्यात आणि विशेष म्हणजे त्यांचा आत्मविश्वास ढळू नये म्हणून अनेक नवनवीन कार्यक्रम आयोजित करण्यात येत होते. त्यावेळचे केंद्राधिकारी ले. ए. एन. एस. लक्ष्मणन् यांनी चहा पिता पिता ऐकण्यासारखा एक कार्यक्रम करावा अशी कल्पना मांडली. आठवड्यातून एकदा फक्त अर्धातास. हा कार्यक्रम आठवड्याच्या घडामोडींवर आधारित असावा. संवादांच्या अनुषंगानं त्यात लोकप्रिय ध्वनिमुद्रिका असाव्यात असा कार्यक्रमाचा आराखडा ठरविण्यात आला. कार्यक्रम रोचक आणि विनोदी असायला हवा. सर्वच युद्धविषयक घडामोडी असायला हव्यात असा काही दंडक नव्हता. इतर काही दैनंदिन कौटुंबिक महत्त्वाच्या घडामोडीदेखील त्यात घ्यायच्या होत्या.

कार्यक्रमाचे स्वरूप ठरवणे सोपे. पण प्रत्यक्षात त्याचे लिखाण कुणी करायचे हा यक्षप्रश्न होता. श्री. मर्ढेकर यांनी नाव सुचवले प्रा. वि. ह. कुळकर्णी यांचे. आम्ही, म्हणजे मी, नारायण देसाई आणि मनोहर देशपांडे तिघेही उत्सुक होते कुळकर्णीसाहेबांनी स्क्रिप्ट पाठवून दिले. त्यात तीन कायम स्वरूपाची पात्र योजना (stock characters) केलेली होती. लठ्ठे, वामनराव आणि पंडितजी. मी–लठ्ठे, मनोहर–वामनराव आणि नारायण–पंडितजी अशी पात्रे ठरली. कार्यक्रमाचं नाव, ‘शनिवारच्या गप्पा.’ तालमीच्या वेळीच मुळी आमच्या हसून हसून अक्षरशः मुरकुंडया वळायच्या. आम्ही इतके हसायचो की प्रत्यक्ष कार्यक्रमाचे वेळी हसू आवरता आवरता पुरेवाट व्हायची. इतकं तुफान विनोदी लेखन कुळकर्णीसाहेबांनी सतत युद्धकाळात आमच्यासाठी केलं. श्रोते तर ‘शनिवारच्या गप्पांची’ वाट पाहत बसत. पत्रांचा अक्षरशः ढीग पडत असे.

अशाच एका कार्यक्रमात, लग्नसराईतील पुण्यातल्या लग्नवरातीचे त्यांनी उभे केलेलं चित्र आजही मी विसरू शकत नाही. वरातीची झुंबड अशी की वऱ्हाडी इकडचे कुठले नि तिकडचे कुठले हेच शोधावे लागावे. वाजंत्रीही भ्रमात पडावेत की आपण कुठल्या वऱ्हाडासाठी ताशा बडवतो आहोत. एकादवेळी इकडचा नवरा चुकून तिकडे नि तिकडची नवरी चुकून इकडे असेही होण्याचा संभव. अशा स्वरूपाचा तो त्यांनी लिहिलेला कार्यक्रम प्रत्यक्ष ऐकण्यातच मौज होती.

कुळकर्णीसाहेबांच्या लेखन–कौशल्यामुळे या कार्यक्रमाला जी लोकप्रियता मिळाली, त्याचा आकाशवाणीच्या पुढील अनेक कार्यक्रमांवर परिणाम झाला. स्त्रियांसाठी होणाऱ्या कार्यक्रमांत त्याचे पडसाद उमटले. खेडूतांसाठी होणाऱ्या कार्यक्रमात, ‘चव्हाटयावर’ हा याच स्वरूपाचा कार्यक्रम सुरू करण्यात आला होता. कामगार सभेतील ‘सहज सुचलं म्हणून’ तरी काय आहे? शनिवारऐवजी बुधवारी होणाऱ्या गप्पाच. पण मौज अशी, ती सर काही येत नाही.

नाही म्हणायला, ‘शनिवारच्या गप्पा’ नंतर अत्यंत लोकप्रिय ठरलेला आणि

श्रोत्यांना अक्षरशः वेड लावणारा कार्यक्रम म्हणजे 'पुन्हा प्रपंच.' पण 'पुन्हा प्रपंच' म्हणजे तरी काय? कुळकर्णीसाहेबांच्या 'शनिवारच्या गप्पा'तून फक्त ध्वनिमुद्रिका काढून टाकल्या. मूळ स्फूर्ती कुळकर्णी साहेबांचीच. मीच "पुन्हा प्रपंच' सुरू करण्यास कारणीभूत झालो आणि मीच प्रांजलपणे कबूल करतो की त्याचे बीज कुळकर्णीसाहेबांच्या 'शनिवारच्या गप्पा'तच आहे. एवढंच कशाला! एरवीसुद्धा त्यांच्याशी गप्पा मारून पहा. 'शनिवारच्या गप्पा' देखील विसरायला लावणारे त्यांचे मिस्किल, विनोदी, मार्मिक बोलणे ऐकताना भूकतहान खरोखरच विसरायला होते.

* *

# स्नेहार्द्र आपुलकीत भिजलेले सौजन्य व शिष्टाचार

## आनंद साधले

विठ्ठलराव तथा वि. ह. कुळकर्णी यांचे व्यक्तिचित्र लिहिण्यापेक्षा त्यांचा उत्तम परिचय करून देण्याचा मार्ग म्हणजे त्यांचा एखादा फोटो छापणे व त्याखाली लिहिणे– शिष्टाचार, सौजन्य. यात सारे आले. विठ्ठलरावांचा फोटो मिळेल तोही टाय, कोट असा शिष्टसंमत प्राध्यापकी वेषातील असेल. सौजन्य त्यांच्या मुद्रेवर लिहिलेले असेल. विठ्ठलराव म्हणजे सौजन्य. भिडस्त सौजन्य. शिष्टाचार.

विठ्ठलराव आज मला पितृस्थानी आहेत. पण त्यांची प्रत्यक्ष ओळख कधी झाली ते मला आता झटपट आठवणार नाही. त्यांची अप्रत्यक्ष ओळख मात्र पंचेचाळीस वर्षांपूर्वी म्हणजे मी स्वत: अंडघातून बाहेर पडण्याआधी (ब्राह्मणाचे अंडे मुंजीत फुटते) झाली आहे. त्या वेळेस मी कोकणात आणि लंगोटीत होतो. माझे एक गुरुजन विविध वृत्तात काहीतरी वाचीत होते. वाचता वाचता ते आणखी कोणाला म्हणाले, " हा तरुण लेखक मोठा होणार आहे. हा नेहमी चिंतनशील, गंभीर लिहितो. आजकालच्या भिकार लघुकथा आणि कविता लिहून लेखणी विटाळीत नाही.'' गुरुजनांच्या आदरापोटी मी ते पुढे मोठ्या होणाऱ्या लेखकाचे नाव पाहिले व लक्षात ठेवले. ते नाव होते वि. ह. कुळकर्णी.

पुढे माझी लंगोटी सुटली. कोकण सुटू आले. सुमारे दहा वर्षांच्या काळानंतर वि. ह. कुळकर्णी यांच्याविषयी दुसरे एक कॅरॅक्टर सर्टिफिकेट माझ्या दप्तरी जमा झाले. हे सर्टिफिकेट आम्हा कोकणी संस्कृतांचे त्या काळातील परमदैवत भाऊसाहेब खांडेकर यांनी दिले होते. म्हणजे भाऊसाहेब माझ्याशी काही बोलले किंवा इतरांशी ते बोलताना मी ऐकले असे नव्हे. पण तेव्हा (बहुधा ज्योत्स्ना मासिकात) मी वि. स. खांडेकर या नावाबरोबरच वि. ह. कुळकर्णी हे नाव छापलेले पाहिले. परमपुण्यपुरुषाच्या दरबारात वि. ह. कुळकर्णी यांना आसन असावे यापेक्षा अधिक त्या वयात मला काहीच नको होते.

मोठे झालेले लेखक म्हणून विठ्ठलरावांचे मराठीत काय स्थान आहे याचे मापन मी करणार नाही. प्राध्यापक म्हणून विठ्ठलराव किती थोर आहेत याचेही



अनुक्रमणिका

मापन मी येथे करणार नाही. विठ्ठलरावांचे सामाजिक कार्य वस्तुनिष्ठेने किती मोठे होते याचे वर्णन मी करणार नाही, कारण ते जगजाहीर आहे. मी फक्त सांगणार आहे, माणूस म्हणून विठ्ठलराव मला कसे दिसतात ते.

मला सर्वांत आधी स्मरणार आहेत त्या म्हणजे विठ्लरावांच्या पत्नी इंदिरा कुळकर्णी. विठ्ठलराव मला पित्यासारखे. तशा इंदिराबाई आईसारख्या. केवळ विठ्ठलरावांची पत्नी म्हणून नव्हे, तर स्वत.च्या बळावर त्यांनी तो अधिकार मिळविलेला. आईचा अधिकार खरा कळतो तो बदफैली पोराचा कान पिळताना. मी सत्तर-बहात्तर साली विवाहबाह्य प्रीती जगलो. तिच्यावर विठ्ठलरावांचा राग नसला तरी इंदिराआईच्या लेखी तो बदफैलीपणा होता. त्यामुळे एकदा विठ्ठल-राव व मी मोठ्या रंगात येऊन त्या प्रीतीची तात्त्विक बाजू चर्चीत बसलो असताना भिंतीपलीकडे इंदिराबाईंना ती चर्चा ऐकवेना. त्या तरातरा बाहेर आल्या आणि सत्वशील वास्तूमध्ये अकर्मांची चर्चा केल्याबद्दल त्यांनी आमची उत्तम खरडपट्टी काढली. आमची म्हणजे लेकाची व नवऱ्याचीही. स्वत: पुरत्या दमेपर्यंत इंदिराबाई आमच्यासमोर उभ्या राहून आम्हाला झाडीत होत्या. मी तर जाणून बुजून निर्लज्जपणाचा दाखला घेतलेला असल्याने मख्ख बसून सारे ऐकत होतो. पण विठ्ठलरावांनी ज्या शांतपणाने, पत्नीने दिलेले वाक्दहन सोसले ती शांती स्थित-प्रज्ञाची होती. इंदिराबाई दमून आत गेल्या व आम्ही लगेच आमचा विषय चालू केला.

यातील विठ्ठलराव आणि इंदिराबाई यांच्यात व्यक्तित्वाच्या कक्षा पाहायच्या. माझी खरडपट्टी काढणे यात इंदिराबाईंचे काही खास वैशिष्टय नव्हते. ती तर अनेकांनी काढली होती. इंदिराबाईंचे वैशिष्टय हे की त्यांची माया त्यांच्या रागात जळाली नाही. त्यांचे घर आणि अंत:करण मला कधी बंद झाले नाही. स्नेहार्द्र आपुलकीने व खाऊ-पिऊ घालण्याने ते सतत उबदार राहिले.

विठ्ठलरावांचे वैशिष्टय असे की इंदिराबाई काही स्वभावाने त्राटिका नव्हत्या. त्या सत्यशील आणि मायावती होत्या. कितीतरी व्यक्तींनी त्यांना माऊली मानले. पण पतीचे वर्तन गैर वाटले तर उघडपणे त्याच्यावर रागवण्याचा अधिकार व धीर त्यांना आला हे वि. हं. च्या पतित्वाला, धर्मपत्नीशी असणाऱ्या त्यांच्या सामरस्याला भूषण आहे. सीता लक्ष्मणासमोर रामाला झाडते त्या थोर नात्याशी याची तुलना व्हावी.

इंदिराबाई म्हणजे वि. हं. चे सर्वस्व. आर्थिक विपत्तीच्या काळातून त्यांनी एक भरला संसार प्रसन्नतेने फुलविला होता. आता सुस्थिती आल्यावर उतारवयात दोघांनी परदेशचा प्रवास करायची स्वप्ने पति-पत्नी पाहत होती. इंग्रजी वाङ्मयाशी संबंधित असा सारा प्रदेश त्यांना पाहायचा होता. शेक्सपिअरचे गाव, इतर महा-

कवींची स्मृतिस्थाने, हस्तलिखिते, इत्यादी.

अशातच इंदिराबाई स्वयंपाकघरात अपघाताने भाजून विठ्ठलरावांना सोडून गेल्या. समरसलेल्या संसारातील पत्नी मध्येच उठून जाते तेव्हा पती मोडतोच मोडतो. पण ज्याच्या व्यक्तित्वाला तात्त्विकतेची बैठक असते त्याचे मोडणे लोकांना दिसत नाही. इंदिराबाई गेल्या तेव्हा विठ्ठलरावही मोडलेच. पण ते मोडताना कुणाला दिसले नाहीत. विवाहानंतर ज्या कोवळेपणाने त्यांनी पत्नीच्या गालांना पहिला स्पर्श केला असेल त्याच कोवळेपणाने त्यांनी सरणावर अग्निपूर्व शेवटच्या क्षणी पत्नीचे वदन कुरवाळले. एक करुणगंभीर काव्य क्षणभर जगले गेले. त्या स्पर्शाने विठ्ठलरावांना कणा ताठ ठेवण्याची अमृतशक्ती आली.

विठ्ठलरावांचे घर तसे नेहमी वर्दळीचे. बहुसंख्य वेळा, उघडलेल्या दारात मूर्ती उभी असते ती स्वागतशील विठ्ठलरावांची. कदाचित घरातील इतर माणसे कसल्यातरी कामात असतात. याचा अर्थ, विठ्ठलराव हे निकामी असा नव्हे. पण दारात जो उभा असेल त्याला प्रतीक्षेचे कष्ट कमीत कमी पडावेत अशी सौजन्यशील आच मात्र विठ्ठलरावांनाच जास्तीच जास्त असते. ज्याच्यात व्यत्यय येणे त्रास-दायक अशा गंभीर वाचनात आपण मग्न आहोत, स्वयंपाकघरातून सून येईल आणि दार उघडील; म्हणून ते थांबणार नाहीत. आता आपली उत्तरी उलटली, उगाच उठ-बस बरी नव्हे; कुणी तरी तरुण रक्ताचे येईल आणि दार उघडील असेही ते मानणार नाहीत. अभ्यागताचे स्वागत करील ते त्यांचेच सुहास्य सौजन्य.

विठ्ठलराव हे स्वागत करतात. नंतर अभ्यागताच्या हातात अटॅची, पिशवी, छत्री, काठी वगैरे जे असेल ते मागून घेतात व नेमके सोयीच्या जागी ठेवतात. अभ्यागत जाताना ते घाईघाईत विसरून जायला निघाला तरी विठ्ठल-राव ते आठवणीने द्यावयास कधीही विसरत नाहीत.

हे सारे झाल्यावर अभ्यागताने नेमके कोणत्या खुर्चीवर बसावे, प्रकाशाच्या विशिष्ट अवस्थेनुसार त्या खुर्चीचा कोन त्या वेळी नेमका कसा असावा, त्यांची स्वतःची खुर्ची कशी असल्याने संभाषणात अधिक सुगमता येईल याची योजना विठ्ठलराव करतात. थंड पाणी, चहा, जी काय व्यवस्था करायची तिचे आदेश देतात. नंतर म्हणतात, "बोला, काय काम आहे ?"

विठ्ठलरावांच्या घरची ही रीत लिहायला वाचायला बराच वेळ लागला. प्रत्यक्षात हे सारे अशा सराईतपणे घडते की ते घडल्याचेही लक्षात येत नाही. मग त्यात वेळ गेला असे वाटणेही दूरच राहिले.

विठ्ठलरावांच्या हातून अभ्यागताचे होऊ शकणारे काम बहुधा होतेच. कारण ते भिडस्त आहेत. जे काही त्यांना करता येईल ते, ते कष्ट घेऊनही करतील. कष्टांचा विचार करण्याची शक्ती त्यांच्या सौजन्यात नाही. काही कामे ते करू

शकत नाहीत. त्यांचा प्रांजल नकारही सौजन्यशील व सुखद असतो. कारण त्या नकारामागची भूमिका ते इतक्या सविस्तरपणे विशद करतात की अशा अवस्थेत विठ्ठलरावांनी आपले काम मुळीच करू नये असा आग्रह धरण्याकडे सुबुद्ध अभ्यागताचा कल होतो. शिवाय विठ्ठलराव साऱ्या गोष्टी मोकळ्या विश्वासाने बोलले असल्याने एक स्नेहसंबंधही त्या नकारातूनच उभा राहतो.

विठ्ठलरावांच्या घरी गेली अनेक वर्षं टेलिफोन आहे. त्यांच्याशी टेलिफोनवर बोलणे हाही एक सुखद अनुभव असतो. विठ्ठलराव रिसीव्हर उचलतात आणि म्हणतात, " मी वि. ह. कुळकर्णी बोलत आहे." उलट बाजूची व्यक्ती योग्य तो बोध घेते असे नाही. तिचे चालूच असते, " हॅलो ! हॅलो !" ' हॅलो ' हा टेलिफोनच्या संभाषणाचा बीजमंत्र कसा काय झालेला आहे देव जाणे. टेलिफोन कसा करावा या संबंधीचे आदेश डिरेक्टरीच्या पाना-पानावर छापलेले असतात. ते अनुसरण्यासाठी असतात याचा अर्थात फारच थोड्या टेलिफोनधारकांना पत्ता असतो. त्यामुळे जगातील सर्व भाषांमधून टेलिफोनवर जे शब्द बोलले जात असावेत, त्यांतील कोणत्याही एका शब्दापेक्षा ' हॅलो !' हा शब्द जास्त बोलला जात असावा. ' हां, हॅलो !' असे प्रत्येक वाक्याच्या शेवटी, आरंभी बोलणारे महाभाग सर्वांच्या परिचयाचे आहेत. वि. आ. बुवासारख्यांनी तर यावर चार-दोन लेख लिहिले असणेही संभवनीय आहे.

विठ्ठलरावांना या ' हॅलो ' चा संताप येतो. मग असे संभाषण होते. " मी वि. ह. कुळकर्णी बोलत आहे." "हॅलो ! हॅलो ! हॅलो !" " मी वि. ह. कुळकर्णी बोलत आहे." विठ्ठलराव अधिक ठासून सांगतात. " हॅलो ! हॅलो !" विठ्ठलराव पुन्हा प्रत्येक शब्द नीट ठासून सांगतात. " मी वि. ह. कुळकर्णी बोलत आहे."

एवढ्यात बहुधा पलीकडची ट्यूब पेटलेली असते. संभाषण सुरू होते. " मी आनंद साधले..." माझ्या मनात कल्पना येते की टेलिफोनकंपनीने कुणाही ग्राहकाला नवा टेलिफोन देण्याअगोदर त्या ग्राहकाने विठ्ठलरावांशी ५।१० वेळा फोनवर संभाषण केल्याचा दाखला आणणे अपरिहार्य करावे.

दुसऱ्यापासून असा त्रास सततचा सोसत आल्याने विठ्ठलराव स्वत:पासून दुसऱ्यास त्रास होऊ नये यासाठी जागरूक राहत; इतके जागरूक की शेवटी हा त्यांचा स्वभावच झालेला आहे. माझ्यासारख्या रोज भेटणाऱ्या माणसालाही एखादे वेळी ते असे सांगण्याचा संभव उत्पन्न होतो, " मी वि. ह. कुळकर्णी. "

एखाद्या वेळी माझ्या मनात गमतीचा विचार येतो. विठ्ठलराव काही वर्षांपूर्वी अमेरिकेतील दोन मुलगे, दोन सुना आणि नातू यांना भेटण्यासाठी अमेरिकेला गेले. आपण अमेरिकेला जाताना लोकांना त्रास होऊ नये यासाठी ते प्रत्येकाला न विसरता सांगत होते; " मला विमानतळावर निरोप देण्यासाठी

कोणीही यावयाचे नाही."

ही तर त्यांची रीतच असावी. कुठे परगावी जाणार असतील, तर ज्यांच्याकडे उतरावयाचे त्यांना विठ्ठलराव लिहितात– "मी अमुक दिवशी अमुक वाजता येत आहे. अमुक दिवस माझा मुक्काम तिथे असेल. मला उतरून घेण्यासाठी कोणीही स्टेशनवर यावयाचे नाही." आपल्या या शेवटच्या आज्ञेची उपेक्षा होऊ नये म्हणून ते तिच्याखाली रेखाही मारीत असत. तेव्हा दुसऱ्याला त्रास होऊ नये याची एवढी काळजी घेणाऱ्या विठ्ठलरावांनी स्वतःच्या हिमतीवर (हा त्यांचाच आवडता शब्द) विमान पकडले व दुसऱ्याला त्रास दिला नाही तर ते समजू शकते; पण अमेरिकेत जेव्हा ते उतरले तेव्हा त्यांनी जर त्यांच्या मुलांना त्यांनी विमानतळावर येता कामा नये अशी आज्ञा दिली असेल तर मुलांनी ती खासच पाळली नसणार.

मग विमान तळावर थांबले आहे. विठ्ठलराव उतरले आहेत. गेटमधून बाहेर पडत आहेत. स्वतःच्या हिमतीवर सामान वगैरेचा ताबा घेऊन पुढील प्रवास करण्याच्या विचारात आहेत. इतक्यात त्यांना गेटबाहेर समोर मुलगे, सुना, नातू दिसतात आणि विठ्ठलराव त्यांना आपला परिचय करून देतात, "मी वि. ह. कुळकर्णी. याच विमानाने भारतातून आलो."

विठ्ठलराव असे म्हणाले असतील का? हा तो गमतीचा विचार. शिष्टाचार हीच जीवनरीती, त्यामुळे असे होऊही शकेल. विठ्ठलरावांनी माझ्या प्रेमाला प्रतिसाद दिल्यावर आम्ही किती वेळ बसावे आणि किती वेळ बोलावे याला काही धरबंद उरला नाही. अनेकदा विठ्ठलरावांना अनेक गोष्टींची चर्चा करायची असे, खूप बोलायचे असे. अशावेळी घरात चहा सांगून झाल्यावर ते म्हणत, "साधले, आता ××× वाजले आहेत. तुम्ही यानंतर कुठे जाणार आणि किती वाजता?"

कुठे जाणार ही जिज्ञासा तिथे पोचायला वेळ किती लागेल त्याच्या गणितासाठी. ते गणित झाल्यावर त्यांनी ठरवावे, "मग आज ×××× वाजेपर्यंत गप्पा." कधी हा मधला वेळ अर्धातास असावा. कधी चार तास असावा. मग बोलायच्या विषयांचा विस्तार विठ्ठलरावांनी नेमका त्या वेळात बसवावा. या उलट कधी असेही होई. मी जात असे. त्यानंतर कुणी यायचे ठरलेले असे. तेव्हा विठ्ठलराव म्हणत, "पंधरा मिनिटांनी ××××येणार आहेत. आज तुम्ही चहा घ्यायचा व लगेच निघायचे."

शक्य तर दुसरा पूर्वनियोजित अभ्यागत येण्याअगोदर आगंतुकाने निघून जाण्यात एक सौजन्य, सौंदर्य आहे. कारण ती जो पूर्वभेट ठरलेली असते तिचा एक सौन्दर्यालेख, भावालेख अपेक्षित असतो. अनपेक्षित व्यक्ती परिचित असली तरी तिच्या उपस्थितीने त्या आलेखाचा सौंदर्यतोल बिघडतो. 'अधिकस्य अधिकं फलं' हे सब्रगोलंकार तत्त्व पाळण्याऐवजी त्या एका व्यक्तीचा भावलेख सांभाळणे,

जपणे हेच अधिक सौजन्याचे असते. विठ्ठलरावांनी माझे स्वतःचेच असे अनेक भावालेख सांभाळले असल्याने त्यांच्या वर्तनातील सौजन्याचे नेमके मर्म मला जाणवू शकते. माझ्याशी निःसंकोच बोलता यावे यासाठी आधी आगंतुक आलेल्या अधिक मोठ्या माणसांनाही त्यांनी निरोप दिल्याचे मी पाहिले आहे.

मी स्वतः विठ्ठलरावांना कितीतरी त्राम दिला आहे. त्यांचा कितीतरी वेळ फुकट घालविला आहे. पण त्यांनी मला फक्त एकच गोष्ट सतत दिली ती म्हणजे वत्सल पित्याचे प्रेम. माझा पहिला संसार उद्ध्वस्त झाला हे इतरांच्या आधी त्यांना कळले. त्या वेळी त्यांनी माझा खूप सांभाळ केला. मी वृत्तीने काहीसा मोंड असल्याने कशानेही कुढत नाही. खाण्यापिण्याची उपेक्षा करण्याचा माझा स्वभाव नाही. पण विठ्ठलरावांना नेहमी माझ्या खाण्यापिण्याची काळजी वाटली. हॉटेल-बाजी ही काही त्यांची प्रवृत्ती नाही. पण त्या दिवसात जरी वाटेतही माझी कुठे भेट झाली तरी प्रत्येक वेळी त्यांनी जवळच्या उत्तम हॉटेलात नेऊन आधी मला भरपूर खाऊ घातले. मग इतर गोष्टींचा विचार केला.

जगात कोणी आमच्या हैदराबादच्या आला-हजरतला सर्वांत श्रीमंत मानतात. कोणी अमेरिकेतील रॉक फेलरला मानतात. माझ्या मते जगात सर्वांत श्रीमंत माणूस मी. वेगवेगळ्या पातळीवरील अनेक लहानथोर स्त्री-पुरुषांचे मला मिळणारे प्रेम ही माझी श्रीमंती. या माझ्या श्रीमंतीत विठ्ठलरावांचा वाटा खूप मोठा आहे. वस्तुतः कुठे विठ्ठलराव आणि कुठे मी ! विठ्ठलरावांचा प्रत्येक श्वास शिष्टाचाराचा. माझे बाबतीत म्हणजे माझे नाव व शिष्टाचार हे दोन शब्द कुणीही शहाणा एका वाक्यात उच्चारणार नाही. विठ्ठलरावांच्या शिष्टाचाराने, सौजन्याने, नम्रतेने कुणाशी वागणे मला प्राणांतीही जमणार नाही. तरीही फुलाचा वास मातीला लागतोच. तसे झाले असणे संभवनीय आहे. वेळप्रसंगी शिष्टाचाराने आणि सौजन्याने वागण्याचा पराक्रम मी सातत्याने चार दोन तास पार पाडला अशी शंका कुणाला आली तर त्याने मनात समजावयाचे की हा विठ्ठलरावांच्या संगतीचा परिणाम आहे.

विठ्ठलरावांनी प्रियजनासाठी जो त्याग केला, स्वतःच्या आकांक्षांना जी मुरड घातली, तिला मर्यादा नाही. आल्या गेल्या प्रत्येक माणसासाठी त्यांनी वेळ दिला. स्वतःच्या अभ्यासात खंड पाडला. त्याचे काम कितीही वेळखाऊ असले तरी होऊ शकत असले तर ते केले. त्यांच्या पिढीतील मुंबईत येणाऱ्या साहित्यिक मंडळींसाठी स्वतःचे घर सतत अभ्यागतगृहाप्रमाणे मुक्त ठेवले. त्या त्या अभ्यागताच्या सर्व लहरी सांभाळल्या. ते पाहुणे अंथरूण पाहून पाय पसरणार नसतील तर विठ्ठलरावांनी त्यांचे पाय पाहून अंथरुणे पसरली. अनेक व्यक्ती, अनेक संस्था, यांना सहकार्य दिले. त्यांचे संसार सांभाळले अनेकांचे चमत्कारिक प्रश्न हे स्वतःचे

प्रश्न मानले. त्यांची उत्तरे शोधली.

पिता असावा तर असा असे तिसऱ्यालाही वाटावे अशी माया त्यांनी मुलांना दिली. पंधरावीस वर्षांपूर्वीही ते सारी जबाबदारी खाली ठेवू शकले असते. मुलांनी ती उचलावी अशी अपेक्षा करू शकले असते. पण मुलगे परीक्षेमागून परीक्षा देत आहेत, स्वतःचे भविष्य कोरीत आहेत, त्यांचा मार्ग निर्वेध असावा यासाठीच त्यांनी पंचाहत्तरीपर्यंतही शिक्षणदानाचा व्यवसाय केला. अधिकार धरून ठेवावयाची आकांक्षा हे त्याचे कारण मुळीच नव्हते. जरा उशिरा झालेल्या मुलांचे भवितव्य आणि मार्ग यावर स्वतःच्या जबाबदारीचे ओझे व बंधन नसावे यासाठीच ते धुरा सांभाळत राहिले. यात त्यांनी स्वतःच्या अनेक स्वप्नांवर पाणी सोडले आहे. मौलिक स्वरूपाची उदंड साहित्यरचना करण्याचे सारे तयार आराखडे गुंडाळून ठेवले आहेत.

पण आता विठ्ठलराव मोकळे झाले आहेत. आपले वय पेन्शनीचे झाले असे त्यांनी आत्तापर्यंत मानले नव्हते. आपण वृद्ध झालो असेही त्यांनी आत्ता मानू नये. ते बांधून ठेवलेले सारे आराखडे उघडावेत, आपल्या परिणत प्रज्ञेच्या रंगात ती ती सारी साहित्यस्वप्ने पुरी करावीत व मराठी साहित्याला चिरंजीव श्रीमंती देत आपली शतायुष्याची संस्कृती मर्यादा पुरी करावी अशी माझी त्यांना प्रार्थना आहे.

* *

( श्री. आनंद साधले यांच्या ' सुगंधाचा पैस ' या पुस्तकातील लेखावरून. )

# प्रोफेसरसाहेबांची पत्रे– एक अमोल ठेवा

## मनोरमा फडके

प्रा. वि. ह. कुळकर्णी
शहाडेसदन, १२३, शिवाजी पार्क,
दादर, मुंबई २८
शुक्रवार २६ फेब्रुवारी १९८२.

प्रिय श्री. मनूताई यांस,

सप्रेम नमस्कार वि. वि.

तुम्ही काल get together चा कार्यक्रम केलात. या कार्यक्रमाची कल्पना मला फार आवडली. आपल्या समवयस्क मंडळींना आपण कारणपरत्वे भेटू शकता. परंतु पुढच्या पिढीतील मंडळींना आपण भेटू शकत नाही. चि. सौ. इरावती, माझी सून सौ. वीणा वगैरे स्त्रियांना तुम्ही बोलावल्यामुळे त्यांची परस्परांशी ओळख होते व झालेली ओळख अधिक दृढ होते. आपल्या ओळखीच्या अनेक तरुणी त्यांचे लग्न झाले म्हणजे दुसरीकडे राहायला जातात. असल्या कार्यक्रमामुळे त्यांची पुनर्भेट होते. या कार्य-क्रमाबद्दल तुमचे अभिनंदन.

कळावे. आपला,
वि. ह. कुळकर्णी.

ही अशी पत्रे प्रा. वि. ह. कुळकर्णी यांजकडून येणे ही गेली चाळीस वर्षे नित्य सवयीची गोष्ट होऊन बसली आहे. किंबहुना एखाद्या प्रसंगी त्यांचे पत्र नाही आले तरच काहीतरी अघटित घडल्यासारखे वाटेल.

प्रा. वि. ह. कुळकर्ण्यांचा व आमच्या घराचा परिचय झाला साधारण १९४१–४२ साली. लग्न होऊन दोन मुले झाल्यानंतर बऱ्याच वर्षांनी मी नागपूर विद्यापीठाच्या एम् ए (मराठी विषय)च्या परीक्षेला बसायचे ठरवले होते. त्यावेळी रुईया कॉलेजमधील एक प्राध्यापक व सुप्रसिद्ध साहित्यिक वामन मल्हार जोशी यांचे जावई श्री. डी. के केळकर यांनीच माझा प्रो. कुळकर्णी यांच्याशी परिचय

करून दिला. प्रोफेसरसाहेबांनी मार्गदर्शन करायचे कबूल केले. परीक्षेला त्यावेळी अडीच तीन महिने राहिले होते. त्यामुळे निम्मी पुस्तके त्यांनी वाचावीत व मी निम्मी वाचावीत आणि मग एकत्र चर्चा करावी, असे त्यांनी सुचवले. ह्या सूचनेमुळे माझ्या डोक्यावरील निम्मे ओझे तर कमी झाले पण एवढ्या विद्वान् प्राध्यापकाजवळ शिकताना वाटणाऱ्या न्यूनगंडाची मनात भीती मात्र निर्माण झाली. पण पुढे प्रत्यक्ष शिकताना अनुभव आला तो मात्र अगदीच वेगळा होता. त्यांच्या शिकवण्याच्या पद्धतीमुळे माझा न्यूनगंड तर कुठल्याकुठे गेला होता आणि उलट माझ्यात आत्मविश्वास व उत्साह निर्माण झाला होता. खूप मटेरिअलमधले नेमके काय लिहावे व ते कशा तऱ्हेने लिहावे, परीक्षेच्या दृष्टीने महत्त्वाचे काय असते वगैरे अनेक मौलिक गोष्टी शिकवल्या. प्रोफेसरसाहेबांच्या शिकवण्याच्या अशा पद्धतीमुळे त्यांच्याबद्दलचा विद्वत्तेचा आदर नितांत राहत असे, वाढत जात असे, पण दुरावा मात्र अगदी कमी होत असे.

पुढे एम. ए. च्या यशस्वी परीक्षेनंतर साहित्य संघाच्या कार्यकारी मंडळावर आम्ही एकत्र आल्याने स्नेहसंबंध वाढतच गेले. दादरची खूप मंडळी त्या वेळी संघाची सभासद होती आणि त्यामुळे कित्येकदा आमच्या घरीच मीटिंग्ज होत असत. प्रोफेसरसाहेबांच्या विनोदी स्वभावामुळे व मोकळेपणामुळे घरातल्या सर्व मंडळींशीही त्यांचा घरोबा वाढला. त्यांची मुलगी चि. सौ. इरावती व माझी मुलगी चि. सौ. अचला या दोघी बरोबरीच्याच होत्या. शिवाय दोघीही बॅडमिंग्टन उत्तम खेळत असत. त्यामुळे दोन्ही घरांचे जाणे-येणेही वाढले.

प्रोफेसरसाहेबांच्या घरी जाणे हा एक सुखद अनुभव असे. इंदिराबाईंचा प्रेमळ व मनमोकळा स्वभाव, आल्यागेल्याचे प्रसन्न स्वागत करायची त्यांची पद्धत, यामुळे त्यांच्या घरी जाणाऱ्याला पुन:पुन्हा जायचा मोह टाळणे अशक्य होत असे. इंदिराबाईंची मला आठवणारी एक विशेष आठवण म्हणजे प्रोफेसरसाहेबांचा व डॉ. फडके यांचा साहित्यसंघाने एकत्र साजरा केलेला एकसष्टी समारंभ. या समारंभात सौ. इंदिराबाईंनी डॉक्टरांबद्दल दहा मिनिटे इतके सुंदर भाषण केले की तो प्रसंग अजूनही त्या वेळी तिथे हजर असलेल्या मंडळींना अविस्मरणीय वाटत असेल.

१९५० साली डॉक्टर व मी जेव्हा इंग्लंडला गेलो होतो तेव्हा या अविस्मरणीय दांपत्याला आठवण म्हणून आम्ही शेक्सपिअरचा छोटा पुतळा आणला होता. आमच्या या सद्भावनेचे त्यांनी येणाऱ्या जाणाऱ्याकडे जे अमाप कौतुक केले त्यामुळे शेक्सपिअरच्या वाङ्मयाइतकेच त्याच्या पुतळ्याचेही प्रोफेसर साहेबांच्या घरात सार्थक झाल्याचे अपार समाधान लाभले.

प्रोफेसरसाहेबांच्या खास आवडीच्या गोष्टी म्हणून दोन नावे घेता येतील.

एक म्हणजे निबंधमालेबद्दलची त्यांची आस्था व दुसरे म्हणजे चहा. एकदा बरीच साहित्यिक मंडळी आमच्या घरी जमली असता प्रोफेसरसाहेब गमतीने म्हणाले की, '' या रेशनिगच्या काळात साखर कमी मिळत असल्याने चहा कमी घ्यावा लागतो व त्यामुळ स्फूर्ती मंदावली आहे.'' हे त्यांचे म्हणणे लक्षात ठेवून मी दुसऱ्या दिवशी त्यांच्या घरी थोडी साखर पाठवून दिली. लगेच तिसऱ्या दिवशी त्यांचे पत्र. '' तुमच्या साखरेमुळे चहा नियमित घेता येतो व त्यामुळे थंडावलेली स्फूर्ती परत जागी झाली आहे आणि लिखाण जोरात चालू केले आहे.''

ही अशी खास पत्रे व सुखदु:खाच्या प्रसंगी आलेली त्यांची पत्रे हा माझ्या वैयक्तिक भावसंपत्तीतील एक अमोल ठेवा आहे. न संपणारे अमित प्रेम व न सरणारे दु:ख मागे ठेवून जेव्हा डॉक्टर निघून गेले त्या वेळचे प्रोफेसरसाहेबांचे पत्र...

आज डॉक्टर नाहीत. सौ. इंदिराबाईही राहिल्या नाहीत. उरल्या आहेत चाळीस वर्षांच्या सर्व आठवणी.

आज प्रोफेसरसाहेबांबद्दल लिहिताना एवढेच आवर्जून म्हणावेसे वाटते की सुखदु:खाच्या प्रसंगी ज्या काही खास स्नेहीमंडळींची आठवण येते त्यात प्रा. वि. ह. कुळकर्णी हे प्रमुख नाव आहे आणि यातच त्यांच्या व्यक्तित्वाचे गुणविशेष सामावलेले आहेत.

* *

# ‘नांकांत बोलणें आवडतें’

## डॉ. श्रीराम परचुरे

अण्णांचा व माझा परिचय १९३३ च्या सुमारास झाला. त्या वेळी मी एलफिन्स्टन कॉलेजमध्ये इंटरच्या वर्गात शिकत होतो आणि अण्णा एका हायस्कूलमध्ये शिक्षक होते. धोतर, शर्ट, कोट व काळी टोपी असा त्यांचा त्या वेळचा पोशाख होता. टिळक–आगरकर युगाचे उत्तराधिकारी कै. न. चिं. केळकर व त्यांचे सहकारी त्या वेळी जोमाने काम करीत होते व त्यांच्या विचारांचा पगडा त्या वेळच्या बऱ्याच सुशिक्षित महाराष्ट्रीयांवर होता. म्हणून क्वचित कोणी सरकारी वरचे अधिकारी व प्राध्यापक असे काही लोक सोडल्यास आजच्याप्रमाणे सरसहा पॅंट वापरण्याची पद्धत त्या वेळी नव्हती. त्यामुळे अण्णा एम. ए. असूनसुद्धा पॅंट वापरीत नसत. परंतु त्यांचा पोशाख नीटनेटका असे. त्यामुळे कोणाही माणसावर प्रथमदर्शनीच त्यांची छाप पडे. ह्या नीटनेटकेपणामुळे त्यांच्या प्रसन्न व्यक्तिमत्त्वाला उठावच मिळत असे. पुढे प्राध्यापक झाल्यापासून ते पॅंट वापरू लागले व त्याच पोशाखात बहुधा गेली चाळीस वर्षे ते वावरत आहेत. अजूनही पोशाखात नीटनेटकेपणा आढळून येतो.

दादर येथील वक्तृत्वोत्तेजक सभा ह्या संस्थेचा मी एक पदाधिकारी होतो. त्यामुळे आम्हाला नेहमी वक्ते व अध्यक्ष यांची गरज भासत असे आणि ज्या ज्या वेळी अण्णांच्याकडे ह्या कामासाठी मी जात असे, त्या त्या वेळी अण्णा नकार देत नसत आणि आमच्या संस्थेची गरज मोठ्या आस्थेने पुरी करत असत. १९३५ साली किंग जॉर्ज हायस्कूलच्या (आता शिवाजी माध्यमिक विद्यालय) आवारात मुंबई व उपनगर साहित्य संमेलनाचे अधिवेशन कै. वि. स. खांडेकर यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते. त्या संमेलनाचे अण्णा हे एक कार्यवाह होते व मी त्या संमेलनाच्या कार्यकारी मंडळाचा एक कारकून म्हणून काम करत होतो. त्यामुळे अण्णांचा सहवास मला बरेच दिवस अत्यंत जवळून घडला व अण्णांच्या स्वभावाचे निरनिराळे पैलू मला पाहण्यास मिळाले. ह्या निकटच्या सहवासामुळेच प्रा. वि. ह. कुळकर्णी अशा तिऱ्हाईत नावाने अण्णांचा उल्लेख न करता आम्ही (मी व माझी पत्नी) त्यांचा उल्लेख नेहमी ‘अण्णा’ ह्या त्यांच्या घरगुती नावानेच करीत

असतो.

ह्या बाबतची योगायोगाने आणखीही एक गोष्ट घडली ती अशी. १९४० साली माझे लग्न झाले व माझी पत्नी ही पुढील शिक्षणासाठी रुईया कॉलेजमध्ये दाखल झाली. तेथे अण्णा हे इंग्रजी विषयाचे प्राध्यापक असल्याने माझी पत्नीही त्यांचेकडे इंग्रजी विषयाच्या निमित्ताने जाऊ येऊ लागली. पुढे ती कथा, कादंबऱ्या, नाटक, नाटिका लिहू लागली व त्याबद्दल अण्णांशी ती चर्चा करत असे. ह्यामुळे आमचे दोघांचेही अण्णांकडे वारंवार जाणे-येणे चालूच असे.

'मराठी गद्यलेखन शैलींचा उगम व विकास' ह्या विषयावर पीएच. डी. साठी मी प्रबंध लिहीत होतो. त्याचे हस्तलिखित सप्टेंबर– ऑक्टोबर– १९५१ मध्ये तयार झाले होते व ते टंकलेखनासाठी पाठवायचे होते. परंतु तत्पूर्वी एखाद्या जाणकाराने ते वाचावे म्हणजे त्यात राहिल्या असतील त्या त्रुटी दूर होतील, ह्या विचाराने माझ्या प्रबंधाचे हस्तलिखित अण्णांनी वाचावे म्हणून ते घेऊन मी त्यांचेकडे गेलो. त्या वेळी कॉलेजच्या परीक्षांचे पेपर काढणे, पेपर तपासणे अशी बरीच कामे अण्णांकडे होती. परंतु त्यातही वेळ काढून त्यांनी माझ्या प्रबंधाचे हस्तलिखित वाचावे असे जवळ-जवळ हक्काने सांगण्यासाठीच मी अण्णांकडे गेलो होतो व त्यांनीही ते आनंदाने मान्य केले. तसेच सांगितलेल्या वेळेत ते आपल्या सूचनांसह मला परत दिले. मराठी व इंग्रजी वाङ्मयाचा प्रदीर्घ व्यासंग असणाऱ्या अण्णां-सारख्या प्राध्यापकाने केलेल्या सूचनांसह मी माझ्या प्रबंधात आवश्यक त्या दुरुस्त्या केल्या व अगदी निःशंक मनाने प्रबंध टंकलेखकाकडे दिला. अशा प्रकारे स्वतः कष्ट घेऊन दुसऱ्यांची कामे तत्परतेने करणे हा अण्णांच्या स्वभावाचा स्थायी भावच आहे.

खिलाडू वृत्ती हा अण्णांच्या स्वभावाचा आणखी एक विशेष सांगता येईल आणि बहुधा ह्या वृत्तीमुळेच ते नेहमी आपला प्रसन्नपणा टिकवीत असावेत. पुष्कळ वर्षांपूर्वी एकदा एका दिवाळी अंकात कोणा साहित्यिकाला काय आवडते याची यादी दिली होती त्यात प्रा. वि. ह. कुळकर्णी ह्यांना 'नाकात बोलणे' आवडते असे लिहिले होते अण्णांनी ते पाहिलेले होते. काही दिवसांनी मी त्यांचेकडे गेलो असता त्यांचेकडे दुसरे एक साहित्यिक बसले होते. त्यांनी ह्याच संदर्भात अण्णांना विचारले असता, त्यांनी उत्तर दिले, "मला नाकांत बोलणे आवडते" अशा प्रकारे स्वतःवर विनोद करणे किंवा दुसऱ्याने केलेल्या विनोदावर न चिडणे हे फारच मोठ्या खिलाडू वृत्तीचेच द्योतक मानले पाहिजे.

गेले काही वर्षे अण्णा व मी मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयाच्या मराठी संशोधन मंडळावर काम करीत आहोत. त्यामुळे त्यांचा सहवास मला वारंवार घडत असतोच. लवकरच माझा कथासंग्रह प्रसिद्ध होणार आहे. त्याकरिता पुरस्काराने चार

शब्द अण्णांनी लिहून द्यावेत म्हणून त्यांना विनंती करण्यास मी अलीकडेच त्यांचे-कडे गेलो होतो व त्यांचेकडून ते मान्य करून घेऊन आलो. वस्तुत: अलीकडेच त्यांनी कै. अच्युत बळवंत कोल्हटकर व डॉ. बर्नार्ड शॉ. यांची चरित्रे लिहून हाता-वेगळी केली. व अन्य लेखनात ते गढलेले आहेत. तरीदेखील माझे काम ते करतीलच असे मी माझ्या प्रकाशकांना खात्रीपूर्वक सांगितले होते. कारण अण्णांना माझ्या-बद्दल तेवढा जिव्हाळा वाटतो अशी माझी खात्री होती. म्हणूनच मी ह्या पुर-स्काराच्या चार शब्दांविषयी अण्णांजवळ बोलताच त्यांनी ते काम करण्याचे मोठ्या आनंदाने मान्य केले. मराठी साहित्याच्या प्रांतात त्यांनी केलेल्या कार्यामुळे त्यांना योग्य तो मान दिला जातो व त्यांचे म्हणून एक स्थान मराठी साहित्यात आहे व त्यामुळे आपले जीवन कृतार्थ झाले अशी एक भावना अण्णांच्या ठिकाणी नेहमी दिसते. तेव्हा अशा प्रकारच्या ह्या प्रसन्न व्यक्तिमत्त्वाचा लाभ आम्हाला, समाजाला असाच दीर्घकाळ मिळो अशीच परमेश्वरचरणी प्रार्थना करावी असे वाटते.

* *

अनुक्रमणिका

# ' फिशपाँड ' चे अनभिषिक्त सम्राट

## शांता नेने

सन १९४६ ते १९५० या चार वर्षांत फर्स्ट इअरपासून ते सिनीअर बी. ए. पर्यंत मी प्रा. वि. ह. कुळकर्णी यांची विद्यार्थिनी होते. Lives of Johnson and Goldsmith, Modern English prose, As you like it, Much Aclo about Nothing, Hamlet, Tennyson इत्यादी पुस्तके सरांनी आम्हाला शिकवली. त्यावेळेला आम्हाला इंग्लीश शिकविणारे सर्वच प्रोफेसर चांगले शिकवीत. सरही चांगले शिकविणाऱ्यांपैकीच. परंतु आपल्या विद्यार्थ्यांना काय समजत नाही व ते कोठे चुका करतात हे जाणून सर शिकवीत असत व हेच त्यांच्या शिकविण्याचे वैशिष्ट्य होते. महत्त्वाची वाक्ये अधोरेखित करण्यास सांगताना सर " Heavily underline this sentence, very heavily underline this sentence." असे अॅक्शन करून म्हणत असत. तेव्हा आम्हाला फारच गंमत वाटत असे. ' Lives of Johnson and Goldsmith ' शिकवीत असताना तर काय, आधीच ती पुस्तके मुळी विनोदी, मग वर्गात शिकवीत असताना तर खूपच मजा यायची. आम्ही विद्यार्थी कधीही सरांचा तास चुकवीत नसू. सरांनी शिकविलेला भाग समजला नाही, असे कधीही झाले नाही. कधी गाडी लेट झाली व तास बुडलाच तर आम्हाला मोठी चुटपुट लागत असे. कल्याण, ठाणे अशा लांबच्या ठिकाणाहून आम्ही यत असू. पण सरांचा तास कधी चुकविला नाही.

विद्यार्थ्यांना समजेल असे शिकविणे, शिकवीत असताना त्यातील मजकुराप्रमाणे प्रासंगिक विनोद करणे या गोष्टींमुळे सरांचे शिकविणे कधी रूक्ष किंवा कंटाळवाणे झाले नाही.

एकदा सिनीअरच्या वर्षी सर वर्गात शिकवीत होते. त्या वेळेस अचानक वर्गातील लाईट गेले. ती आठवण कायम लक्षात राहिली आहे. तेव्हा सर म्हणाले होते की, " ' Light, Light, Light ' हे टेनिसनचे मरताना म्हटलेले शेवटचे शब्द होते. We are unpoetic souls, so we have no light."

गॅदरिंगमध्ये ' फिशपाँड 'चा कार्यक्रम म्हणजे सर्वांत मजेचा कार्यक्रम आणि ते सर्व ' फिशपांड ' वाचून दाखविणे म्हणजे मोठीच कामगिरी असे. सर ते अतिशय

खोचकपणे व साभिनय वाचून दाखवीत असत. त्यामुळे त्यातील मार्मिकता अगदी चांगल्या रीतीने प्रतीत होत असे. एकदा फिशपांडचा सर्व कार्यक्रम आटोपल्यावर कार्यकारी विद्यार्थ्यांनाच सरांनी 'फिशपांड' दिला. ते दिवस रेशनिंगचे होते. त्या विद्यार्थ्यांमध्ये एक अतिशय जाडा होता व दुसरा अगदी बारीक होता. त्या दोघांना सरांनी 'Cause and effect of rationing' असा फिशपांड देताच मोठा हशा पिकला होता. त्यामुळे 'फिशपांड' वाचण्यास, 'व्ही. एच'च पाहिजेत असा सर्वांचा आग्रह असे.

काही वर्षांपूर्वी सरांच्या पत्नीच्या व बंधूंच्या निधनाची कटू बातमी माझ्या वाचनात आली होती. त्या वेळेस, "आम्ही मोठी माणसे, एवढो लाइनीत नंबर लावून उभी असताना, ही मागील माणसे (वयाने लहान) अधीमधी कशी घुसतात" असे सरांनी म्हटलेले वाचले होते.

विनोदाच्या आधाराने कठीण पुस्तकेही सोपी करून शिकविण्याची प्रा. कुळकर्णी यांची ताकद विद्यार्थी-दशेत अनुभवली होती. पण विनोदाच्या आवरणाखाली स्वतःच्या आयुष्यातले करुण प्रसंग पचविण्याची सरांची ताकद पाहिली व वाटले 'बोले तैसा चाले, त्याची वंदावी पाऊले."

* *

अनुक्रमणिका

# The greatest things are the Simplest

## श्रीधर कुळकर्णी

प्रा. विठ्ठल हरी कुळकर्णी हे माझे वडील चुलत भाऊ. आमचे पणजोबा एक. आम्ही प्रा. कुळकर्णी यांना अण्णा म्हणतो. कोकणात आमचे घर एकाच चौथऱ्यावर होते. कशेळीला (ता. राजापूर) मी लहानपणी त्यांना लाठी फिरवताना व टेनिसबॉलने क्रिकेट खेळत असताना पाहिल्याचे आठवते. त्यांचा माझा गुरू–शिष्य म्हणून संबंध १९४४ ला इंटरच्या अभ्यासापासून ते ५२ सालापर्यंत एम. ए. च्या अभ्यासाच्या निमित्ताने आला. दादरच्या जागेत ठराविक सोफ्यावर बसून ८ वर्षे मी त्यांच्या सहवासात अभ्यासाच्या निमित्ताने आलो. मी कधी स्वयंपाकघरात गेलो नाही. कारण अण्णा घरी नसले की ते येईपर्यंत कै. सौ. इंदिरावहिनी हातातले काम सोडून आमचे आदरातिथ्य करीत असत. त्यांची मुले चि. सौ. इरावती, अशोक, हेमंत व जयन्त ही सर्व हुशार असून माझ्याशी आदराने बोलत असत.

माझे चुलत भाऊ कै. श्रीधर बाळाजी कुळकर्णी (जनता क्लासवाले व कॉंग्रेस वर्कर) व मी एम. ए. चा अभ्यास अण्णांजवळ बरोबर शिकत होतो. ४५ साली खालसा कॉलेजच्या मराठी वाङ्मय मंडळात संगीताची चढाओढ झाली. परीक्षक कै. ॲडव्होकेट सुशील कवळेकर होते. या २०–२५ विद्यार्थी, विद्यार्थिनींच्या चढाओढीत मला पहिल्या क्रमांकाचे बक्षीस मिळाले. आमचे दोघांचेही नाव श्रीधर असल्याने कोण आले हे ताबडतोब समजावे म्हणून अण्णा मला 'संगीत श्रीधर' व त्याला 'कॉंग्रेस श्रीधर' असे म्हणत असत.

प्रा. वि. ह. कुळकर्णी यांचे वैशिष्ट्य असे की स्वतःच्या उत्तम गुणसंचयाला ते महत्त्व देत नाहीत. "माझ्या चरित्रात लिहिण्यासारखे काही नाही" असे ते स्वतःच म्हणतात. साहित्याचार्य कै. नरसिंह चिंतामण केळकर, महामहोपाध्याय कै. पांडुरंग वामन काणे, कै. प्रो. न. र. फाटक, कै. वि. स. खांडेकर, ग. त्र्यं. माडखोलकर, अनंत काणेकर, आचार्य भागवत, अशा मोठ्या व्यक्तींनी ज्यांचे कौतुक केले तो व्यक्ती सामान्य असू शकणार नाही. पण वरील व्यक्तींप्रमाणे त्यांना तितकीशी प्रसिद्धीही मिळाली नाही. मग त्यांचे मोठेपण कशात आहे असा प्रश्न उभा राहतो. त्यांच्या सहवासात येणाऱ्या सर्व मंडळींना, विद्यार्थीवर्गाला ते जाण-

अनुक्रमणिका

वते. पण त्यांनी स्वतःचे गुण सांगितल्याचे माझ्या ऐकिवात नाही. विशेष बुद्धिमान व मेहनती, सखोल अभ्यास, रुईया कॉलेजमध्ये इंग्लीश डिपार्टमेंटचे ते मुख्य होते. इंग्रजी, मराठी व संस्कृत विषयाचे नामवंत शिक्षक, विद्यार्थ्यांत प्रिय, वक्ते व उत्तम टीकाकार, लेखनाची खरी आवड, हे सर्व सांभाळून त्यांनी केलेला संसार, सभ्य, शालीन व सौजन्यशील व्यक्तित्व, ह्या सर्व गोष्टींचा परिणाम त्यांच्या विद्यार्थ्यांवर व त्यांच्या सहवासात येणाऱ्या प्रत्येक सभ्य व्यक्तीवर झालेला आहे.

तसेच त्यांना जो पैसा मिळाला तो मानाने मिळाला. पण पैसाच मिळविणे हेही त्यांचे ध्येय नसावे. 'ओळखाण सोनानी खाण !' अशी एक गुजराथी म्हण आहे. त्यांचे विद्यार्थी मिनिस्टर पण आहेत. पण स्वतःकरता त्यांनी या गोष्टीचा फायदा उठवण्याकरता कधी उपयोग केल्याचे मला तरी माहीत नाही. उलट दुसऱ्याच्या मदतीकरता त्यांनी शब्द टाकलेले आहेत. काही वर्षे ते जे. पी. पण होते. या काळातसुद्धा त्यांनी अनेकांना मदत केली आहे. त्यांना आलेल्या पत्रांची उत्तरे ते स्वतः लिहीत. या वयातही हा नियम ते तंतोतंत पाळत आलेले आहेत.

त्यांच्या पाव्हण्यांची व नातेवाईक व मित्रवर्ग व विद्यार्थी यांची रीघ घरी सतत लागत असायची. असे असूनही समोरील व्यक्तीला 'वेळ नाही' ही सबब अगर हातातल्या कामात व्यत्यय आला म्हणून त्यांचा संताप झालेला नाही. हे सर्व स्वतःची तब्येत सांभाळून कसे करत असत असा प्रश्न उभा राहतो ! मला वाटते, 'अर्नाल्ड बेनेलेच्या' उपदेशाप्रमाणे फावल्या वेळेचा उपयोग करण्याची कला त्यांनी तंतोतंत साध्य केली होती. मी तरी त्यांना कधी रिकामे बसलेले पाहिले नाही.

It is better to do the idlest thing in the world than to sit idle for half an hour.

थोडक्यात म्हणजे आयुष्यातला त्यांचा एक क्षणही त्यांनी फुकट घालविलेला नाही. पण त्यापेक्षा त्यांचे मोठेपण त्यांनी आपले आरोग्य सांभाळण्यात दाखविले. 'Health is wealth' हे त्यांचे ध्येय असावे. मी अण्णांना कधीही आजारी पाहिलेले नाही. त्यांनी सर्व दात एकदम काढून नवे बसविले त्या वेळी त्यांना त्रास झाला. पण त्या त्रासाची त्यांच्या मनाची पूर्वतयारी होतीच. त्यांचा आहार हा कमालीचा नियमित होता. खाण्यावरचा म्हणजे जिभेवरचा ताबा त्यांनी आपल्या तरुणवयात सांभाळला हे कठीण होते. तरुणपणी माणूस खाण्यावर जगतो. तर म्हातारपणी तो जगण्याकरिता खातो. अशी एक म्हण आहे की, 'मनुष्य जे खातो त्यातल्या अर्ध्यावर तो जगतो व उरलेल्या अर्ध्यावर डॉक्टर जगतात. अण्णांनी स्वतःच्या आरोग्याकरिता डॉक्टरची भर केली नसावी. सबंध

आयुष्यभर जिभेवर ताबा ठेवला व आपले अमोल आयुष्य आजारात न घालवता सत्कारणी लावले. मतभेद झाला तरी तावातावाने कुणाशी भांडताना मी त्यांना कधी पाहिलेले नाही. मनाचा तोल जावा असा दुसरा वागला तरी त्यांनी शब्दात अगर वागण्यात आपला तोल जाऊ दिला नाही. 'फावल्या वेळचा उपयोग' व 'जिभेवरचा ताबा' हेही त्यांचे अलौकिक गुण होते.

"The greatest things are the simplest." अण्णांच्या या साधेपणा-मुळेच त्यांनी हा मोठेपणा कमावला आहे, हेच खरे. त्यांच्या चाहत्यांच्या हृदयात ते कायमचे ठाण मांडून बसलेले आहेत. ही गोष्ट साधी नाही. त्यांना दीर्घायुरारोग्य लाभो व त्यांच्या मनातील विविध विषयांवरील लिखाण करण्याचे त्यांचे विचार कृतीत उतरोत अशी त्या दयाळू परमेश्वराजवळ मी प्रार्थना करतो.

* *

# ' चायनीज फिलॉसॉफर '

## सौ. आशा श्रीराम परचुरे

प्रा. वि. ह. कुळकर्णी...हे म्हणजे फारच ओपचारिक झाले. तर ती. अण्णा हे आमचे रुईया कॉलेजमधले इंग्लीशचे प्राध्यापक. पण विद्यार्थिनी आणि शिक्षक हे नाते नंतर काहीसे बाजूलाच पडले नि अण्णा हे आमचे अगदी जवळचे नात्यातले— काका-मामासारखेच— वाटायला लागले. ' सर ' असे फारच थोडे दिवस मी त्यांना म्हटले असेल. ' अण्णा ' असेच मी त्यांना म्हणायला लागले. कारण अण्णांची नि माझ्या यजमानांची जुनी ओळख दोन्ही घरे अगदी जवळ जवळ. आमच्या घरापासून चार घरं टाकून अण्णांचे घर. एकमेकांच्या घरी जाणेयेणेही होते. नाहीतर मुंबईसारख्या शहरात प्रत्येकजण आपापल्या उद्योगात. घरगुती संबंध थोडेच येतात घर जवळ असूनही. मी कॉलेजमध्ये गेल्यावर आमचा घरोबा आणखीनच वाढला. १९४२ साली मी फर्स्ट इयरला रुईयात नाव घातले. लग्नानंतर शिक्षण म्हणजे तपश्चर्याच. तशात आमची परिस्थिती अगदीच बेताची...चार माणसांचे जेवण-खाण... अगदी भाजी आणण्यापासून सगळी कामे घरात करून शिक्षण करायचे म्हणजे मोठे दिव्यच. अभ्यासाला वेळच मिळत नसे.

१९४२ साली ' भारत छोडो ' चळवळ सुरू झाली. सारखे हरताळ. मग ओघानेच कॉलेज बंद. सर पिरियड्स कसे घेणार ? पोर्शन पूर्ण कसा करणार ? आमच्यावेळी फक्त एकच स्कॉलरशिप होती. पहिल्या नंबरला. आमची फी भरण्याची ऐपत नव्हती. म्हणजे स्कॉलरशिप मिळवायलाच हवी. वर्गातला माझा पहिला नंबर कधीच चुकला नाही— अगदी बिगारीपासून मॅट्रिकपर्यंत. एफ. वाय.ला गणित घेतले होते, स्कोअरिंग सबजेक्ट म्हणून. त्यात काही डिफिकल्टीज होत्या. ह्यांना त्या सांगितल्या. पण इंग्लीशच्याही माझ्या काही डिफिकल्टीज होत्या. प्रश्न पडला काय करावे. हे म्हणाले, " आपण अण्णांकडे जाऊ या." अण्णांनी आमचे अगदी मनापासून स्वागत केले अन् सगळ्या डिफिकल्टीज सोडवल्या. मग मला आश्चर्य वाटले. हे इतके सगळे सोपे होते तर एकूण. पण खरे तर ते सोपे असण्यापेक्षा अण्णांनी ते सोपे करून टाकले होते. माझा इंग्लीशचा पेपर मस्त गेला. पहिला नंबर, स्कॉलरशिप वगैरे वगैरे सर्व काही पदरात पडले— अगदी ओघानेच. इंटरला

अनुक्रमणिका

गेले नि पुन्हा मार्गात अडचणी निर्माण झाल्या. पण पहिला नंबर मिळालाच. त्याचे बरेचसे क्रेडीट अण्णांना होते. त्यांच्या मार्गदर्शनाशिवाय मला नंबर मिळवणे कठीण होते. तेव्हापासून आजतागायत मला अण्णांचे मार्गदर्शन मिळत आले आहे.

अगदी क्लिष्ट विषयही सोपा करून हसतखेळत शिकवण्याची हातोटी अण्णांना चांगलीच साधली होती. त्यामुळे आम्हा विद्यार्थ्यांत ते सॉलीड पॉप्युलर होते. थर्ड क्लासचा विद्यार्थी पास व्हावा आणि फर्स्ट क्लासच्या विद्यार्थ्याला डिस्टिंक्शन मिळावं असे ते शिकवत. शिकवताना आवश्यक तिथं 'इम्पॉर्टंट' काय ते सांगत. IMP अन् V. IMP असे आमच्या पुस्तकात ठिकठिकाणी असायचे. 'अंडरलाईन धिस,– दॅट' असे सारखे चालूच असे. गॅदरिंगच्या वेळी मुलांनी त्यांना 'अंडरलाईन एव्हरी लाईन' असा फिशपॉंड दिला होता. सेक्रेटरीने फिशपॉंड वाचून दाखवल्यावर प्रेक्षकात हास्याची एकच लाट उसळली. विद्यार्थ्यांनी हास्याचे फवारे उडवत जोरजोरात 'स्टँपिंग' केले. अण्णांनी फिशपॉंड स्वीकारला. हसत ते म्हणाले "प्लीज अंडरलाईन द अंडरलाईन्ड" अन् विद्यार्थ्यांनी जोरदार स्टँपिंग करून अण्णांच्या मस्त मिस्किल विनोदाला दाद दिली.

अण्णांना चविष्ट, खमंग पदार्थ खाण्याची मनापासून आवड आहे. अळूवडी, मिसळ, दहीवडा, फ्रूट सॅलड वगैरे पदार्थ करून मी त्यांना अधूनमधून बोलावते. त्यांचे दोन मुलगे– अशोक, हेमंत– अमेरिकेत असतात. पण ते इथे आले की, आम्हाला भेटल्यावाचून जात नाहीत. ते आमच्याकडे आले की मी आवर्जून असे पदार्थ करते. एकदा तर काय गंमत झाली. हेमंतला माझ्याकडे येण्याचे मी निमंत्रण देऊन आले. तो म्हणाला, "आशाताई, सवडीप्रमाणे नक्की येतो. पण फार पदार्थ करू नका. मी फक्त चहा घेईन. रोज कुठे ना कुठे पाहुणचार होतो. जाताना पोट बिघडेल. अण्णा तुम्हाला आमचा येण्याचा दिवस सांगतील." अण्णा ठरल्याप्रमाणे निरोप घेऊन आले, "हेमंत उद्या येतोय." मी म्हटले, "फक्त चहाच करायचा न ?" अण्णा मिस्किल हसले व नेहमीप्रमाणेच म्हणाले, "हो, पण अळुवडी, मिसळ नि फ्रूटसॅलडचं तेवढं लक्षात आहे ना ?"

एकदा अशोक भारतात आला असताना तो नि अण्णा मला रस्त्यात भेटले. अशोक चार-आठ दिवसांत परत जाणार होता अमेरिकेला. मी म्हटले, "अशोक, या वेळी तू माझ्याकडं यायचं विसरलास ? याद राख येऊन गेला नाहीस तर !" दुसऱ्या दिवशी तो आणि अण्णा आले. मी म्हटले, "बरं, विसरला नाहीत !" अण्णा म्हणाले, "काल घरी गेल्या गेल्या डायरीत नोंद करून ठेवली होती. याद राखकडे उद्या नक्की जायचं." आम्हा सगळ्यांनाच मनापासून हसू आले.

अण्णांचा विनोद हा असा मिस्किल असतो. ते कधीही कुणाला लागेलसं, अपमानकारक बोलत नाहीत. त्यांच्या बोलण्यात कधीच अहम् नसतो. केव्हाही गेले

तरी सहज हसत खेळत गप्पा होतात. अगदी घरगुती विषयमुद्धा निघतात. त्यांचे बोलणे, शब्द अगदी साधे असतात. पण बोलण्याची पद्धत मिस्किल, गमतीदार आहे. त्या साध्या शब्दात, सहज बोलण्यात एक गंमत वाटते. सगळे वातावरणच असे खेळकर असते की तास दोन तास कसे भुर्रकन जातात ते कळतही नाही. पूर्वी सौ. इंदिराबाई आमच्या गप्पात मनापासून भाग घेत. चहाचा कप पुढे आला नाही असे कधी घडलेच नाही. या गप्पांबरोबर नि चहाबरोबर तोंडात टाकायलाही बशीत काहीतरी घालून आमच्यापुढे ठेवलेले असे.

'सिटिझन ऑफ द वर्ल्ड' अण्णांनी खूपच छान शिकवले. अगदी रंगून. त्यातला तो चायनिज फिलॉसॉफर डोळ्यासमोर उभा राहतो. केव्हा, कुणी, कसे, कोण जाणे पण त्यांना 'चायनीज फिलॉसॉफर' हे नाव ठेवले अन् मग पुढे गमतीने मुले त्यांना चायनीज फिलॉसॉफरच म्हणू लागली.

आज या वयालाही हा फिलॉसॉफर आपल्या लेखन-वाचनाच्या व्यासंगात गढलेला असतो. मध्यंतरी अण्णांनी अच्युत बळवंतांच्यावर पुस्तक लिहिले. नुकतेच त्यांचे 'शॉ' वरचे पुस्तक प्रसिद्ध झाले आहे अन् आता ते ग. त्र्यं. माडखोल-करांच्यावर पुस्तक लिहीत आहेत. त्यांचा हा हुरूप आम्हाला केव्हाही स्फूर्ति-दायकच आहे. अशा या आमच्या 'चायनीज फिलॉसॉफर'ना आपला व्यासंग चालू ठेवायला दीर्घायुरारोग्य लाभो हीच माझी सदिच्छा.

* *

# ' पेशंट ' अण्णा

## डॉ. विठ्ठल प्रभू

वास्तविक प्रो. कुळकर्णी यांची व माझी ओळख होण्याचे तसे काही कारण नव्हते. म्हणजे मी त्यांचा विद्यार्थी नव्हतो किंवा साहित्यिकही नव्हतो आणि त्यांची प्रकृतीही धडधाकट होती. तरीही आमची ओळख झाली, हा विधिलिखित संकेत असावा. तसा मी त्यांना अनेक वर्षे ओळखत होतो. पण ते मला ओळखत नव्हते. त्या मंतरलेल्या दिवसात रविवारी संध्याकाळी टी. व्ही.भोवती गर्दी व्हायच्या ऐवजी त्या काळी सभासंमेलनाला गर्दी व्हायची. धर्मेन्द्र, हेमामालिनीऐवजी त्या काळी अत्रे, खांडेकर, फडके, माडखोलकर हे आम्हाला ' हीरो ' वाटायचे. या हीरोंची ओळख व्यासपीठावर करून देताना मी. प्रो. कुळकर्णींना अनेकदा पाहिले होते. नाटक-सिनेमांची संख्यात्मक वाढ झाल्यापासून अशा सभांना ओहोटी लागली व प्रोफेसरांचे दर्शन दुर्मिळ झाले. तरीही ते वर्तमानपत्रातून किंवा मासिकातून लेखांद्वारे दिसत. अशी पंधरा-वीस वर्षे निघून गेली. या दरम्यान प्रो. कुळकर्णी यांचे वय तितक्याच वर्षांनी वाढले आहे याची कल्पना नव्हती. कारण त्यांचे लेख वाचल्यावर त्यांचे वय सुमारे ४५ ते ५० वर्षांचे असावे असाच कुणीही अंदाज बांधला असता. पण ते सत्तरीच्या पुढे गेलेले होते.

दरम्यान योगायोग घडला. मी ' नवशक्ती ' दैनिकात माझे गुरुवर्य कवी प्रफुल्लदत्त यांच्याविषयी एक परिचयात्मक लेख लिहिला. प्रो. कुळकर्णींनी तो वाचला. त्यांना तो आवडला असावा. लगेच त्यांनी माझी ओळख नसून देखील एक स्तुतीपर खाजगी पत्र पाठवले. इतकेच नव्हे तर ' नवशक्तीत ' तशाच प्रकारचे पत्र देखील प्रसिद्ध केले व ते अग्रलेखाच्या शेजारीच छापण्यात आले. माझा लेख तसा काही अव्वल दर्जाचा होता असे नसतानादेखील दुसऱ्याचे चांगले असे म्हणणारा हा मराठी माणूस काहीतरी आगळधा वेगळधा प्रकृतीचा असावा अशी माझी ठाम समजूत झाली व प्रोफेसरांची ओळख करून घेण्याची मनात मोठी जिज्ञासा निर्माण झाली.

मी कवी प्रफुल्लदत्तांचा हात धरून् प्रो. कुळकर्णी यांच्या घरी गेलो. तो संक्रातीचा दिवस होता. थोर साहित्यिक, नट, पुढारी यांच्याकडे गेलो असता,

'कशाला ही संक्रांत आली ?' अशा प्रकारची प्रतिक्रिया त्यांच्या व त्यांच्या नातेवाईकांच्या चेहऱ्यावर मी अनेकदा पाहिलेली असल्याने मी थोडासा अंग चोरूनच बसलो. पण इथे प्रकार निराळाच दिसला. पहिल्याच भेटीत छान आगत स्वागत झाले. प्रोफेसरांच्या सूनबाईंनी चवक कमरेत वाकून नमस्कार केला. मम्मी-डॅडी संस्कृतीच्या दिवसात ही बाळबोध पद्धत मी बरेच वर्षांनी पाहत होतो. तेव्हा अवघडल्यासारखे वाटेनासे होऊन ऐसपैस बसलो. येताना वाटले, 'इथे कुठेतरी धागे जुळताहेत खरे !' पण त्यांच्या व माझ्या वयात पाव शतकाचा फरक होता, म्हणजे 'जनरेशन गॅप' आलीच ! तरीही आमचे नाते जुळले, मैत्री जमली– षड्जाची पंचमाशी होते तशी

औषधांची प्रिस्क्रिप्शन्स वर्षानुवर्षे लिहून कंटाळा यायला लागला तेव्हा मी साहित्याकडे वळलो. पण साहित्य लिहिणे हे प्रिस्क्रिप्शन लिहिण्याइतके सोपे थोडेच आहे ? साहित्यात 'मौलिक' भर घालण्याच्या हेतूने मी हातात लेखणी घेऊन बसलो खरा; पण ती पुढे काही सरकेना. तेव्हा डॉ. ख्रिश्चन बर्नार्डचे उद्गार आठवले, "कुणाच्या तरी खांद्यावर बसल्याखेरीज आपण उंच होत नाही." माझ्याही मनात आले, प्रो. वि. ह. कुळकर्ण्यांसारख्या विद्वानांच्या खांद्याचा आधार घ्यावा. त्यांना नाही आवडले तर आमच्या साहित्याला 'खांदा' देखील देतील याची खात्री वाटल्यावरून मी त्यांच्या घरी माझे लेख वाचून दाखवण्यासाठी वारंवार जाऊ लागलो. प्रोफेसर स्थितप्रज्ञ असावेत. कारण त्यांनी मी लिहिलेले वैद्यकीय विषयावरील 'खरुज ते सेक्स' अशा सर्व प्रकारचे लेख बिनबोभाट वाचले. प्रथम मला वाटले, ऱ्हस्व, दीर्घ, उपमा, उत्प्रेक्षा इत्यादी व्याकरणाच्या चुका काढून प्रोफेसर मला हैराण करतील. ते एक उत्तम शिक्षक असल्याचे ऐकिवात होते. पण अनुभव निराळाच आला. ज्या काही चुका होत्या त्या दुरुस्त करूनच हस्तलिखित ते परत देत. मग सांगत, "एक मिनिट थांबा. मला काही प्रश्न विचारायचे आहेत." पुन्हा माझ्या मनात येई, "झाले. आता प्रोफेसर माझी परीक्षा घेऊन पुन्हा हैराण करणार; मार्क देणार, नापास करणार !" उगीचच हे परीक्षेचे दुष्टचक्र मनात डोकावून जाई. पण तसे न करता प्रो. कुळकर्णी वैद्यकीय विषयावर शांतपणे बातचीत करीत, आपल्या शंकांचे निरसन करून घेत. यावरून ते अशा रूक्ष विषयाच्या लेखनातील शब्दनशब्द वाचीत असत, याची खात्री पटली. बातचीत संपली की ते सांगत, "आता तुम्ही जाऊ शकता." याचा अर्थ "तुम्ही चालते व्हा" असा कुणी केला तर ते चूक ठरेल. त्यांच्या शब्दांत इतकी मार्दवता असते की वरील वाक्याचा अर्थ, "तुम्ही आता जायला हरकत नाही व पुन्हा केव्हाही यायलाही हरकत नाही." असाच कुणीही घ्यावा. त्यामुळे मी त्यांच्या घरी त्यांच्या सोयीपेक्षा माझ्या सोयीनुसार केव्हाही जात असे. मला त्यांच्या कपाळावर आठ्या

पाहायच्या होत्या. ते रागावतात कसे हे पाहायचे होते पण ते अजून जमलेले नाही. दिलेली अपॉइन्टमेन्ट मुद्दाम चुकविली की मग दुसऱ्या दिवशी त्यांचाच फोन येतो. "तुम्ही काल तुमच्या कामासाठी येणार होतात, आला नाहीत. तेव्हा आज येऊन जा." म्हणजे आमच्या कामाची यांना अधिक काळजी ! लोक समजतात तसे प्रोफेसर विसरभोळे नसतात याची ही प्रचीती. तसेच माझे आकाशवाणीवरचे कार्यक्रम असोत किंवा मी भाग घेतलेला एखादा समारंभ असो, प्रोफेसरांचा फोन ठरलेला. "कालचा समारंभ कसा झाला ?" अशी पृच्छा प्रथम व्हायची. अहो, चांगुलपणाला काही सीमा ! असे पदरमोड करून चांगुलपणा दाखविणारे आज औषधाला देखील सापडायचे नाहीत ! तेव्हापासून मी ठरवले, प्रो. वि ह. कुळकर्णी यांना प्रोफेसरसाहेब अशी हाक न मारता घरात त्यांना अण्णा म्हणतात तसे म्हणायचे.

अण्णा सहसा आजारी पडत नाहीत. एकदा मात्र चांगलेच आजारी पडले. मेंदूच्या रक्तप्रवाहात व्यत्यय येतो, त्यामुळे चक्कर येते. तसे पाहिले तर ही बाब वयोमानानुसार नैसर्गिक असते. पण अण्णांचे म्हणणे, "माझ्या वडीलबंधूंची प्रकृती चांगली असताना मलाच हा त्रास कसा ?" यावर मी निरुत्तर होतो. अण्णा 'सिरियस' असल्याची वार्ता मुंबईभर पसरते. भेटायला येणाऱ्यांची रीघ लागते. अण्णा तर आरामात कॉटवर बसून एका बाजूला मासिक किंवा पुस्तक व दुसऱ्या बाजूला भेटायला आलेल्या व्यक्तींचा समाचार घेतात. आजारपणातही त्यांची विनोदबुद्धी जागी असते. ते म्हणतात, "अहो, डॉक्टरांनी लिहिलेले लांबलचक प्रिस्क्रिप्शन वाचूनच मी आजारी पडलो." अण्णांना औषधे घेण्याचा फार कंटाळा. प्रत्येक वेळी मला विचारतील, "सायक्लोस्पाजमॉल व कॉम्प्लामिना गोळ्या किती घ्यायच्या ?" यातील एक तरी गोळीचे प्रमाण कमी होईल या आशेने ते पुन्हा पुन्हा विचारतात. तरीही ही सांगितलेली औषधे वेळेवर घेण्यात ते कुचराई करीत नाहीत. एकदा औषधांचे वेळापत्रक माझ्या हातात देत म्हणाले, "हे वाचा, या वेळापत्रकानुसार औषधे घेत असताना मला इतर काही करायला वेळच मिळत नाही. संपूर्ण दिवस औषधे घेण्यातच जातो." आजाराकडे विनोदबुद्धीने पाहणारे अण्णांसारखे पेशंट विरळा आणि त्यांच्या आजारपणात त्यांची मुले परदेशात असताना सूनबाई सौ. वीणा हिने धैर्याने व आस्थेने जी अण्णांची शुश्रूषा केली तिलाही तोड नाही.

आज अण्णांचे व माझे नाते डॉक्टर-पेशंटसारखे उरले नाही. कारण असले नाते माणूस आडवा झाला की सुरू होते. आणि तो पुन्हा उभा राहिला व बिल दिले की संपते. हे संपणारे नाते मला पसंत नाही. म्हणूनच मी अण्णांना स्नेही मानतो. कधी कधी मी अण्णांना सांगतो, "अण्णा, आज भ्रमंतीला जायचे." मग

कधी गिरगाव, कधी चौपाटी, कधी राणीचा बाग आम्ही फिरून येतो. महाराष्ट्रातील एकेकाळचे सांस्कृतिक केंद्र म्हणजे गिरगांव. जगन्नाथाची चाळ, शांतारामाची चाळ, माडखोलकरांचे घर, हिराबाई पेडणेकरांचे घर, टिळकांच्या सभेची जागा ही सर्व जुन्या मुंबईची माहिती व महती अण्णांच्या तोंडून ऐकावी. पन्नास-साठ वर्षे मागे गेल्याचा भास होतो. अण्णांना मराठी किंवा इंग्रजी साहित्याबद्दल काहीही विचारावे. खडा न् खडा माहिती मिळते. अण्णांच्या पुस्तकांचा संग्रहही दांडगा आहे. सर्व विषयांवरची पुस्तके त्यांच्याजवळ सापडतील. ऐन उमेदीत असताना त्यांच्या वाचनात जे काही ' इंटरेस्टिंग ' आले ते सर्व त्यांनी आपल्या वहीत टिपून ठेवले आहे. अशा त्यांच्याजवळ अनेक वह्या आहेत. ह्या वह्या अत्यंत रंजक व विविध माहितींनी भरगच्च भरल्या आहेत. त्यात ५० वर्षांपूर्वीचे बाजारभाव सापडतील तसेच ग्रेटा गार्बोचे सेक्सचे अनुभवदेखील मिळतील.

ईश्वराविषयी अण्णांना विचारले तर ते म्हणतात, "मी अज्ञेयवादी आहे. ईश्वर आहे किंवा नाही हे मला माहीत नाही." श्रद्धावान व्यक्तीवर ते टीकाही करीत नाहीत. ईश्वराविषयीच्या वादविवादात ते शिरू इच्छित नाहीत. पण श्रद्धावान लोकांच्या आंधळ्या श्रद्धेचे मात्र त्यांना हसू येते. ' ज्ञानेश्वरी 'चे पारायण चाललेले असताना भक्त मंडळी "ओम नमोजी, ओम नमोजी, आद्या, आद्या आद्या; वेद वेद वेद " असे ज्ञानेश्वरीचे हजारो तुकडे पाडून तिचा अर्थ न समजता केवळ पुण्य पदरात पाडण्याच्या हेतूने पठण करतात तेव्हा अण्णा खदखदून हसतात. संत मंडळी व त्यांचे वाङ्मय याविषयी अण्णांच्या मनात नितांत आदर आहे. पण अंधश्रद्धा त्यांना मान्य नाही.

अण्णा म्हणजे ' कॉकटेल.' त्यांच्या बोलण्या वागण्यात वि. का. राजवाड्यांचा निर्विकारपणा आहे, फडक्यांचे लालित्य आहे, अत्र्यांचा विनोद व पु. लं. चा मिस्किलपणा आहे तसेच विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे पांडित्यही आहे. म्हणूनच त्यांच्या सहवासातील आनंद कॉकटेलसारखा अप्रतिम असतो. ' तिळा उघड ' म्हटल्यावर अलिबाबाला झाला होता तसा आनंद त्यांच्या श्रोत्याला मिळतो. असा हा आनंद आम्हा तुम्हा सर्वांना सतत लुटायला मिळावा म्हणून, "अण्णा, जीवेत शरदः शतम्."

* *

# मंतरलेले दिवस

## प्रा. अविनाश केळकर

मराठीतील ज्येष्ठ लेखक व वक्ते प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्याशी माझा परिचय झाला त्याला आता पुरी तीन तपे झाली आहेत. मी शालान्त परीक्षा १९४६ साली उत्तीर्ण झालो. महाविद्यालयीन शिक्षण घेण्याची महत्त्वाकांक्षा मनात निर्माण झाली होती. परंतु कौटुंबिक परिस्थिती सर्वस्वी प्रतिकूल होती. वाङ्मयाची आवड शाळेत असतानाच निर्माण झालेली होती. त्या काळात (१९४२–१९४६) मुंबईत वाङ्मयीन चर्चा बऱ्याच होत. माझ्यासारख्या शाळकरी मुलाला त्या चर्चांतले काही कळत होते असे मुळीच म्हणता येणार नाही. तथापि त्या चर्चा ऐकण्यासाठी मी आवर्जून उपस्थित राहत असे. सर्वश्री प्रभाकर पाध्ये, अनंत काणेकर, वा. ल. कुलकर्णी, वि. ह. कुळकर्णी, डॉ. ग. य. चिटणीस, इ. व्यक्ती त्या चर्चांतून भाग घेत. विठ्ठलरावांना मी त्या काळात केव्हातरी पाहिल्याचे स्मरते.

मी १९४६ साली मुंबई मराठी साहित्य संघाच्या वाङ्मयीन परीक्षांना बसायचे ठरविले. त्या काळात मी एका शासकीय कार्यालयात कारकुनी करत होतो. त्या वेळी (१९४६–४७) साहित्य संघाची स्वतःची वास्तू नव्हती. संघाचे कार्यालय आंबेवाडीतील सरस्वती हायस्कूलमध्ये असे. त्याच जागेत महाराष्ट्र साहित्य परिषदेचे 'साहित्य प्राज्ञ' व 'साहित्य विशारद' ह्या वाङ्मयीन वर्गांचे अध्यापन चाले. त्या वर्गांचे संचालन प्रथमपासून तो आजतागायत वा. रा. ढवळे यांच्याकडे आहे. स्वतः ढवळे अर्वाचीन कविता शिकवीत. जोडीला सर्वश्री वि. ह. कुळकर्णी, वा. ल. कुलकर्णी, रा. भि. जोशी, प्रभाकर पाध्ये, र. वि. हेरवाडकर, ना. द. नांदुर्डीकर, खं. सा. दौंडकर इ. माणसे होती. त्या दोन वर्षांत मी विठ्ठल-रावांना जवळून पाहिले. त्यांच्या अध्यापन-कौशल्याचे फार मोठे संस्कार माझ्यावर झाले. त्या दोन वर्षांत विठ्ठलरावांनी आम्हाला श्रीपाद कृष्णांची 'दुटप्पी की दुहेरी', गडकऱ्यांचे 'एकच प्याला' इ. पुस्तके शिकवली.

त्या दोन वर्षांचा कालखंड हा माझ्या आयुष्यातील मंतरलेला कालखंड आहे. त्या वाङ्मयीन वर्गांना विद्यार्थ्यांची उपस्थिती फारच चांगली असे. आजच्या-प्रमाणे तो धकाधकीचा आणि जीवघेण्या महागाईचा काळ नव्हता. तसेच एकट्या

खालसा कॉलेजचा अपवाद केला तर त्या काळात मुंबईत नोकरी करणाऱ्या विद्यार्थ्यांना सकाळची कॉलेजे सुरू झालेली नव्हती. १९४७ साली सिध्दार्थ कॉलेज सुरू झाले. मागाहून इतर अनेक सकाळची महाविद्यालये सुरू झाली. त्यामुळे पुढे या वाङ्मयीन वर्गांना विद्यार्थ्यांची संख्या अगदी मर्यादित झाली. वस्तुत: या परीक्षांना बसून पदवी संपादन करणाऱ्या व्यक्तींना कोणताही आर्थिक लाभ होत नव्हता. आजही ह्या पदव्यांना शासनाची मान्यता नाही. केवळ वाङ्मयीन आनंद लाभावा आणि मराठीतील प्राध्यापक-साहित्यिकांचा जवळून परिचय घडावा म्हणून साहित्याचे जिज्ञासू विद्यार्थी ह्या वर्गांना नियमित उपस्थित राहत. आजही त्यात बदल झालेला नाही.

विठ्ठलराव नियमितपणे आपला वर्ग घेत. मात्र इतर काही व्यक्तींच्या बाबत हे घडत असे, असे म्हणता येत नाही. कित्येक वेळा विद्यार्थी अध्यापक नसल्या-मुळे कंटाळून तक्रार करीत. विठ्ठलरावांच्याकडे तक्रार नेली की ते सांगत, "ह्या प्राज्ञपाठशाळेचे प्राचार्य वा. रा. ढवळे हे आहेत. त्यांना सांगा." हे सांगण्यात त्यांचा मिस्किलपणा प्रत्ययास येत असे. वाईची प्राज्ञपाठशाळा सर्वपरिचित आहे. तेच नाव विनोदाने ते या वाङ्मयीन वर्गांना देत. वस्तुत: त्या काळात या वर्गांना शासकीय अनुदान मिळत नसे. त्यामुळे स्वत:ची पदरमोड करून सर्व अध्यापक विनामूल्य हे वर्ग घेत असत. त्या मागे त्यांचे साहित्याचे निखळ प्रेम व निष्ठा असे. विठ्ठलरावांनी हे अध्यापनाचे व्रत अनेक वर्षे अव्यभिचारी निष्ठेने केलेले आहे.

विद्यार्थ्यांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व घडविताना चांगल्या अध्यापकाचे संस्कार कारणीभूत होतात का ? मी याचे उत्तर खुद्द माझ्या अनुभवावरून होकारार्थी देईन. विठ्ठलराव हे इंग्रजीचे प्राध्यापक आहेत. सुरुवातीला महाराष्ट्र शासनाच्या इस्माईल युसूफ महाविद्यालयात असताना ते इंग्रजीप्रमाणे मराठीही शिकवत असत. इंग्रजी, मराठी आणि संस्कृत या तिन्ही भाषांचा त्यांचा व्यासंग जबरा आहे. मराठीचे ते लेखक आहेत आणि समीक्षकही आहेत. चांगले प्रभावी वक्ते आहेत. या सर्वांचा उत्कृष्ट संगम त्यांच्या अध्यापनात जाणवत असे. त्यांच्या व्यक्तिमत्त्वात खेळकरपणा आणि मिस्किलपणा यांचाही संगम आहे. त्यांच्या भाषणात माफक विनोदाची पखरण असते. गंमत अशी की ते विद्यार्थ्यांना हसत खेळत शिकवितात पण स्वत: मात्र कधी हसणार नाहीत व हसलेच तर ते विद्यार्थ्यांना जाणवणार नाही.

'दुटप्पी की दुहेरी' ही कोल्हटकरांची कादंबरी शिकविताना ते प्रथम कोल्हटकरांच्या व्यक्तिमत्त्वाचे विविध पैलू सांगत. त्यांचा शुद्ध लेखनावर असलेला कटाक्ष, चमचमीत खाद्यपदार्थांची आवड, त्यांचे आपल्या शिष्यांवरील निस्सीम प्रेम यांचीही माहिती देत. कोल्हटकर हे 'विविध ज्ञान विस्तारा'चे एक अग्रगण्य लेखक होते. ह्या मासिकाचे संपादक रावसाहेब मोरमकर यांच्या बैठकीत ते गेले

की त्यांची सरबराई कशी ठेवण्यात येत असे याचे खुमासदार वर्णन ते करीत. भरपूर आवडीचे खाद्यपदार्थ पुढे ठेवल्यावर मोरमकर हळूच नव्या लेखाचा विषय कसा काढीत याचा किस्सा ते रंगवून सांगत. हेतू हा की विद्यार्थ्यांनी कोल्हटकरांचे साहित्य वाचावे. त्यांच्या साहित्याबद्दल आवड निर्माण व्हावी. स्वत: विठ्ठलराव हे कोल्हटकरांच्या निकटच्या सहवासात आलेले आहेत. कोल्हटकर-संप्रदाय म्हणून मराठीत जो ओळखला जातो, त्या संप्रदायापैकीच विठ्ठलराव हे एक साहित्यिक आहेत. त्यामुळेच ते श्रीपाद कृष्णांच्या व्यक्तिमत्त्वातील कित्येक अज्ञात पैलूंचे दर्शन घडवू शकतात.

गडकऱ्यांचे 'एकच प्याला' त्यांनी अशा कौशल्याने शिकविले की आजही त्यातील कित्येक भाग माझ्या कायमचा स्मरणात राहिलेला आहे. एक श्रेष्ठ नाटककार म्हणून गडकऱ्यांना का मानतात ? लेखकाचे मोठेपण कशात असते ? श्रेष्ठ आणि अभिजात साहित्य कसे ओळखावे ? गडकऱ्यांच्या जीवनाचा त्यांच्या साहित्यावर अपरिहार्य परिणाम कसा झालेला आहे ? एक नाटककार म्हणून आपल्या गुरूहून (कोल्हटकर) गडकरी श्रेष्ठ कसे ठरतात ? इ. मुद्द्यावर केलेली चर्चा आजही मला आठवते.

मी स्वत: बावीस वर्षांपूर्वी मराठीचा अध्यापक झालो. नवीन असताना नाटक किंवा कादंबरी कशी शिकवावी याचा मी विचार करू लागलो. त्या वेळी प्रथम स्मरण झाले ते विठ्ठलरावांचे. त्यांनी ही कादंबरी वा नाटक कसे शिकविले असते, याचा विचार करतानाच मला नवे– नवे मुद्दे सुचू लागले. चांगल्या अध्यापकाचे विद्यार्थ्यांवर संस्कार घडतात ते असे. म्हणूनच मी त्यांना हाडाचे शिक्षक म्हणतो. अध्यापन ही एक अवघड कला आहे. ती सर्वांना साधतेच असे नाही. मराठी चांगल्या प्रकारे शिकविणारे जे मोजके अध्यापक मी पाहिले आहेत, त्यांत विठ्ठलरावांची गणना नेहमीच करत आलोय. मात्र हे यश त्यांना सुखासुखी मिळाले नाही. त्यामागे त्यांची तपश्चर्या आहे, वाङ्मयाबद्दलचे त्यांचे प्रेम व अव्यभिचारी निष्ठा आहे. एक अध्यापक आपल्या अध्यापन-कौशल्यावर केवढी लोकप्रियता संपादन करू शकतो याचे विठ्ठलराव हे एक बोलके उदाहरण आहे.

वाङ्मयीन वर्गात शिकत असताना आम्ही अनेक नवे उपक्रम सुरू केले. जुन्या-नव्या विद्यार्थ्यांची स्नेहसंमेलने भरविली. पहिल्या वर्षी प्रा. न. र. फाटक, दुसऱ्या वर्षी वि. स. खांडेकर, तिसऱ्या वर्षी सुलभा पाणंदीकर यांना आम्ही अध्यक्ष म्हणून बोलविले, वेगवेगळी व्याख्याने आयोजित केली, विद्यार्थ्यांच्या सहली काढल्या. श्री. वामनराव ढवळे आणि विठ्ठलराव कुळकर्णी हे आमचे मार्गदर्शक असत. या स्नेह-संमेलनात आम्ही आवर्जून विठ्ठलरावांना भाषण करण्यास बोलावत असू. तेही अगत्याने येत. तो काळच मुळी मंतरलेला होता. ढवळे किंवा विठ्ठलराव यांनी

आम्हाला सतत उत्तेजन दिले. या उपक्रमामुळेच माझ्यासारख्याला सार्वजनिक जीवनाचे प्राथमिक पाठ मिळाले. मुळात साहित्याची असलेली आवड अधिक वाढली. साहित्याचा व्यासंग कसा करावा याचा वस्तुपाठ मिळाला. राष्ट्राला स्वातंत्र्य मिळाले व मुंबई शहरात निर्वासितांचा प्रचंड लोंढा लोटला. त्यातून पुढे जागेची टंचाई भासू लागली. आमच्या गटातील सर्वश्री ल. पू. भाटवडेकर, माधव-राव राणे, वि. कृ. शेंडे इ. प्रमुख कार्यकर्ते गिरगाव सोडून उपनगरात राहायला गेले व हळूहळू आमचे सर्व उपक्रम बंद पडले.

मी गोरेगावात स्थायिक झाल्यावर (१९६०) प्रथम 'साहित्य मंदिर' या संस्थेच्या विद्यमाने वार्षिक वसंत व्याख्यानमाला सुरू केली. त्यानंतर 'साहित्य साधना' या नव्या संस्थेची इतर सहकाऱ्यांसह स्थापना केली. त्याही संस्थेच्या वतीने वार्षिक व्याख्यानमाला सुरू केली. हा उपक्रम सतत पंधरा वर्षे चालू होता. त्या काळात मी विठ्ठलरावांना चार-पाच वेळा व्याख्यानासाठी आग्रहाने बोलावले. त्यांनीही 'इंग्रजांनी आम्हाला काय दिले ?' 'जॉर्ज बर्नार्ड शॉ' इ. विषयावर व्यासंगपूर्ण व्याख्याने दिली. कविवर्य केशवसुत यांची जन्मशताब्दी १९६६ साली साजरी झाली. आम्हीही गोरेगावात साजरी केली. त्यासाठी विठ्ठलरावांना अध्यक्ष म्हणून बोलावले होते. त्या वेळी त्यांनी भाषणाच्या सुरुवातीलाच एक स्वतः अनु-भवलेला किस्सा सांगितला. तो माझ्या कायमचा स्मरणात राहिलेला आहे. या जन्मशताब्दीच्या कार्यक्रमाला सुमारे १०० श्रोते होते. त्याचे समाधान व्यक्त करून त्यांनी आपला खालील अनुभव सांगितला.

१९२४-२५ साली स्वतः विठ्ठलराव आणि त्यांचे मित्र खं. सा. दौंडकर, अनंत काणेकर, इत्यादींनी केशवसुतांची मुंबईतील पहिली पुण्यतिथी साजरी करण्याचे ठरविले. त्या कार्यक्रमाची ही हकीगत होती.

गिरगावातील मारवाडी विद्यालयात सर्वांना सोईस्कर अशी जागा निश्चित झाली. दिवस सुट्टीचा असा रविवार ठेवला आणि वेळही सर्वांना सोईची म्हणजे सायंकाळी पाच वाजताची ठेवली शिवाय अध्यक्ष म्हणून भारताचार्य चिंतामणराव वैद्य ह्या विद्वानाला आमंत्रित केले. संयोजकांचा उद्देश असा होता की, या कार्य-क्रमाला खूप गर्दी होणार ! परंतु पाच वाजून गेले, सहा वाजले तरी एकही श्रोता सभागृहाकडे फिरकला नाही. आता काय करावे असा संयोजकांना प्रश्न पडला. त्यांनी अध्यक्षांचा सल्ला घेण्याचे ठरविले. परंतु गंमत अशी की, खुद्द अध्यक्षच आपली पगडी टेबलावर ठेवून खुर्चीत झोपी गेलेले होते. हा किस्सा आपल्या नेहमीच्या भाषेत सांगून विठ्ठलराव म्हणाले, "आज शंभर श्रोते या कार्यक्रमाला उपस्थित राहिले हे आपले सर्वांचे व केशवसुतांचेही भाग्य समजा." हा अभिनव किस्सा ऐकताच श्रोत्यांना हसता हसता पुरेवाट झाली.

त्यांच्या आठवणींचे पुस्तक प्रसिद्ध होत आहे याचा मला आनंद होत आहे. जन्मभर ज्याने साहित्याच्या व्यासंगाचे व अध्यापनाचे व्रत स्वीकारले अशा एका तपस्वी साहित्यिकाचा हा बहुमान आहे. त्यांचे एक विद्यार्थी प्रकाश मोहाडीकर यांनी पुढाकार घेऊन दादरला चार वर्षांपूर्वी केलेल्या (१९७७) त्यांच्या पंचाहत्तरीच्या सोहळ्याच्या वेळी श्रोत्यांनी इतकी गर्दी केली की सभागृह अपुरे पडले. विठ्ठलरावांच्यावर गौरवपर भाषणे करण्याची इतक्या मंडळींनी इच्छा प्रदर्शित केली की कित्येकांना नाराज करावे लागले. विठ्ठलराव हे काही ललित लेखक नाहीत. मग ही अफाट लोकप्रियता त्यांनी कशी मिळविली ? याचे उत्तर त्यांच्या अध्यापन-कौशल्यात आहे असे मला वाटते. रूढार्थाने ते संपूर्ण व्यसनमुक्त आहेत. अधूनमधून सिगारेट ओढताना ते दिसत. आता तेही त्यांनी सोडले आहे. साहित्याचा व्यासंग हेच त्यांचे जन्माचे व्यसन आहे. ते सर्वांत असतात पण कुठेही नसतात. कारण ते कुणाच्याही डोळ्यांत खुपत नाहीत. त्यांना साहित्य क्षेत्रात चाललेल्या सर्व घडामोडींची माहिती असते. पण ते वाङ्मयीन राजकारणापासून पूर्णपणे अलिप्त आहेत. त्यामुळेच मिळालेली लोकप्रियता कायम टिकून आहे. काही वर्षांपूर्वी त्यांच्या पत्नी निवर्तल्या. जिवाभावाचे मित्र गजाननराव माडखोलकर हेही गेले. तसेच इतर मित्र दौंडकर व काणेकर यांनीही या जगाचा निरोप घेतला आहे. आता तसे ते एकाकीच पडले आहेत. परंतु मनाची जिद्द कायम आहे. शेक्सपिअर, बर्नार्ड शॉ, कोल्हटकर, गडकरी, केळकर, खाडिलकर यांच्या साहित्याच्या सहवासात ते रमून जातात. अशा ग्रंथवेड्या व व्रती माणसाला एकाकी तरी कसे म्हणावे ? क्रिकेटमधील अनभिषिक्त सम्राट सर डोनाल्ड ब्रॅडमन यांचे त्यांनी एक उत्कृष्ट व्यक्तिचित्र लिहिले असून ते त्यांच्या 'व्यक्तिचित्रे' या पुस्तकात समाविष्ट झालेले आहे. क्रिकेटच्या परिभाषेत मी असे म्हणेन की आता विठ्ठलरावांनीही आपल्या वयाचे शतक पूर्ण करावे. या विश्वाचे नियंत्रण करणाऱ्या अज्ञात नियतीने त्यांना तशी संधी द्यावी.

* *

# माझे अणणा

## प्रकाश मोहाडीकर

१९४४ साली मी मुंबईत आलो. नोकरी करून महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण करावे व पुन्हा नाशिक वा खानदेश या माझ्या जन्म आणि कर्मभूमीत राजकीय कार्य करण्यास जावे हा हेतू होता. इच्छिले होते एक, झाले पार निराळे. मी मुंबई-करच बनलो व माझ्या आयुष्यातील अनेक स्थित्यंतरे, विविध प्रकारची कामे याच नगरीत गेली ३६।३७ वर्षे पार पडलीत.

या अवाढव्य मुंबईत खानदेशाचा मी एक २५ वर्षांचा तरुण 'जीभाऊ' अगदी बुजऱ्या अवस्थेत आलो. कॉलेजमध्ये मान खाली घालून बसायचो. सहसा कोणाशी बोलायचो नाही. ही बडी माणसे– नव्हे विद्यार्थी, माझ्या खानदेशी हेल काढणाऱ्या बोलीस हसतील, त्यांच्या संस्कृतप्रचुर विद्वत्तेला आपण रांगडी माणसे विनोदाचे कारण होऊ, त्यांच्या वडिलांच्या जीवावर पैशाची उधळपट्टी करण्याच्या दिमाखास आपला फाटलेला खिसा अवमानित करायला लावील या भांबावलेल्या अवस्थेत मी दिवस काढीत असताना ज्या काही अत्यंत मोजक्या 'मानवांनी' मुंबईतही आत्मविश्वास निर्माण केला, मला जनतेसमोर धैर्याने उभे राहण्यास समर्थ बनविले, माझ्यातील कर्तव्यशक्तीची जाणीव स्वत: खंबीरपणे माझ्या पाठीशी अनामिकपणे उभे राहून असंख्यांना करून दिली व आजचा मानसन्मानाने जगणारा 'प्रकाशभाई' मला बनविले त्यात त्या वेळचे मला आदरणीय वाटणारे प्रा. वि. ह. कुळकर्णी व आता माझ्या जिव्हाळ्याचे नाते जुळलेले 'अण्णा' यांचे स्थान अत्यंत वरच्या क्रमांकाचे आहे. प्रश्न सर्वांना पडेल, असे नाते कसे जमले ? काय आहे त्यांच्यात की ज्यामुळे मी त्यांना एवढे मोठे मानावे ? खालील प्रसंगच त्याची ग्वाही देतील–

मी १५ऑक्टोबर १९४४ रोजी मुंबईत पदार्पण केले व छबिलदास मुलांच्या शाळेत सकाळी शिक्षकाची नोकरी करून दुपारी रुईया महाविद्यालयात पहिल्या वर्गातविद्यार्थी म्हणून दाखल झालो. मला इंग्रजीचे फारसे ज्ञान नव्हते. बहुसंख्य विषय इंग्रजीतून शिकविले जात. प्राध्यापक बोलत. माझ्या कानावर त्यांचे भाषण आदळायचे पण डोक्यात काहीच शिरायचे नाही. कारण त्यांच्या इंग्रजीचे मराठीकरण

होऊन मनात साठवीपर्यंत त्यांची गाडी कोठल्याकोठे जायची. त्यामुळे माझ्या मनात न्यूनगंड निर्माण झाला. अशावेळी ज्यांचे इंग्रजी भाषण मला, माझ्या आईच्या भाषेप्रमाणे अत्यंत जिव्हाळ्याचे, घरगुती व सोपे वाटायचे असे पहिलेवहिले व एकमेव प्राध्यापक (ज्यांना बहुसंख्य विद्यार्थी कुळकर्णी मास्तर म्हणून आदराने संबोधायचे) म्हणजे वि. ह. कुळकर्णी. त्यामुळे मला त्यांच्याबद्दल आपुलकी वाटू लागली. हे गृहस्थ भेटण्यास व बातचीत करण्यास आपल्या जातकुळीचे आहेत असा विश्वास मनात डोकावयाचा. शिवाय त्यांचा तास म्हणजे आम्हा विद्यार्थ्यांचा आनंदाचा असायचा. ते इंग्रजीत बोलायचे. विनोद करायचे. आम्ही हसायचो. हे मात्र गप्प. हसतखेळत शिकविण्याची त्यांची ही कला त्यांच्या विद्यार्थीप्रेमात होती. माझ्या विद्यार्थ्यांना समजेल अशा भाषेतच मी शिकविले पाहिजे व त्यांच्याशी समरस झाले पाहिजे, ही शिक्षणाची मूळ तत्त्वे त्यांनी प्रत्यक्षात सहजरीत्या आणली होती. त्यामुळे ते सर्वांचे आवडते झाले. शिवाय आपल्या विद्वत्तेचा, आपल्या विद्यार्थीप्रियतेचा यत्किंचितही अहंकार नाही, असे व्यक्तिमत्त्वही मला त्यांच्यात आढळले व मी त्यांच्या सन्निध जाण्याचा प्रयत्न करू लागलो.

माझे शिक्षण चालू असतानाच मी अमरहिंद मंडळाचे कार्य सुरू केले महाराष्ट्रात गाजलेल्या वसंत व्याख्यानमालेचा प्रारंभ झाला. त्यानिमित्त वक्त्यांची निवड करणे, त्यांचा योग्य शब्दांत परिचय करून देणे, या सर्वांत मला प्रा. वि. ह. कुळकर्णी यांची फार मदत झाली व त्याच व्याख्यानमालेतील अत्यंत लोकप्रिय अशा प्रश्नमालेच्या– 'BRAIN TRUST' कार्यक्रमाचे वि. ह. कुळकर्णी हे सर्वेसर्वा होते. ते 'प्रश्न प्रमुख' हेच मुळी त्या कार्यक्रमाच्या यशाचे मोठे गमक होते. त्या कार्यक्रमाला लोकांची तुफान गर्दी लोटे व तासनतास कार्यक्रम चालला तरी श्रोतृवर्ग कंटाळत नसे. परंतु त्यासाठी जी मेहनत घ्यावी लागे ती फक्त वि. ह. आणि माधव मनोहरच जाणे. त्यासाठी आलेल्या प्रश्नांची छाननी करून निवड करणे, त्यात आपण स्वतः काही प्रश्नांची भर घालणे, त्यांची क्रमवारी ठरविणे, ते सर्व प्रश्न पुन्हा लिहून काढणे, वक्त्याचा खुमासदार भाषेत परिचय करून देणे व पहिल्या सलामीपासून शेवटच्या निरोपापर्यंत त्यांची रंगत वाढवीत नेणे याची सर्व योजना, कार्यवाही व त्यासाठीचे परिश्रम वि. ह. कुळकर्णी यांचेच–

या व्याख्यानमालेमुळे माझा त्यांच्या घराशी संबंध आला व त्यांचा मी विद्यार्थी असूनही दर भेटीला हक्काच्या कॉफीपानाचा मानकरी बनलो आणि लवकरच परिवारी (Family member) झालो. आता कुळकर्णी सर वा प्रा. वि. ह. कुळकर्णी असे संबोधणे कृत्रिम वाटू लागले व त्यांची परिचित मंडळी व मुलंमुली ज्या नावाने हाक मारीत तीच गोड हाक 'अण्णा' अशी मी मारली व त्यांच्या कृपेचा हात माझ्या पाठीवरून फिरला व मला कृतार्थ वाटले.

परंतु या अण्णांनी एकदा वर्तमानपत्रात पत्रव्यवहाराचा मला विषय बनविले. अमरहिंद मंडळाची वसंत व्याख्यानमाला चालू होती. आत्यंतिक परिश्रमामुळे मी आजारी झालो. प्रत्यक्ष व्याख्यानाच्या कार्यक्रमाला मी गैरहजर. त्या दिवशी प्रश्न-मालेचा लोकप्रिय कार्यक्रम. अण्णांनी समारोप केला व माझ्याबद्दलच्या आपुलकीच्या पोटी माझी व माझ्या कार्याची स्तुती करताना– "अशा या कष्टाळू तरुणाची काळजी घेण्यासाठी कोणीतरी जिव्हाळ्याचा मनुष्य पाहिजे. फार सद्‌गुणी व कर्तबगार मुलगा आहे. जावई बनण्यास योग्य आहे. येथील मंडळींनी विचार करावा." असे आपल्या शैलीत निवेदन केले व वर्तमानपत्राला ८।१५ दिवस खरमरीत विषय मिळाला. माझी मात्र पंचाईत झाली. त्यातही अण्णांचा हेतू माझ्यावरील निस्सीम प्रेमाचा व माझ्या चितामुक्तीचाच होता.

माझे इंटरचे वर्ष होते. मी शरीराने वर्गात, मनाने चळवळीत व कार्यात भटकत होतो. त्यामुळे कोणताच प्रमुख विषय मनाच्या कप्प्यात प्रवेश करीना. अखेर कॉलेजची प्रवेश-परीक्षा आली. Logic चा पेपर होता. मी संपूर्णपणे कोरा होतो. जाता जाता what is sylogism ही व्याख्या पाठ केली होती. तेवढी फक्त लिहिली. पाच मिनिटांत परीक्षाकेंद्रातून बाहेर आलो. १०० पैकी १ गुण मिळाला. मिनतवारीने परीक्षेस बसण्यास परवानगी मिळाली. परंतु अभ्यासाचे व लॉजिकचे काय करायचे !

अण्णांचा विषय इंग्लीश. परंतु माझी त्यांच्यावर श्रद्धा, नव्हे अंधश्रद्धाच. मी त्यांच्याकडे गेलो. त्यांना माझी अडचण सांगितली. चिता व्यक्त केली. त्यांनी मला लॉजिकच्या दोन्ही पोटविषयाची guides आणावयास सांगितले. गेल्या पाच वर्षांच्या प्रश्नांचा अंदाज घेऊन महत्त्वाच्या (Important हा शब्द विशिष्ट लकबीत बोलण्याची त्यांची पद्धत व त्याचवेळी होणारे हावभाव विद्यार्थ्यांच्या लक्षात राहतील) प्रश्नांवर त्यांनी खुणा करून दिल्या. मी अक्षरशः अंधश्रद्धेने त्याच प्रश्नांचा खूप अभ्यास केला.उत्तरे लिहून काढली. परीक्षेची आदली रात्र संपूर्ण जागून काढून त्याच प्रश्नांचा पिच्छा पुरवला व जेव्हा प्रश्नपत्रिका माझ्या हातात पडली, तेव्हा जणू काही अण्णांनी प्रश्नपत्रिका काढावी अशा तऱ्हेने ९०टक्के मी केलेले (अर्थात अण्णांनी खुणा करून दिलेले) प्रश्नच आलेले पाहून मी तीन तास पेपर सोडवत राहिलो व मला परीक्षेत १०० पैकी ५६ गुण मिळून मी उत्तीर्ण झालो. दीड महिन्यापूर्वी ज्या विषयाचे माझे ज्ञान १०० पैकी १ गुणांचे होते. ते अण्णांनी ५६ पर्यंत आणून ठेविले व मला पुढच्या वर्गात सन्मानपूर्वक पाठविले त्याचा विसर कसा पडेल !

हीच गोष्ट माझ्या बी. ए.च्या परीक्षेच्या वेळची. 'मॉडर्न इंडिया' हा माझा

२०० गुणांच्या परीक्षेचा एक विषय होता. गलेलठ्ठ पुस्तक होते. मला वाचायला वेळ नव्हता. चळवळ चालू होती. शिवाय इंग्रजीतून त्याचे ज्ञान ग्रहण करायचे माझ्या दृष्टीने अशक्यच. अण्णांनी माझ्यासाठी ते पुस्तक संपूर्ण वाचले. रोज रात्री १० ते १२ ही त्यांची नि माझी वेळ. घरी लहान मूलबाळ परंतु या माझ्या गुरुमाऊलीने माझ्यावरील प्रेमाखातर स्वतः अडचणी सोसल्या व माझ्यासारख्या नटखट विद्यार्थ्याला तो संपूर्ण विषय मराठीत समजावून सांगितला. त्यानंतर रात्री १२ ते १ च्या दरम्यान मी तो भाग इंग्रजीत वाचायचो. त्याच्या नोटस् काढायचो व त्या विषयात मी चांगल्या तऱ्हेने उत्तीर्ण होऊन माझ्या नावासमोर बी. ए. ही उपाधी लागली. मी कृतार्थ झालो. ज्या उद्देशाने मी मुंबईत आलो ते सफल झाले. माझ्या वृद्ध वडिलांना जसा आनंद झाला तसा माझ्या अण्णांना झाला व त्या प्रीत्यर्थ त्यांच्याच घरी तूप- साखर- पोळीचा मी आस्वाद घेतला, हे नाते मी कसा विसरू शकेन !

अमरहिंद मंडळातर्फे साहित्य परीक्षांचे वर्ग सुरू करावेत असे ठरविण्यात आले. हाही उपक्रम आम्ही अण्णांच्या जीवावर व जबाबदारीवरच चालविला. त्या वेळी अण्णांचे वरिष्ठ साहित्यिकांत किती वजन आहे व त्यांच्या शब्दाला किती मान आहे याची कल्पना मला आली व त्यांच्या प्रसिद्धी पराङ्मुखतेचेही आश्चर्य वाटले. त्या वर्गात ३०० पर्यंत विद्यार्थ्यांनी नावे नोंदविली व या विद्यार्थ्यांना शिकविण्यासाठी प्रा. अनंत काणेकर, प्रा. वा. ल. कुलकर्णी, प्रा. रा. भि. जोशी प्रा. माधव मनोहर, श्री. वा. रा. ढवळे, श्री. प्रभाकर पाध्ये, हृ. रा. महाजनी, इ. मान्यवर साहित्यिक व प्राध्यापक मंडळी नियमितपणे व कशाचीही अपेक्षा न करता येत होती. याचे सर्वस्वी श्रेय अण्णांनाच होते. ते या साहित्यिक विद्यालयाचे प्राचार्य होते. त्यांचे थोरले बंधू श्री. स. ह. कुळकर्णी हे आमच्या विद्यालयाचे रजिस्ट्रार अशा थाटात अमरहिंद मंडळाने कित्येक वर्षे हे विद्यालय चालविले व त्याही बाबतीत महाराष्ट्रात मानाचे स्थान प्राप्त झाले.

अमरहिंद मंडळाच्या व माझ्या अन्य उपक्रमात आपलेच कार्य समजून अण्णा भाग घेत व त्यांच्या उपस्थितीने माझी व त्या कार्यक्रमाची शान वाढायची. पुढे तात्त्विक व प्रासंगिक मतभेदामुळे मी अमरहिंद मंडळाचा राजीनामा दिला. त्या आधी श्री. नानासाहेब मोडक यांच्या घरी जी संयुक्त सभा झाली त्या वेळी श्री. अण्णांनी माझी भूमिका, माझ्यावर होत असलेला अन्याय याची बाजू जणूकाही त्यांच्यावरच अन्याय होत आहे अशा पोटतिडकीने सर्वांपुढे मांडली. तडजोड झाली. त्याप्रमाणे काम सुरू झाले. परंतु पुन्हा 'येरे माझ्या मागल्या' प्रमाणे वागणूक सुरू झाली. म्हणून मी मंडळाचा राजीनामा दिला. त्याबरोबर मंडळाचे आधारस्तंभ श्री. अण्णा यांनीही मंडळाला रामराम ठोकला, तो जवळ-

जवळ आजतागायत. इतका आपल्या माणसाचा व तोही अन्यायाविरुद्ध पाठपुरावा कोण करतो बरे! मग मी माझ्या अण्णांना कसा विसरेन.

मी काम करतो, रात्रंदिवस काम करतो, प्रकृतीची हेळसांड करतो, जेवण-खाण याकडे दुर्लक्ष होते. शिवाय उत्पन्नाच्या साधनांचाही विचार करीत नाही, हे पाहून त्यांच्या अंत:करणाला पित्याच्या वात्सल्याचे दु:ख होई. त्यांची पत्नीही प्रत्यक्ष देवताच. आपल्या मुलाचा नव्हे इतका त्या माझा विचार करायच्या. या दोघांनीही माझ्यावर अतोनात प्रेम केले. का? मी काय त्यांना देऊ शकत होतो? काहीच नाही. उलट मनस्ताप, श्रम व त्यांना वापरून घेऊन माझी प्रशंसा. परंतु यालाच खरे निर्व्याज प्रेम म्हणतात. ते अमाप त्यांनी मला दिले. या चिंतेतूनच; त्यांचा व श्री. बर्वे यांच्या एस. एस. सी. चा वर्ग अत्यंत चांगला व कमी श्रमाचा चालला असता त्यांनी मला चरितार्थाचे साधन उपलब्ध व्हावे म्हणून माझ्या 'ज्ञानमंदिर' या वर्गात ते शिकवू लागले. अनेकांना त्यात यावयास सांगितले. माझे वर्ग भरभराटले. त्यांना कष्ट पडू लागले. परंतु माझ्यासाठी त्यांनी हे सर्व सहन केले. माझ्या या वर्गाचे श्रेय केवळ त्यांच्यावरच अवलंबून होते.

माझ्या आतबट्ट्याच्या व्यवहारामुळे ते वर्ग बंद करावे लागले. परंतु त्या-बद्दल अण्णांनी मला यत्किंचितही दोष दिला नाही. त्यांच्या अर्थनिष्पत्तीसाठी त्यांना वणवण भटकण्याची पाळी मी आणली. परंतु त्याबद्दल 'ना खंत ना खेद' या भूमिकेतून ते माझ्याशी वागले. हे नाते मी कसे विसरू शकणार?

पुढे माझ्या लग्नाचा प्रश्न आला. मला काही पालकांची पत्रे आली. मी त्यांना उत्तरे पाठवीत असे. परंतु हा सर्व पत्रव्यवहार अण्णा आणि त्यांची सावली-सारखी राखण करणारी त्यांची पत्नी यांच्याकडून पास झाल्याशिवाय व उत्कृष्ट असा शेरा मिळाल्याशिवाय जात नसे. त्याहीबाबत त्यांनी मला मौलिक मार्ग-दर्शन केले.

"मी शिवाजी पार्कमधून प्रा. वि. ह. कुळकर्णी बोलत आहे. My wife is no more. She is dead." असे एका पहाटे अत्यंत सद्गदित कंठाने उच्चारलेले अण्णांचे हे वाक्य हृदयात खोलवर जबर जखम करून गेले. त्या आजारी असल्याचे तर ऐकले नव्हते. मग हा आघात कसा! उलगडा झाला. त्यांना भाजून अपघाती मृत्यू झाला. अण्णांचे सर्वस्व हरपले. माझ्यावर निरतिशय प्रेम करणाऱ्या, माझ्या-बद्दल सर्वत्रच कौतुकाने सांगणाऱ्या, माझ्यावर कोणी टीका केली तर त्याला अक्षरश: फाडून खाणाऱ्या अशा माझ्या जिव्हाळ्याच्या व्यक्ती अकस्मात निघून गेल्यावर जर मी पोरका बनलो तर अण्णांची व त्यांच्या सर्व लेकरांची काय अवस्था झाली असेल.

ज्या वयात आपले म्हणून काळजी घेणारे माणूस– हक्काचे माणूस हवे असते

त्याच वयात अण्णा त्या प्रेमाला पारखे झाले व त्यातूनच अण्णांना ज्याची सारखी टोचणी घरातून व्हायची, जे काम ते त्या काळी करून शकले नाहीत असे कृतज्ञता-पूर्तीचे कार्य आपल्या पत्नीच्या स्मरणार्थ अण्णांनी अंगिकारले व या उतारवयात सर्व अवयव नीट काम देत नसतानाही त्यांनी कै. अच्युत बळवंत कोल्हटकर, जॉर्ज बर्नार्ड शॉ यांच्या जीवनावरील मौलिक ग्रंथ लिहून प्रकाशात आणले व आपल्या पत्नीच्या स्मृतीस वंदन केले.

धन्य ते अण्णा, धन्य त्यांचे निर्व्याज प्रेम, त्यांची प्रसिद्धी पराङ्मुखता, त्यांचा गाढा व्यासंग, सर्वांच्या उपयोगी पडण्याची तत्परता व हे सर्व ' मा फलेषु कदाचन ! ' या वृत्तीतून. अशा माझ्या अण्णांना शतशः प्रणाम व त्यांना निरामय दीर्घायु लाभो हीच प्रभुचरणी प्रार्थना !

* *

अनुक्रमणिका

# अण्णा

## सौ. इरावती कुळकर्णी

आपल्या घरातल्या व्यक्तींच्या मोठेपणाची जाणीव बरेच वेळा इतरांकडून दिली जाते. कित्येक वेळा तसा योग एखाद्या चमत्कारिक प्रसंगी येतो. आमच्या शेजाऱ्यांचा मुलगा, आमच्याच वयाचा, अगदी अचानक गेल्याचे कळले. नुकतीच मोठी बढती मिळून, चांगल्या हुद्द्यावर नेमणूक झालेली. ऑफिसचा फ्लॅट, गाडी, अशा ऐश्वर्याचे आम्ही कौतुक करतोय तोच ही बातमी. अस्वस्थ मनःस्थितीत त्याच्या बायकोला भेटायला गेले. माझी जणू वाटच पाहत होती ती. रडू अनावर होऊन म्हणाली, " ह्यांच्या मनातील एक इच्छा अतृप्त राहिलीय हो ! तुमच्या अण्णांना आपल्या गाडीतून घरी जेवायला आणून पायावर डोकं ठेवायचं होतं त्यांना. मला नेहमी म्हणायचे, ' हे जे ऐश्वर्य आहे ते त्यांच्यामुळे. मला त्यांनी वेळीच सावरलं नसतं तर रस्त्यावर भटकणारा एखादा मवाली झालो असतो. आज मी जो काही आहे ते अण्णांमुळे.' पण असं अचानक घडेल याची काय हो कल्पना. निदान अण्णांच्या कानावर तरी ह्यांची इच्छा घाला, तेवढंच मला समाधान."

मी आतून गलबलून गेले. ऐकले ते सारे आकस्मिक होते, तरी नवीन नव्हते. शिक्षणाची गोडी लावून एक सुसंस्कृत जीवन जगण्याची संधी अण्णांनी अनेकांना प्राप्त करून दिली होती. आयुष्यभर स्वखुषीने पत्करलेला पेशा प्रामाणिकपणे, तळमळीने, इतर कशाचीही तमा न बाळगता पार पाडला की कुठेतरी असे उद्गार ऐकू येतात. कुठूनतरी अशी पावती मिळते. ती अपूर्वाईची ठरते. कारण तशा पावतीची कुठे अपेक्षाच धरलेली नसते.

असेच एक अचानक पत्र येते. सौ. आशा घारपुरे यांचे. गुरुभक्तीतून प्रेरणा घेऊन गोड आर्जव, त्यांच्या व माझ्याही गुरुबद्दल लिहिण्यासाठी. आनंदाने मान्य केले खरे. पण लवकर लक्षात आले की पित्याचे व्यक्तिमत्त्व शब्दांत पकडणे थोडे कठीणच. अनुभवणे वेगळे नि सांगणे वेगळे मी पाहिलेली त्यांची अनेक रूपे. घरच्यांचे अण्णा, मराठी साहित्यातील वि. ह. कुळकर्णी, कॉलेजच्या विद्यार्थ्यांचे व्ही. एच. ही, लाडके व्ही. एच. या व्ही. एच.च्या पॉप्युलॅरिटीबद्दल फार दिवस

एकून होत आणि प्रत्यक्ष व्ही. एच. ना पाहण्याची संधी मलाही आली.

१९५१ साली इतर अनेक मुलांबरोबर माझाही रुईया कॉलेजमध्ये प्रवेश. तो शंभर दीडशे मुलांचा वर्ग. जणू प्रोफेसरांचीच परीक्षा घ्यावयास टपलेला इंग्लीशचा पिरीयड. या वेळी व्ही. एचची आत्मविश्वासाने होणारी 'एन्ट्री.' एक तिरका कटाक्ष, दोन मिनिटे प्रश्नांकित चेहरा आणि अशा कुतुहल–मिश्रित वातावरणात व्ही. एच. नी विनोदी शैलीने उच्चारलेले पहिले वाक्य. हास्याचा स्फोट. व्ही. एच नी मुलांना पहिल्या फटक्यात जिंकलेले असते.

व्ही. एच. चा वर्ग नेहमी कसा भरलेला. कारण ते अतिशय तळमळीने व रंगवून शिकवतात. पुस्तक कुठलेही असो– प्रवासवर्णन असो, वन अॅक्ट प्ले असो, लेखकाला जे जे म्हणायचे आहे ते विद्यार्थ्यांपर्यंत सुबोध पद्धतीने पोहोचवण्याचे कसब त्यांच्यात असते. शिकवणे अभ्यासपूर्ण आणि या सर्वाला प्रासंगिक मार्मिक विनोदाची जोड. त्यांच्या या रंगवून शिकविण्यामुळे तो लेखक, ती मुले व व्ही. एच. इतके एकरूप होतात की त्या एकरूपतेचा भंग करण्याचे सामर्थ्य फक्त त्या बेलमध्ये. स्वत: लेखक वर्गात येऊन बसला तर तो म्हणेल, " माझं पुस्तक इतकं इंटरेस्टिंग असेल याची मलाच कल्पना नव्हती."

परीक्षेच्या दृष्टीने व्ही. एच. उत्तम मार्गदर्शन करतात. केवळ ज्या विद्यापीठीय परीक्षेवर मुलांचे पुढले सर्व भविष्य ठरविले जाते, त्या विद्यार्थ्यांची खरी गरज व्ही. एच. ओळखतात. त्यांनी दिलेले important questions हमखास परीक्षेला येतात. त्यामुळे व्ही. एच.नीच पेपर काढलाय असा अनेक वेळा गैरसमज होतो. रुईया कॉलेजच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी हृया विषयाची कधी भीती वाटली नाही. पारशी व ख्रिश्चन मुलांबरोबर मराठी मुलेही इंग्लीश ऑनर्स घेऊ लागली. शिक्षणाचेही व्यसन जडते. बी. ए. नंतर मुले एम. ए. चा विचार करू लागतात व मार्गदर्शनासाठी मग व्ही. एच. च्या घरी जाऊ लागतात. आणि अल्पकाळातच वि. हं.च्या घराशी एकरूप होऊन जातात.

हळूहळू या वि. हं.बद्दलच्या आपलेपणाने आपण त्यांना आता 'अण्णा' कधीपासून म्हणू लागतो ते कळतही नाही. हो, घरचे आम्ही सर्व त्यांना 'अण्णा' म्हणतो. नात्याने ते आमचे वडील, पण आयुष्यभर मित्रत्वाच्या नात्याने वागत आलेले. या अण्णांनी आम्हाला काय दिले ? नुसते शिक्षण दिले ? नाही. शिक्षणाबरोबर उत्तम अभिरुची दिली. खेळ, संगीत, चित्रकला या विविध कलांसाठी दृष्टी दिली.

ते स्वत: उत्तम बॅडमिंग्टन खेळत. कॉलेजच्या मॅचेसमध्येही ते भाग घेत. आमच्या घराला लांबलचक पॅसेज आहे. तिथे आम्ही क्रिकेट खेळत असू. अण्णांशिवाय खळाला मजा नाही. त्यांचा कुठलाही खेळ 'ब्रेनी' असतो. बुद्धिबळात ही चुणूक दिसायचीच. पण मला अभिमान असलेल्या माझ्या क्षेत्रातही दिसली. कॉलेजमध्ये

मी असताना युनिव्हर्सिटीतर्फे बॅडमिंग्टन खेळासाठी माझी निवड झाली. त्या वेळी माझी कितपत तयारी झाली आहे याची जिज्ञासा अण्णांना होती. कारण कॉलेजतर्फे 'हेन्री परेरा ' या एकेकाळी नावाजलेल्या भारतपटूच्या कोचिंगखाली आमची तयारी करून घेण्यात आली होती. मी अण्णांचे आव्हान स्वीकारले. मॉर्निंग कॉलेज झाल्यापासून अण्णांना खेळाचा सराव नव्हता. शिवाय माझे ऐन विशीतले सळसळते रक्त. तर अण्णांनी पन्नाशी ओलांडलेली. पण पहिल्या एकदोन रॅलीमध्ये त्यांनी माझे 'वीक पॉइंटस् ' हेरून, मला हा हा म्हणता हरवले. हा मला खरोखर धक्का होता, तसाच उत्तम धडाही होता.

"कुठल्याही कलेसाठी देवाण घेवाण पाहिजे, अनेकांबरोबर खेळले पाहिजे. तसेच अनेक खेळाडूंचा खेळ बघावयासही पाहिजे." अशा अनेक मौल्यवान टिप्स अण्णांनी मला दिल्या. त्याचा मला पुढे खरोखर फार फायदा झाला. अण्णांनी आम्हाला क्रिकेटचे उत्तम कसोटी सामने दाखविले. एवढेच काय वरळीला झालेल्या किंगकाँग, दारासिंग यांच्या कुस्त्यांनाही ते आम्हाला घेऊन गेले. त्यांना स्वतःला उत्तम पोहता येते.

लहानपणी जुहूला महात्मा गांधींच्या प्रार्थनेला आम्हाला त्यांनी नेले होते. सर्व प्रसिद्ध व्यक्ती पाहिल्या पाहिजेत हा उद्देश. बालगंधर्वांच्या जवळजवळ सर्व रेकॉर्ड्स आमच्या जवळ होत्या. त्यांच्याबरोबर प्यारा साहेब, मा. कृष्णराव, बाई सुंदराबाई यांच्याही रेकॉर्डस् होत्या. बालगंधर्वांची उतारवयातीलही स्वयंवर, विद्याहरण व एकच प्याला ही नाटके आम्हाला दाखविली. बालगंधर्वांच्या नाट्यगीताच्या आधाराने रेडिओवर होणाऱ्या शास्त्रोक्त गाण्याची ओळख अण्णा करून देत. 'राग' ओळखायला सांगत. पुढे सवयीने ऐकून ऐकून गाणे समजू लागले, बारकावे कळू लागले. कुठल्याही क्लासला न जाता आमचा कान हा असा तयार झाला. ते स्वतः उत्तम फ्ल्यूट वाजवीत. सैगलची पदे ते अनेक वेळा गुणगुणत. त्यांची संगीताची आवड लक्षात घेऊन त्यांच्या रिटायरमेंटच्या वेळी कॉलेजच्या विद्यार्थ्यांनी मोठ्या प्रेमाने त्यांना गॅरार्ड कंपनीचा एक सुबक रेकॉर्डचेंजर भेट म्हणून दिला.

पूर्वीचे थोडेफार चित्रपट सोडले तर हिंदी चित्रपटांची त्यांना अजिबात आवड नाही. "पैसे देऊन डोकेदुखी विकत मी घेऊ इच्छित नाही" असे ते म्हणतात. इंग्रजी चित्रपटाची आवड असूनही वेळेअभावी ते बघू शकले नाहीत. लहानपणी त्यांनी आम्हाला दाखवलेले 'टारझन', 'साबू' हे चित्रपट माझ्या अजूनही लक्षात आहेत. प्रभात कंपनीचे बहुतेक सर्व चित्रपट त्यांनी आम्हाला दाखवले. मराठीतील थोर संतांची गोडी प्रभातचेच लोकांना लावली. एरवी ती केवळ शिकवूनही लागली नसती असे ते प्रांजळपणे कबूल करतात. त्यांचे ड्रॉइंग चांगले होते. त्याचा बराचसा वारसा आम्हा मुलांमध्ये आला. आमच्या घरी सुंदर सुंदर चित्रांची अनेक

इंग्लीश पुस्तके होती. गोष्टी सांगत सांगत ते ती चित्रे दाखवीत.

एकूण सर्व कलेची आवड असूनही, त्यांचा खरा पिंड साहित्यिकाचा. शाळेत त्यांचे स्वतःचे गणित, सायन्स, संस्कृत, हे विषय उत्तम असूनही, कॉलेजमध्ये बी. ए. व एम.ए.साठी इंग्रजी विषय निवडला व त्याच विषयात प्रोफेसर झाले. साहित्याच्या आवडीमुळे घरी साहित्यिकांची सतत वर्दळ असे. बहुतेक नामांकित साहित्यिक त्या वेळी आमच्या घरी चर्चा करीत. त्या इतक्या रंगत की घरी जाण्याचे कित्येकदा कुणाला भान राहत नसे.

खांडेकर, माडखोलकर, कवी यशवंत यांचा मुंबईला आल्यावर आमच्या-कडेच सहकुटुंब मुक्काम असे. या बड्या साहित्यिकांचे लेखनिक, त्यांना भेटायला येणारे लोक, एकूण सतत पाहुण्यांची ये-जा, त्यामुळे आमचे घर एखादे लग्नघरच वाटे. हे लोक आले की,साहित्यिक चर्चेला असा ऊत येई व आवाज टिपेला पोचे की इतरांना वाटावे आमच्या घरी भांडणच चाललंय. या चर्चेतील काही कळायचे आमचे ते वय नव्हते. घरी या सतत चर्चा, तर शाळेत अभ्यासाला याच लेखकांचे धडे. एकूण काय; घरी किंवा शाळेत या साहित्यिकांपासून आम्हा मुलांची सुटका नव्हती. या अतिरेकामुळे एकूण या साहित्यविषयाचा आम्ही लहानपणीच इतका धसका घेतला की तो एक क्लिष्ट व वादग्रस्त विषय समजून आम्ही कुणीही त्या वाटेला गेलो नाही. हे वातावरण, आमच्या माणूसवेड्या व उदार स्वभावाच्या आईला मात्र फारच पोषक ठरले.

बाकी अण्णांनी आमचा कल बघूनच शिक्षण दिले. मी बी. ए.ला तत्त्वज्ञान विषय घेतला. घरात जरा वेगळे केल्याचे समाधान. पण नंतर वाङ्मयाच्या जोडीला अण्णांचा तत्त्वज्ञानाचा गाढा अभ्यास असल्याचे पाहून माझा भ्रमनिरास झाला व माझ्या अज्ञानाची कीव आली. माझ्या पाठचे तीन भाऊ, अशोक, हेमंत व जयंत. त्यांपैकी अशोकला इंग्रजी तिसरीपासूनच त्यांनी धोबीतलावच्या 'एलफिन्स्टन टेक्नीकल हायस्कूल'मध्ये घातले. पुढे तो आर्किटेक्ट झाला तेव्हा हे शिक्षण त्याला उपयोगी पडले. हेमंत यू. डी. सी. टी. मधून पीएच. डी. (टेक) झाला. त्याला अमेरिकेची स्कॉलरशिप होती. तर जयंताने कमर्शियल आर्टचा कोर्स पुरा केला. आमच्या प्रवृत्तीला पोषक असे हे शिक्षणक्रम होते. आयुष्यात आम्हाला त्यांनी कसलीही बळजबरी केली नाही. 'अभ्यास करा' असा धोषही त्यांनी कधी लावला नाही. तथापि आमची एक फार मोठी पंचाईत होऊन बसायची. शाळेत आमचे शिक्षक बहुतेक अण्णांचे विद्यार्थी निघत. त्यामुळे सर्व विषयांत पास होण्याची जबाबदारी नकळत आम्हाला वाटे.

अण्णांचे आमच्यावर फार मोठे उपकार मी मानते. स्वतः नाणावलेले शिक्षक असूनही आपल्या मुलांचा पहिला-दुसरा नंबर यावयास हवा अशी त्यांची इच्छा

असली तरी दडपण कधीही आमच्यावर येऊ दिले नाही. कदाचित ‘ आमची कुवत ’ त्यांनी ओळखली असावी. कमी मार्क पडले तरी ‘ प्रगती–पुस्तक ’ त्यांना दाखवायला आम्हाला भीती वाटली नाही. आमच्या बरोबरची मुले स्वतःच्या वडिलांना का घाबरत याचे आम्हाला त्यामुळे नेहमी कोडे वाटे. आयुष्यात अण्णांनी आम्हाला कधी मारल्याचे स्मरत नाही. एवढेच काय त्यांच्या रागावण्यातही दम नसे.

अण्णांचा एवढा नावाजलेला प्रोफेसर म्हणून बाहेर लौकिक असताना; मुलांच्या अभ्यासाकडे त्यांनी थोडे तरी लक्ष द्यावे अशी साहजिकच आईची इच्छा असे. पण ते किती अशक्य होते याचीही तिला कल्पना होती. पायाला चाके लावल्यासारखे अण्णांचे आयुष्य. मिनिटाचीही उसंत नाही. कारण तुटपुंज्या पगारात भागायचे कसे ? आमचे एकत्र कुटुंबाचे घर, केवळ जागेच्या सोईसाठी विभक्त झाले. जबाबदाऱ्या तशाच राहिल्या. किंबहुना वाढतच गेल्या. कोकणात कशेळीला आई-वडील व लहानपणीच मागे आलेली सर्वांत मोठी बहीण. तुटपुंज्या पगारात केवळ आमचेच चालणे कठीण. त्यात पाहुणे म्हणून दोन-दोन कुटुंबे असायचीच. शिवाय नातेवाइकांचा गोतावळा, अण्णांच्या व आईच्याकडूनही भरपूर. त्यामुळे आनुषंगिक, प्रासंगिक खर्च, देवाण-घेवाण, कुणी आजारी, कुणी डॉक्टरी तपासणी-साठी येऊन राहिलेला, कुणाचा ऑपरेशनसाठी मुक्काम. गृहस्थ म्हणून ज्या ज्या जबाबदाऱ्या अंगावर पडायच्या, त्या त्या अण्णांवर पडल्या व त्या अगदी स्वाभाविक म्हणून त्यांनी पत्करल्या. या सर्वांसाठी आर्थिक बळ अपुरे पडले की नोकरीच्या जोडीला शिकवण्या करण्याशिवाय गत्यंतर नसे. सकाळी कॉलेज, दुपारी शिकवणी व संध्याकाळी क्लासेस हे सर्व अपरिहार्य ठरले. हे शिकवणे पैशाकरता स्वीकारले तरी पैशाकडे बघून शिकवले नाही. शिकवताना देहभान विसरून शिकवले. एक तासाची शिकवणी असली तर दोन-दोन तास शिकवीत. इंग्रजी, मराठी विषयां-बरोबर, लॉजिक, इतिहास, संस्कृत या विषयांतही मार्गदर्शन करीत. घड्याळ कधी बघितले नाही. पैशाचे हिशेबही कधी केले नाहीत. त्यामुळे कुठल्याही मध्यमवर्गीय कुटुंबात १५ तारखेनंतर होणारी ओढाताण आमच्याही घरी व्हायची. साहजिकच मग वाण्याची बिले थकत. सतत पाहुण्यांच्या वर्दळीमुळे ही बिले लग्नसमारंभात यादी अशी असत. पण आमच्या वाण्याने बिलासाठी कधीही तगादा न लावल्या-मुळे, त्याच्या सोशिकपणाचे अण्णा नेहमी कौतुक करीत. या सर्वांच्या भरीला वडिलोपार्जित कर्जाचा बोजा होता. निदान तो बोजा तरी कमी व्हावा यासाठी अंगावरचे सर्व दागिने काढून देण्यात आमच्या आईने मनाचे जे मोठे औदार्य दाखविले, त्याची जाणीव म्हणून तिच्या होशी स्वभावाला अण्णांनी पैशासाठी कधीही विरोध केला नाही. आईला घरात पैशाचे संपूर्ण स्वातंत्र्य होते.

प्रोफेसरसारख्या मानाच्या नोकरीसाठी मिळणाऱ्या केविलवाण्या पगाराकडे

पाहता चाळीत न राहता, शिवाजीपार्कसारख्या उच्चवर्गीय भागात ब्लॉकमध्ये राहण्याचे अण्णांचे धाडस खरोखर कौतुकास्पदच म्हणायचे. ते स्वत: पूर्वी जगन्नाथाच्या चाळीत राहत होते. तथापि मुलांच्या हिताच्या दृष्टीने त्यांना हे महत्त्वाचे वाटले. याच्या जोडीला आमचे बॅडमिंग्टन, फोटोग्राफी, रेकॉर्ड कलेक्शन, यांसारखे महागडे छंदही अण्णांनी बिनतक्रार मोठ्या खुषीने पुरवले. जे जे आम्हाला हवेसे वाटले ते ते त्यांनी आम्हाला दिले. ऐपत नसतानाही दिले. त्यांचे स्वत:चे शिक्षण त्यांना अतिशय कष्टात नोकरी करून करावे लागले. कॉलेजचे सबंध शिक्षण विनासायास मिळावे या इच्छेसाठी त्यांची सारी धडपड राहिली. माझा भाऊ अशोक याने आर्किटेक्ट झाल्यावर पुढील अभ्यासक्रमासाठी इंग्लंडला जाण्याची इच्छा प्रदर्शित केली. तेव्हा आपल्या आर्थिक परिस्थितीचा जराही विचार न करता, कर्ज काढून अण्णांनी त्याला तिकडे पाठवले. दुसरा भाऊ हेमंत स्वकर्तबगारीनेच अमेरिकेला गेला. रिटायर व्हायच्या वेळी मुले हाताशी असावीत असा अगदी स्वाभाविक विचार त्यांनी केला असता तरी गैर ठरला नसता. पण तसा उच्चारही न करता, उलट रिटायर्ड व्हायचे त्या वेळी अधिकच जबाबदाऱ्या अंगावर घऊन, महागाईला तोंड देण्यासाठी परत तरुण रक्ताच्या जोमाने, त्यांनी रूपारेल कॉलेजची नोकरी धरली.

उच्च शिक्षण घेतलेली मुले असूनही त्यांच्या लग्नात मुलींकडून अण्णांनी हुंडा घेतला नाही किंवा इतरही काही मागितले नाही. माझे एक लग्न सोडले, तर नंतर एकाही मुलाच्या कार्यात अहेर स्वीकारले नाहीत. इतरांना टॅक्स पाडणारे कुठलेही कार्यक्रम करण्यास त्यांचा विरोध असतो. मुलांचे वाढदिवस इतरांना बोलावून साजरे करणे त्यांना अजिबात पसंत नसते. मुलांच्या मुंजी न करण्याचे त्यांनी घरात जाहीर करून टाकले होते मुलांचा म्हणजे घराण्याचा वारस, आमच्या तीन घरांपैकी फक्त आमच्या घरी असल्यामुळे मुंजीसाठी जेव्हा आजीने हट्टच धरला तेव्हा केवळ तिच्यावरच्या प्रेमामुळे व तिच्या वयाकडे पाहता, आपल्या दोन मुलांच्या मुंजी अण्णांनी घरच्या घरी कुणालाही न बोलविता केल्या. तिसऱ्या मुलाची मुंज अजिबात केली नाही. कुळकर्ण्यांच्या घराण्याचे मोठे देव परंपरेने चालत आलेले असूनही त्यांना कोकणच्या घराचा उंबरठा अण्णांनी ओलांडू दिला नाही. आमच्या आईचे असे थोडेसे देव आहेत. पण त्याचे कौतुक फक्त आईला व तिच्यामुळे आम्हा मुलांना. अण्णांना त्याचे सोयर-सुतक नसे. आई करीत असलेल्या व्रतवैकल्यांपैकी, पतीसाठीचे उपास व्रतवैकल्ये त्यांना मान्य नव्हती. उलट चेष्टेचाच विषय होती. तथापि ते तिच्याआड कधीही आले नाहीत. तसेच तिचा 'सत्यनारायणाच्या' पूजेचा हट्ट त्यांनी कधी पुढविला नाही.

आपलं काम, कर्तव्य प्रामाणिकपणे पार पाडले की देवाचे वेगळे काही करा-

वयास नको, उलट त्याची आठवण होण्याइतकी उसंतही मिळू नये इतके प्रत्येकाने काम करावे अशी त्यांची धारणा आहे. त्यांच्या या अशा विचाराच्या पगड्यामुळे संकटाच्या वेळी देवाला साकडे घालणे, नवस करणे किंवा सत्यनारायण बोलणे अशी आमची वृत्ती नाही. याचे कारण कदाचित आणखी वेगळे असावे. संकटकाळी अण्णांचाच आम्हाला मोठा आधार वाटतो. कुठल्याही चमत्कारिक प्रसंगी त्यांच्या मनाचा तोल ढळत नाही. अविचल राहतात. अतिरेकी निर्णयाप्रत ते येत नाहीत. आमच्या भावविवश स्वभावाला ते सांभाळून घेतात. स्वतःच्या घरात प्रत्येकाला निर्भय वाटले पाहिजे हे त्यांच्या वागण्यातील प्रमुख सूत्र आहे. त्यामुळे चुका करण्याचेसुद्धा आम्हाला स्वातंत्र्य आहे. 'स्वातंत्र्य' हे सुद्धा तारतम्याने घ्यावे म्हणजे पश्चात्ताप करण्याची वेळ येत नाही, असे त्यांचे सांगणे असते.

घराचे घरपण राहण्यासाठी सर्वांचा सुसंवाद साधला जावा यासाठी रात्री एकत्र गप्पा मारीत जेवणे व प्रत्येकाने आपली दिनचर्या ऐकवणे याबाबत ते दक्ष असत. त्यामुळे आमचे सर्व मित्र-मैत्रिणी घरात सर्वांच्या परिचयाच्या असतात. आम्हा मुलींना मित्र व मुलांना मैत्रिणी असणे अण्णांना गैर वाटत नाही. अशा तऱ्हेची मैत्री, अंगचे कलागुण अधिक उत्कटतेने प्रकट होण्यासाठी ते आवश्यक मानतात. त्यामुळे आमच्या मित्र-मैत्रिणींची व परिचितांची ऊठबस आमच्या घरी कुठल्याही दडपणाशिवाय मोकळेपणे होत असे. ही मुले आमच्या घरी स्वतःच्या घरापेक्षा अधिक मोकळी कशी वागतात व त्यांना आमच्या आई-अण्णांचे एवढे कौतुक का वाटते, हे रहस्य जाणून घेण्यासाठी त्यांचे आई-वडील आमच्या घरी येतात, तेव्हा तेही आमच्या घराच्या प्रेमात पडतात. त्यामुळे एखाद्या व्यक्तीऐवजी सर्व कुटुंबाशीच आमची ओळख असते.

आम्ही सर्व चुलतबहिणी मिळून आठजणी असूनही प्रत्येकीचे लग्न घरून बघूनच झाले. माझी एक आत्या विनोदाने म्हणे, "तुम्ही कुळकर्ण्यांच्या मुली अगदी पुळचट आहात. पळून जाऊन लग्न करण्याचे एकीचेही धाडस नाही." मी म्हणे, "तीही संधी आई-वडिलांनी आम्हाला दिली नसती. जमवलंय तर करून देऊ म्हणतील."

आमच्या अशोकला इंग्लंडला पाठवले त्या वेळी सर्वसामान्यपणे वाटणारी भीती पुढे खरी ठरली. तिकडे त्याच्या सहवासात आलेल्या एका गुजराथी मुलीबरोबर लग्न करण्याचा मानस त्याने पत्राने कळविला व अण्णांना कळविले, "तुमची परवानगी असेल तरच मी तिला होकार देईन." जिथे संमती मिळण्याची खात्री नसते, तिथे मुले असले विचारण्याचे औदार्य दाखवीत नाहीत. एकूण अण्णांची संमती त्याने गृहीत धरलेलीच होती. मुख्य प्रश्न आईचा होता. कारण पहिलाच मुलगा, सर्वसामान्य आई आपल्या पहिल्या मुलाच्या लग्नाच्या ज्या अपेक्षा करते, त्या

तिच्याही होत्या. त्यामुळे या बातमीने तिला जरी शॉक बसला तरी त्यातून तिला सावरायचे कौशल्य अण्णांचंच. ' मुलांचे हित तेच आपले हित ' असे मानून त्याला संमती दर्शविली. पुढे भारतात तो सपत्निक आला तेव्हा अति उत्साहाने आईने आपल्या सुनेचे स्वागत केले.

अण्णांच्या या प्रसंगानुरूप निर्णयातील औदार्यामुळे, नातेवाईक तसेच इतर अनेक ओळखीचे लोक, स्वतःच्या कुटुंबातील तंटे सोडविण्यासाठी अण्णांच्याकडे येतात. मत हे नेहमी एका पक्षाला अनुकूल तर दुसऱ्या पक्षाला प्रतिकूल ठरते. पण अण्णांनी दिलेले मत दुसऱ्या पक्षाला निराशाजनक वाटले तरी त्या पक्षाने अण्णांच्यावर कधी राग धरला नाही किंवा संबंध तोडले नाहीत. या लोकांनी अण्णांवर जो विश्वास टाकला त्याला अण्णांची कर्तव्यनिष्ठताही खरीच, पण त्या कर्तव्यनिष्ठ स्वभावाला माणुसकीचे अस्तर असते ही गोष्ट मला महत्त्वाची वाटते.

कुठलाही विद्यार्थी अडचणीत असो, त्याला पैशाची व पुस्तकाची मदत करतील. नातेवाइकांच्या बऱ्याचशा आर्थिक अडचणी स्वतः समजावूनच निभावून नेल्या. कोकणातील दारिद्र्य परिचित असल्याने आमच्या घरगड्याच्या कोकणातील घरातील आर्थिक अडचणींचा बोजाही अण्णांनी उचलला. " तुला कोण एवढे देवासारखे मायबाप भेटले " असे विचारीत त्या गड्याची म्हातारी आई कोकणहून आई-अण्णांना बघावयास मुद्दाम मुंबईला आली.

घरी आलेल्या कुणालाही ' या बसा ' म्हणून निदान पाणी देण्याचा शिष्टाचार अण्णांनी आम्हाला शिकवला आहे. चहा तर न विचारताच करून द्यावा लागे. कॉलेज किंवा विद्यापीठाचा शिपाई पेपर्स घेऊन आला तरी त्याला चहाशिवाय सोडत नसत. वेळप्रसंगी स्वतःही करून देत. वडीलमाणसांचा मान ते स्वतःच राखीत. त्यामुळे उलटून कुणाला बोललेले त्यांना आवडत नाही. त्यांच्यासारखे बंधुप्रेम व मित्रप्रेम मी पाहिले नाही. वास्तविक अण्णा भावंडांत मधले, पण त्यांनी उचललेल्या जबाबदारीमुळे ते सर्वांत वडील असल्याचा अनेकांचा समज आहे.

अण्णांची सर्वांत मोठी बहीण—वेणुअक्का, मग भाऊ नाना. तिसरे अण्णा व धाकटे भाऊ आप्पा (रामकृष्ण), त्यांच्या पाठचा विश्वनाथ हा तरुण वयातच वारला, पण ते आमच्या आठवणीत नाही. आम्ही पाहिलेले मृत्यूचे भयंकर दर्शन म्हणजे कॅन्सरच्या दुखण्याला पडलेला आमच्या धाकट्या काकांचा आप्पांचा बळी. आपल्या तीन मुलींचे कौतुक पाहण्यापूर्वीच, भरसंसारातून निघून जाताना त्यांना होणारे क्लेश पाहून ' तू कसलीही काळजी करू नकोस, मी आहे. ' असा आश्वासनपूर्वक अण्णांनी दिलेला हात हातात घेऊन ते निश्चित झाले. त्या प्रसंगाची आठवण आजही आम्हाला अस्वस्थ करते पुढे वर्षभरातच आमचे आजोबा, ऐंशीच्या पुढे वय, पण कोणतेही दुखणे नसताना केवळ पुत्रशोकाने वारले व त्यानंतर दोन

वर्षातच आमची आजी या दोन आघातांनी गेली.

१९५६ ते ६० ह्या कालात अशा तऱ्हेने कुळकर्णी घरावर फार मोठे सावट पडले. मुळात अतिशय हळव्या असलेल्या स्वभावामुळे अण्णा या काळात ढासळले. पण परिस्थितीचे भान ठेवून अडचणींना तोंड देण्यासाठी पुन्हा खंबीरपणे उभे राहिले. आई-वडिलांच्या मागेसुद्धा, आपली मोठी बहीण अक्का, दिसायला अतिशय सुस्वरूप पण लहान वयातच विधवा होऊन त्या वेळच्या समाजाच्या रूढीला बळी पडून विकेशा होऊन माहेरी येऊन राहिली, तिला शेवटपर्यंत मोठ्या मायेने वागविले.

आता मोठे बंधू नाना, अण्णांपेक्षा चार वर्षांनी मोठे– हाच अण्णांना मोठा आधार वाटतो. या भावंडांची भेट रोज होते. एखादा दिवस चुकला तरी अण्णा अस्वस्थ होतात. अण्णांच्या या भावंडांत आम्ही कधीही भांडणे पाहिली नाहीत. अजूनही एकोपा राहिला आहे. त्याचे बहुतांशी श्रेय आम्ही अण्णांच्या स्वभावाला देतो. तसेच सर्व भांडणांचे मूळ जो पैसा तो अण्णांनी आयुष्यात नेहमी गौण मानला हेही खरे. शाळेपासून ते अखेरपर्यंत माडखोलकरांची अबाधित राहिलेली मैत्री हे अण्णांच्या स्वभावाची थोरवी सांगणारे उत्तम उदाहरण आहे.

आमच्या ओळखीचे एक गृहस्थ जेव्हा विपन्नावस्थेला आले तेव्हा न चुकता एक तारखेला येऊन अण्णांकडून चहा-पाण्यापुरते पैसे व जुने धोतर-शर्ट घेऊन जात. त्यांची एक तारखेची वेळ कधी चुकली नाही. पुढे ते येईनासे झाले. त्यांचा विचार करीत असतानाच एक दिवस अचानक त्यांचे कार्ड आले." मी गोखले रोडला फूटपाथवर पडलो आहे, पोटात अन्न नाही." (ते कार्ड त्यांनी, तिथेच राहत असलेल्या आमच्या नातेवाइकांच्याकडून लिहून घेतल्याचे नंतर कळले) अण्णा लगेच तिथे गेले. एखादया भिकारी अवस्थेत ते गृहस्थ फूटपाथवर पडून होते. अनेक दिवस उपाशी असल्याने बोलण्याचेही त्यांना त्राण नव्हते. आंघोळीचे तर नावच नाही इतक्या घाणेरडया अवस्थेत कुणीही त्यांना हात लावला नसता. अण्णांनी समोरच्या हॉटेलातून उत्तम चहा आणून पाजला. पुरी-भाजी खायला घातली व नंतर टॅक्सीतून त्यांच्या इतर व्याधींसाठी सायन हॉस्पिटलमध्ये पोहोचवले. दुसऱ्या दिवशी औषधाच्या बाटल्याही घेऊन गेले. अण्णांच्या या वागणुकीचे आम्ही कौतुक करतो. तेव्हा त्याकडे दुर्लक्ष करून त्या गृहस्थाची तारीफ करीत अण्णा म्हणतात, " तो मनुष्य इतका प्रामाणिक की पोटाला अन्न मिळालं नाही, पण कुठे चोरी केली नाही."

माणसातील चांगल्या गुणांची कदर अण्णा नेहमीच करीत आले आहेत. वाईट वागणे त्यांच्या वृत्तीत नाही. त्यांचा शत्रू (असल्यास) जरी त्यांच्याशी वाद घालायला आला तरी प्रथम ते त्याच्या जेवणा-खाण्याची चौकशी करतील. " एक

कप चहा घ्या म्हणजे बोलायला जोर येईल." असेही म्हणतील. भिडस्तपणा हा त्यांचा स्वभावविशेष आहे. माझ्या मते तो अतिरेकी आहे. त्यामुळे स्वत:चे लेखन बाजूला सारून, "आमच्या पुस्तकाला प्रस्तावना लिहा, अभिप्राय लिहा" अशा अनेकांच्या विनंतीला ते बळी पडतात. तसेच होतकरू लेखकाला ते कधीच नाउमेद करीत नाहीत. स्वत:साठी किंवा आपल्या मुलांसाठी कुणाकडे शब्द टाकताना हजारवेळा विचार करणारे अण्णा, आपल्या नावाचा जर कुणाला उपयोग होत असेल तर त्यांना पटकन चिठ्ठी लिहून देतात. त्या चिठ्ठीचा उपयोग झाला की नाही हे कळविण्याबाबत उदासीनता दाखविली जाते तेव्हा अण्णा विलक्षण चिडतात. व आपल्या विनोदी शैलीत त्याला त्याची जाणीव देतात. त्यामुळे त्यांचा विनोद अनेक वेळा धारदार व बोचरा वाटतो. स्वत: रीतीरिवाज पाळण्यात व वेळेच्या बाबतीत दक्ष असूनही काळवेळेचे भान न ठेवता मार्गदर्शनासाठी येणाऱ्या विद्यार्थ्यांना 'वेळ नाही' असे स्पष्ट सांगणे त्यांना जमत नाही. "विद्यार्थी हा माझा 'वीकपॉइंट' आहे." असे ते म्हणतात. हा विद्यार्थी पेडर रोड अथवा परळ या कुठल्याही स्तरातला असतो. त्यामुळे समाजातील सर्व धर्मांबरोबर, श्रीमंतीचा आम्हाला तिटकारा नाही. कारण ह्या वर्गातील अनेक लोकांचा, विशेषत: डॉक्टरांचा परोपकारी स्वभाव आमच्या वाटयाला अनेक वेळा आला आहे. विद्यार्थी आमच्या घराशी एकरूप होण्याचे कारण तो येतो चिमूटभर अपेक्षेने आणि जाताना जातो ओंजळभर घेऊन. विद्यार्थ्यांची ज्ञानाची भूक लक्षात घेऊन अण्णा शिकवतात.

गेल्या १०–१२ वर्षांत देशाच्या सामाजिक व आर्थिक स्थित्यंतरामुळे घरी बसलेल्या स्त्रियांचा फार मोठा वर्ग पदवी-शिक्षणासाठी घराबाहेर पडला. एस. एस. सी.पर्यंत शिकलेल्या व नोकरीवाल्या स्त्रियाही पदवीसाठी धडपडू लागल्या. साह-जिकच यांची अनेक वर्षांची पडलेली गॅप भरून काढण्याची जबाबदारी शिक्षकांवर येते. ही पोकळी भरून काढण्यासाठी अण्णांना फार मोठी मेहनत घ्यावी लागली. नोकरी करून शिकणाऱ्यांबद्दल मुळातच सहानुभूती असल्याने, त्यात इंग्रजीचे अव-मूल्यन झाल्याने, जितके म्हणून त्यांच्यासाठी सोपे करता येईल तितक्या सोप्या नोट्स वगैरे काढून त्यांनी केले.

एकूण विद्यार्थ्यांपेक्षा शिक्षकाचे परिश्रम अधिक बघून मी माझी नापसंती जेव्हा व्यक्त करी तेव्हा अण्णा म्हणत, "यांचेच विषय जर कच्चे राहिले तर पुढच्या पिढीला त्या काय शिकवणार ?" वयोमानाने या श्रमांचा ताण पडून क्लासेसमध्ये शिकवणे जेव्हा अण्णांना अशक्य वाटले तेव्हा विद्यार्थिनींचा एक तांडा आमच्या घरी आला. व अण्णांना म्हणाला, "सर, तुम्ही येऊ शकत नसला तर आम्ही तुमच्या घरी येऊन शिकू, पण आम्हाला तुम्हीच शिकवावयास हवे."

त्या वेळी सुप्रसिद्ध अभिनेत्री हंसा वाडकर व मी हॉलमध्ये गप्पा मारीत बसलो होतो. हा सर्वच प्रकार हंसाबाईंना नवीन होता. त्या म्हणाल्या, " मला आतापर्यंत सिनेमा क्षेत्रातीलच लोकप्रियता माहीत होती. अशी ही शिष्यांकडून गुरूला मिळणारी पावती, ही उच्च प्रतीची लोकप्रियता मला फार अनोखी आहे. इराताई, असे तुम्हाला वडील मिळाले म्हणजे खरोखर मोठे भाग्य आहे."

अण्णांनी आयुष्यात फक्त दुपारच्या वामकुक्षीची अपेक्षा केली. पण तीही त्यांना मिळू शकली नाही. या साठी शेवटी J. P. ची पदवी त्रासदायक वाटल्या-वरून त्याचा राजीनामा दिला. ग्रंथसंग्रहालयाचे अध्यक्षपद बरेच वर्षे भूषवूनही केवळ लोकांच्या भिडेखातर आणखी काही वर्षे चालू ठेवले. ' नाही ' म्हणणे त्यांना कधी जमलेच नाही.

अण्णा स्वतः अतिशय चोखंदळ आहेत. मुलांच्या नावापासून याची सुरुवात होते. इनिशियल्स सारख्या झाल्यास घोटाळे होण्याची शक्यता पाहता नावाची आद्याक्षरे सारखी न येण्याची काळजी त्यांनी घेतली. हेमंतचे पहिले नाव ' शरद्-चंद्र ' ठेवले. पण हे नाव इतरांकडून हरिश्चंद्रासारखे लिहिले जाण्याचा धोका संभवताच पुढे ते बदलून ज्या ऋतूत तो जन्मला ते ' हेमंत ' असे नाव ठेवले. आमचे कुळकर्णी हे आडनाव ' ळ ' चे ' ल ' करून कुलकर्णी असे लिहिले की त्यांचा कऱ्हाडे ब्राह्मणी अहंकार दुखावतो.

कुठलीही वस्तू पटकन अण्णांच्या पसंतीला उतरत नाही. स्वतःसाठी कुठलीही वस्तू घेताना ते अतिशय चिकित्सा करतात. त्यांना भेट म्हणून वस्तू देताना फार विचार करावा लागतो. वरकरणी आवडल्याचे सांगतील, पण दोन दिवसांनी त्याचा त्यांना कसा उपयोग नाही हे ऐकावे लागते. त्यांना वेगवेगळया प्रकारची फाऊंटन पेन्स जमविण्याचा छंद आहे. आमच्या सर्व नातेवाइकांना त्यांनी पारकर किंवा शेफर्सची पेन्स बक्षीस म्हणून दिली आहेत. लेखनासाठी प्रत्येकाजवळ पेन असणे आवश्यक असल्याचे ते आग्रहाने सांगतात. त्यांचे लिहिण्याचे टेबल, सर्व आवश्यक वस्तूंसह अतिशय व्यवस्थित लावलेले असते. त्यांच्या वस्तूंना कुणीही हात लावलेला त्यांना खपत नाही. मुलांशी अतिशय प्रेमळपणे वागणारे अण्णा, पुस्तकांच्या बाबतीत मात्र अतिशय कठोर बनतात. पुस्तकांची हेळसांड केलेली त्यांना सहन होत नाही. पुस्तकांची निगा राखणे हे वर्षातले त्यांचे प्रमुख काम असते.

अण्णांना व्यसन चहाचे व सिगारेटचे. दिवसातून अनेक वेळा त्यांना चहा लागतो. व तोही उत्कृष्ट. उत्कृष्ट चहा करता येणे हे सुग्रणपणाचे ते लक्षण मानतात. चहाच्या ' टेस्ट ' वरून घराची संस्कृती कळते असे ते म्हणतात. त्यांना जेवणात बऱ्याच खोडया आहेत. आमची आई सुग्रण असल्यामुळे ते कुठेही जेवणाचे आमंत्रण स्वीकारायला सहसा तयार नसत. गोडापेक्षा तिखटाकडे कल अधिक.

जेवणात हिरवी मिरची हवीच. लिहिताना व पेपर्स तपासताना त्यांना सिगारेटची पाकीटे जवळ लागतात. घरातच ही पाकीटे असल्याने मुलांनाही ती ओढून बघणे स्वाभाविक वाटेल असे जमेस धरून "तुम्हाला ओढायची असेल तर माझ्या समोर ओढा. लपवून ओढू नका." असे सांगितले. आज परदेशात राहूनही माझ्या भावांना सिगारेटला शिवावेसे वाटले नाही याचे आश्चर्य वाटते.

आज अठ्ठयाहत्तराव्या वर्षी त्यांची श्रवणशक्ती अधु झाली तरी स्मरण-शक्ती शाबूत आहे. आज-उद्याचे कार्यक्रम विसरतील, पण पूर्वीचे वाचलेले, शिकवलेले सर्व तपशीलवार लक्षात आहे. त्यांचे मित्र त्यांना 'एनसायक्लोपिडीयाच' म्हणत. त्यांची 'विल पॉवर' वाखाणण्यासारखी आहे. 'दि टेम्पेस्ट' या नाटकाचे 'पॅरा फ्रेज' करण्याचे काम त्यांनी अंगावर घेतले होते. रोजच्या कामाच्या व्यापात ठराविक दिवसांत पूर्ण होणे अशक्यच वाटल्यावर सतत आठ रात्री जागून त्यांनी ते पूर्ण केले. जराही झोपले नाहीत. मंगळागौरीच्या एका रात्रीच्या जाग्रणामुळे पित्त होणारी आमची प्रकृती पाहता त्यांच्या ह्या जाग्रणाने आम्हाला थक्क केले.

दोन वर्षांपूर्वी अमेरिकेला मुलाकडे जाऊन आले. त्या वेळी प्रवासाचा त्रास होऊन ते आजारी पडले. पायातले बळच गेले. साधे उभे राहता येईना. डॉक्टरांचे अचूक निदान व योग्य औषधोपचार यामुळे ते लवकर बरे झाले. पण आपण परावलंबी होऊन चालणार नाही या जिद्दीने ते या दुखण्यातून लवकर सावरले. आता वडीलभावाच्या सोबतीने ते रोज संध्याकाळी फिरून येतात. या दुखण्या-पासून सिगारेटही बंद केली. अशा वेळी व्यसन सुटत नाही म्हणतात ते खरे वाटत नाही. शेवटी 'इच्छाशक्ती' पाहिजे. त्यांच्या या दुखण्याखेरीज त्यांना साधा ताप आल्याचेही आम्हाला आठवत नाही. याचे कारण त्यांनी आपली प्रकृती परिश्रम-पूर्वक सांभाळली आहे.

पहाटे ५ वाजता उठून पंधरा-वीस मिनीटे व्यायाम, मग लिंबू-पाणी, संपूर्ण शाकाहारी जेवण, दोन लहान-पोळया, आमटी-भाजी-भात आवश्यक. रात्री ते अनेक वर्षे झाली जेवत नाहीत. एखादे फळ, दूध, किंवा कण्हेरी असा हलका आहार ते घेतात. चाळीशीनंतर एक वेळच जेवावे असे त्यांचे मत आहे. आंघोळ दोन्ही वेळेला गरम पाण्याने करतात. प्रत्येकाने स्वतः स्वतःचे डॉक्टर बनावे, आपल्याला काय पचते, काय पचत नाही, याचे निरीक्षण करून आपला आहार ठरवावा. तोंडाला लगाम घातला की दुखणी येत नाहीत असे ते स्वानुभवाने सांगतात.

खाण्याबरोबर सभ्य व साधा पोशाख ते उच्च संस्कृतीचे लक्षण मानतात. बंगाली साडया– विशेषतः पांढऱ्या साडीला लालचुटूक किनार त्यांना विशेष पसंत. पोशाखात बदल त्यांना मान्य नाही. कॉलेजमध्ये त्यांनी कायम एकाच

रंगाचा (बदामी) कोट व मरुन रंगाचा 'टाय' वापरला. यावरून त्यांना फिश-पाँडही मिळाला आहे. बायकांनी साडीवर कोट वापरावा म्हणजे पर्स वगैरे सांभाळण्याची कसरत न करता हात मोकळे राहतील असं ते मला सुचवीत. प्रसाधने वापरणे त्यांना आवडत नव्हते. इतकी वर्षं ते स्वत:चे कपडे (बाहेरचे) स्वत: धूत. अजूनही स्वत:ची चहाची कप-बशी स्वत: विसळतात. अंथरुणही स्वत घालतात. रोज सकाळी दीड-एक तास पत्रव्यवहारात जातो कुणाचे रेडिओवर भाषण ऐकले, लिखाण वाचले की ताबडतोब पत्राने आपले प्रांजळ मत कळवतात. मुलांच्या पत्रांना उलटटपाली उत्तर जाते. त्यात इथली इत्थंभूत माहिती कळवलेली असते. पत्रव्यवहार लक्षात घेता आमच्या घराचा जिना पोष्टमनला दिवसातून तीन वेळा चढावा लागतो. याची जाणीव ठेवून अण्णा त्यांना दिवाळीत भरपूर पोस्त देतात.

अण्णांचे शालेय शिक्षण राजापूर, चिपळूण तसेच मुंबईला आयॅन एज्युकेशन-मध्ये झाले. कॉलेज शिक्षण 'सेंट झेवियर्स' मध्ये. त्या वेळच्या बऱ्याच गमतीदार गोष्टी (आठवणी) अण्णा सांगतात. अण्णांबद्दल आजी एक गोष्ट सांगे त्यांच्या स्थितप्रज्ञतेची—

अण्णा एकदा कोकणात आपल्या कशेळी गावाला बोटीने जात असता (तेव्हा एस. टी. नव्हती) बोट वादळात सापडली. प्रचंड वाऱ्यामुळे बोट इतकी हलत होती की खालच्या डेकवर पाणी शिरले. बोटीवर हाहाकार उडाला. बोट बुडणार या कल्पनेने लोक आपली ट्रंक, वळकटी डोक्यावर घेऊन धावत सुटले. अण्णा मात्र 'जे इतरांचे होईल तेच आपले होईल' असे म्हणून शांतपणे पडून होते. पुढे कप्तानाच्या कौशल्याने बोट जयगड बंदराला लागली. व सर्वांनी जीवदान मिळाल्याचा श्वास सोडला. प्रत्यक्ष मृत्यू समोर दिसला असता, इतके अविचल राहण्याची वृत्ती असामान्य म्हणायची.

आईचा आकस्मित मृत्यू हा आम्हाला बसलेला सर्वांत मोठा धक्का. आम्ही ढासळलोच. अण्णा ढासळले नाहीत तरी खचले. तेव्हापासून ते अधिक गंभीर झाले. त्यांच्या बोलण्याला विनोदी छटेऐवजी कारुण्याची छटा आली. विधवेपेक्षा विधुराचे दु:ख अधिक तीव्र असते असे त्यांच्याकडे बघून तरी मला वाटते. विधवेचे दु:ख निदान गृहीत धरले जाते.

"नेहमी खालच्या लोकांकडे पहा म्हणजे आपण किती सुखी आहोत ते कळते. आपला कुणाला उपयोग झाला नाही तरी उपद्रव होऊ नये याची दक्षता घ्यावी. कुणालाही मदत करताना योग्य वेळी मदत करा. वेळ जाणणे महत्त्वाचे." असा अनेक प्रकारचा सल्ला देणाऱ्या अण्णांची कुठलीही गोष्ट वेळेवर झाली नाही



अनुक्रमणिका

अनेक फुटकळ लेखन करूनही त्यांना जे लिखाण करावयाचे होते, त्याला त्यांच्या सत्तर वर्षांच्या आयुष्यात, प्रापंचिक जबाबदाऱ्यांमुळे व भिडस्त स्वभावामुळे सवडच मिळाली नाही तब्येत बरी नसतानाही या वयात अच्युत बळवंत कोल्हटकरांचे चरित्र लिहून पूर्ण केले. त्यासाठी हेलपाटे जात असतानाही बसने जाऊन अनेकांच्या भेटी घेऊन आठवणी जमविल्या. परवाच ' शॉ ' वरचे पुस्तकही हाती आले. पण हे सर्व.त्यांच्या उमेदीच्या काळात व्हावयास हवे होते. अजूनही या वयात ते अनेक संकल्प करून आहेत.

आपल्या नकळत आपल्या घरचा जमाखर्च कुणीतरी करीत असते. माझी मावशी नेहमी आईला म्हणायची, " तुमचं घर म्हणजे धर्मशाळा आहे. स्वतःच्या संसारापुरत बघितलं असतं तर शिवाजीपार्कलाच स्वतःच एखादं घर बांधलं असतंत, दारात गाडी असती. या वयात तुला व अण्णांना इतके कष्ट करावयास नसते लागले." तिचे म्हणणे तसे सर्वार्थाने खरे असते. पण प्रत्येकाच्या जीवनपद्धती वेगळ्या असतात हे तिला समजावून सांगण्यात अर्थ नाही, असे अण्णा म्हणत. आपण जे काही आहोत त्यात समाधानी आहोत. टिळक-आगरकरांच्या कालखंडात आपण जन्मलो त्याबद्दल ते स्वतःला भाग्यवान समजतात. आयुष्यात अजूनपर्यंत आपल्याला हॉस्पिटल व कोर्टाची पायरी चढावी लागली नाही हे आपले नशीब असे ते मानतात. मुलांकडून अवास्तव अपेक्षा न ठेवल्याने त्यातही ते समाधानी आहेत. त्यांची समाधानी वृत्ती पाहिली की त्या सुखी माणसाचा सदरा कदाचित आमच्या घरीच सापडायचा असे मला वाटते.

या वयातही त्यांची जिज्ञासा कायम आहे. जिज्ञासा आहे तोपर्यंत जगण्याची उमेद आहे. त्यांच्या पंचाहत्तरीच्या वेळी त्यांचे पुत्रवत शिष्य श्री. प्रकाश मोहाडीकर यांनी त्यांचा अमृत महोत्सव मोठ्या थाटात घडवून आणला. अण्णांची लोकप्रियता त्या वेळेला जाणवली. आजही संक्रातीला त्यांचे चाळीसएक वर्षांपूर्वीचे विद्यार्थी–विद्यार्थिनी त्यांना न चुकता तिळगूळ घेऊन येतात व त्यांच्या पायावर डोके ठेवतात तेव्हा त्या गुरुभक्तीने आम्ही भारावून जातो. पुढे ' असे गुरू व असे विद्यार्थी ' ही गोष्टच इतिहासजमा होणार आहे.

परवाच मला इतिहासाच्या एका प्राध्यापकाने विचारले, " तुमचे वडील आत्मचरित्र का लिहीत नाहीत ? He is not an individual now but an institution. महाराष्ट्राच्या लिहिल्या जाणाऱ्या सामाजिक व सांस्कृतिक इतिहासासाठी त्यांच्या चरित्राची खरी गरज लागेल."

मी मनात अण्णांना असेच दीर्घायुष्य लाभो हीच इच्छा करते. अण्णांना त्यांच्या ७५ व्या वाढदिवसाच्या निमित्ताने मी एक टी. व्ही. स्टाईल प्रश्न विचारला, " तुमच्या दीर्घायुष्याचे रहस्य काय ? म्हणजे आनुवंशिकता..." अण्णा म्हणाले,

"खरं म्हणजे माझ्या आवडीचा– शिक्षकाचा पेशा मला आयुष्यभर करता आला हे माझ्या दीर्घायुष्याचं खरं रहस्य आणि..." आणि मला माहीत असते, या त्यांच्या व्रताला सर्वार्थाने जिने साथ दिली तिच्यामुळे...

आज बरेच दिवसांनी त्यांच्या चेहऱ्यावर खरे समाधानाचे हास्य उमटले. हातात त्यांनी लिहिलेल्या 'जॉर्ज बर्नार्ड शॉ' या पुस्तकाची प्रत होती. त्यांच्या आनंदाचे व समाधानाचे कारण मला त्या पुस्तकाच्या अर्पण-पत्रिकेत गवसले.

* *

अनुक्रमणिका

विठ्ठलरावांसारखा हजरजबाबी आणि चतुरस्त्र उत्तरदाता वक्ता माझ्या पाहण्यात नाही. प्रश्न गंभीर असो वा हलकाफुलका, विठ्ठलरावांनी दिलेले त्या प्रश्नाचे उत्तर नेहमीच मोठे मार्मिक, क्वचित मर्मभेदक, पण नेहमीच मोठे मिस्किल असे.

त्यांची विनोदवृत्ती मोठी तल्लख आहे आणि त्यांच्या या तल्लख विनोदवृत्तीचे प्रत्यंतर त्यांच्या उत्तरातून हटकून मिळे.

मला आठवते, एकदा मी त्यांना असा गंमतीचा प्रश्न विचारला होता की रिकाम्या बसमध्ये उतारू चढले की डाव्या बाजूच्या खिडकीलगतची जागाच ते हटकून का पकडतात? या प्रश्नाचे विठ्ठलरावांनी दिलेले उत्तर असे होते: बसचे थांबे डावीकडे असतात आणि तेथे रांगेत बायका उभ्या असतात म्हणून! तर असे हे विठ्ठलराव.

**प्रा. माधव मनोहर**




अनुक्रमणिका